# नवभारत




किंमत १ रुपाया मे १९४८














नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

# नवभारत

वर्ष पहिलें, अंक आठवा

मे १९४८



मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल, अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनीं स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जें आपलें सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेलें असेल, उच्च वातावरणांतील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेनें संगृहीत केलेला असेल, त्याचें दिग्दर्शन हेंच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊं शकतें, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादक-मंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंही सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यासंबंधीं सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

मुद्रक व प्रकाशक चिं. य. मराठे यांनीं हें मासिक विश्वास छापखाना, २९१ शनिवार पुणें २, येथें छापिलें आणि नवभारत कचेरी, २१९ शिवाजीनगर, पुणें ५ येथें सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां प्रसिद्ध केलें.





# नवभारत, मे १९४८

## या अंकांतील लेखक

१ **डॉ. वा. वि. गोखले** ( पुणें )—फर्ग्युसन कॉलेजमध्यें जर्मनचे प्राध्यापक; बंगाली, चिनी, तिबेटी आदि भाषांचे व्यासंगी अभ्यासक.

२ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** ( वाई )—धर्मकोशाचे मुख्य संपादक, ' हिंदु-धर्म–समीक्षा ', ' जडवाद ', ' महात्मा जोतिबा फुले ' आदि ग्रंथांचे कर्ते.

३ **आचार्य शं. द. जावडेकर**—सुप्रसिध्द राज्यनीतिशास्त्रज्ञ. ' आधुनिक भारत ', ' हिंदु-मुसलमान ऐक्य ' इत्यादि ग्रंथांचे लेखक आणि ' नवभारताचे ' एक संपादक.

४ **डॉ. के. ल. दप्तरी** ( नागपूर )—प्राच्यविद्यापंडित व ज्योतिर्गणितज्ञ. ' धर्मरहस्य ' ' Social Institutions in Ancient India ' इत्यादि ग्रंथांचे लेखक.

५ **श्री. के. ए. पोतदार**, ( नागपूर )—एक उदयोन्मुख वृत्तसाहित्यिक. नागपूरच्या ' तरुण भारताशीं ' संबध्द.

६ **श्री. के. आर. कारन्थ**—मद्रास विधिमंडळाचे सभासद. तामिळ भाषेतील साहित्यिक.

७ **श्री. प्रेमा. कंटक**,—( सासवड ) सुप्रसिध्द समाजसेविका, ' सत्याग्रही महाराष्ट्र ' इत्यादि ग्रंथांच्या लेखिका.

८ **प्रा. श्री. व्यं. पुणतांबेकर**, ( नागपूर )—नागपूर विश्व–विद्यालयामध्यें राज्यशास्त्राचे प्राध्यापक. " नागरिकनीति " "Indian Citizenship and Civilization " इत्यादि ग्रंथांचे कर्ते.

९ **श्री. एकलव्य**—वसुंधरा साप्ताहिकांतून १९३१ सालीं प्रसिद्ध झालेल्या ' आजचे गायक ' या लेखमालेचे आणि मागून प्रसिद्ध झालेल्या ' आजचे गायक ' या पुस्तकाचे लेखक.

१० **श्री. ह. कृ. मोहनी**, ( नागपूर )— ' तेजस्वी शिक्षण ' ' आजचा सनातन धर्म ' इत्यादि ग्रंथांचे लेखक, ' नवभारताचे ' एक संपादक.

११ **प्रा. स. वा. कोगेकर** ( पुणें )—बृहन्महाराष्ट्र कॉमर्स कॉलेजचे उपप्राचार्य. " Elements of Economics " हा ग्रंथ प्रा. कोगेकर व प्रा. कोल्हटकर यांनीं लिहिला आहे.

अनुक्रमणिका

# गांधींचे शिष्य—

[ महात्मा गांधींचे संबंधीं **गुरुदेव रवीन्द्रनाथ ठाकूर** यांनीं आपल्या शेवटच्या काळांत काढलेले उद्‌गार संकलित करुन ते " महात्मा गांधी " या नांवाखालीं मूळ बंगालींत नुकतेच विश्वभारती ग्रंथालयानें प्रसिद्ध केले आहेत. प्रस्तुत कविता ही त्या पुस्तकाच्या आगामी मराठी अनुवादांतून घेतली आहे. —अनुवादकः डॉ. वासुदेव गोखले, पुणें. ]

१

गांधींचे शिष्य आम्ही जरि कुणिहि असूं वा धनी वा दरिद्री,
एके ठायीं अम्हां जें मिळवित सकलां तत्त्व तें ऐक्यकारी—
मारूनीयां गरीबां कधिंहि नच भरूं पोट आम्ही, नसूं ना
श्रीमंतांच्या पुढें वा, मुख कधिं अमुचें काळवंडे भयें ना ॥

२

धावोनी पाठिं लागे वळवित मुठि हा उंच कोणी वरिष्ठ
बोलूं हांसोनिया त्या, फिरवित जरि ये लाठि तो धष्टपुष्ट—
" बाळांची झोंप मोडे खचितचि तव हे पाहुनी नेत्र लाल,
आम्हां ठावें परी ना भय, म्हणुनि कसें तें कुणा दाविशील ? " ॥

३

साध्या शब्दांत बोलूं सरळपणिं जसें स्वच्छ वाटे मनाला,
ना दावूं आवडे जी चतुर कुटिलता राज्यशास्त्री-जनाला,
खेंचायाला तुरुंगीं मुरड तरि कशापायिं ती कायद्याला ?—
काराद्वारीं तसा तो सहज पकडुनी थेट नेतो अम्हांला ॥

४

जथ्यांजथ्यांतुनी हे विसरुनि घर जे चालले येरवाड्या,—
पूर्वीं जी मानहानी घडलि नि पडल्या ज्यामुळें हातिं बेड्या,
त्यांची ही शापमुक्ती; गळत मग धुळीं शृंखला-साज त्यांचा
जैं आपोआप, लागे सुभग वध कपाळीं टिळा गांधिजींचा ! ॥

उदयन, शांतिनिकेतन,
१३ डिसेंबर १९४०.

रवीन्द्रनाथ ठाकूर.

अनुक्रमणिका








# भारतीय तत्त्वज्ञान—उदय व विकास

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

## संस्कृति आणि तत्त्वज्ञान यांचा संबंध

सुधारलेल्या मानवसमाजाच्या जीवनाचें रहस्य त्याच्या तत्त्वज्ञानांत प्रकट झालेलें असतें. सुधारलेल्या मनुष्यांनीं निर्माण केलेल्या संस्कृतींचा किंवा सामाजिक संस्थांचा अर्थ त्यांच्या तत्त्वज्ञानांत भरलेला असतो; विशेषतः त्यांचीं मानसिक मूल्यें तत्त्वज्ञानाशीं संपूर्णपणें निगडित असतात. त्यांच्या बौद्धिक प्रयत्नांची प्रेरक शक्ति प्रत्यक्षपणें तत्त्वज्ञानांतच असते. सामाजिक संस्था, मानसिक मूल्यें व बौद्धिक प्रयत्न हे तत्त्वज्ञानाचे मूर्तिमंत आविष्कार असतात; आणि तत्त्वज्ञान त्यांच्यांत स्पष्ट किंवा अस्पष्ट रूपानें गर्भित असतें. तत्त्वज्ञानांत फरक पडला म्हणजे मानवी जीवनांत फरक पडतो. मानवी ध्येयें आणि मानसिक मूल्यें यांच्या क्षेत्रांत तत्त्वज्ञानाचें प्रभावी स्वरूप अधिक दृग्गोचर होत असतें. धर्म, नीति, कला आणि विज्ञान हें ध्येयांचें आणि मानसिक मूल्यांचें प्रमुख क्षेत्र होय. त्यांत मानवी आत्मा आपल्या स्वरूपाचा अनुभव घेत असतो. राजकारण आणि कायदा यांच्यांत हीं ध्येयें आणि मूल्यें संमिश्र व संकुल स्वरूपांत प्रतीत होतात; म्हणून तत्त्वज्ञानाचा त्यांच्याशीं साक्षात् संबंध दाखविणें अधिक कष्टाचें असतें. प्रकाशांत काम करणाऱ्यास प्रकाशाचें प्रकट भान पुष्कळ वेळां नसतें; तशींच त्यांतील व्यापक विचारांच्या संबंधांची स्पष्ट जाणीव लोकांना नसते. परंतु त्यांचा प्रभाव सुधारलेल्या समाजाच्या व्यवहारावर पडलेला असतो, हें तत्त्वचिंतकांच्या ध्यानांत आल्याशिवाय राहत नाहीं. कारण मनुष्याचें शक्तिसर्वस्व ज्यांत खर्चिलेलें असतें, त्या सामाजिक संस्था व तीं मूल्यें मानवी आत्म्याच्या उच्चतम शक्तींचा बहर होत; आणि तत्त्वज्ञान हें त्या शक्तींचें परम सार होय.

## तत्त्वज्ञानाचें कार्य, स्वरूप व लक्षण

ज्ञानाशिवाय मानवी प्रयत्न सफल होत नाहीं. तत्त्वज्ञान हें सुधारलेल्या मनुष्याच्या ज्ञानसाधनेचें एक महत्त्वाचें साधन आहे. किंबहुना ज्ञान-निर्मिति हीं तत्त्वज्ञानाच्या सामर्थ्याची कसोटी होय. ज्या समाजांतील ज्ञाननिर्मिति मंदावलेली असते, जो समाज ज्ञानाच्या क्षेत्रांत मागसलेला असतो, त्या समाजाच्या मनावर प्रभाव असणारें तत्त्वज्ञान हें सत्यापासून अधिक दूर गेलेलें असतें.

विश्ववस्तूचा म्हणजे मानवी जीवनासह सर्व विश्वाचा (Universal Realityचा) अर्थ सांगणाऱ्या सामान्य व मूलभूत कल्पनांची सुसंगत व तर्कशुद्ध मांडणी म्हणजे तत्त्वज्ञान होय. हें लक्षण जडवाद ( Materialism ) आणि चैतन्यवाद ( Spiritualism ) यांस सारखेंच लागू पडतें. कारण अद्वैत-जडवादास जड विश्वांत मानवाचें स्थान सांगावें लागतें आणि नैतिक मूल्यांची उपपत्ति मांडावी लागते. त्याचप्रमाणें अद्वैत-चेतनवादास मानवी आत्म्याच्या आणि परमात्म्याच्या जगांतील निसर्गाचें स्थान निश्चित करावें लागतें. जडाचा आणि आत्म्याचा कार्यकारणभावात्मक किंवा इतर प्रकारचा तार्किक संबंध निश्चित करण्यावरच जडवादी आणि चेतनवादी तत्त्वज्ञानाचें यश अवलंबून असतें. ध्येयाचें जगत् ( Ideal World ) आणि जड जगत् ( Material World ) यांचा सांधा तर्कदृष्ट्या निश्चित न करतां आल्यामुळेंच जडवादी व अध्यात्मवादी तत्त्वज्ञानें पराभूत होतात. त्यांचा

# भारतीय तत्त्वज्ञान—उदय व विकास

पराभव केवळ बौद्धिक क्षेत्रांतच होत नाहीं, तर त्यांच्या पराभवाचीं चिन्हें त्यांचा प्रभाव ज्या सामाजिक संसारावर असतो त्यांतहि प्रकट झाल्याशिवाय राहत नाहींत. अद्वैतवादानें ह्या संबंधाची समाधानकारक उपपत्ति लागत नाहीं, असें वाटल्यावर द्वैतवादी व बहुत्ववादी दर्शनें जन्माला येतात. द्वैतवादी व बहुत्ववादी दर्शनें जड आणि चेतन या दोघांचें स्वतंत्र अस्तित्व मान्य करतात; आणि त्यांचा परस्परांवर काय परिणाम होतो आणि त्यांचा संबंध कशा प्रकारचा असतो याचें कोडें उकलीत असतां थकून जातात.

आपल्या प्रत्येक अनुभवाची उपपत्ति लावणें हें तत्त्वज्ञानाचें कार्य आहे. तत्त्वज्ञानाच्या अत्यंत व्यापक साच्यांत अनुभव बसवितां आला पाहिजे. जें जें कांहीं आपण अनुभवतों, पाहतों, जाणतों, भोगतों, अपेक्षितों, तें तें तत्त्वज्ञानाचे सिद्धांत सिद्ध करण्याचें उदाहरण वाटलें पाहिजे. आपल्या संस्था, आपले पराक्रम, आपलीं ध्येयें, आपल्या कला यांचें योग्यत्व वा अयोग्यत्व त्याच्या योगानें आपणांस पारखतां आलें पाहिजे. आपला अनुभव बदलला, ध्येयें जीवनाच्या क्षितिजावर दिसूं लागलीं, आपले पराक्रम पूर्वीपेक्षां अधिक विस्मयजनक वाटूं लागले आणि आपली प्रतिभा अभिनव निर्मितीचा कलात्मक विलास करूं लागली असतां त्यांचा अर्थ व महत्त्व पटवून त्याकरितां लागणाऱ्या मानसिक सामर्थ्याचा अखंड पुरवठा तत्त्वज्ञानानें केला पाहिजे. तत्त्वज्ञानामध्यें असें कार्य करण्याचें सामर्थ्य असतें, ही गोष्ट ज्ञानाच्या इतिहासानें दाखविली आहे.

नवा अनुभव, नवीं ध्येयें व नवे पराक्रम ह्यांचा अर्थ दाखविण्याचें आपलें सामर्थ्य अपुरें पडतें असें दिसल्यावर जें तत्त्वज्ञान विकास पावतें आणि पूर्वी स्वीकारलेले सिद्धान्त दुरुस्त करावयास तयार होतें, त्याचा मूळ पाया अनुभव हा असतो. जें तत्त्वज्ञान स्वयंसिद्ध किंवा स्वतःप्रमाण (*a priori*) मूलभूत कल्पनांवर आधारलेलें असतें तें स्वतः विकास न पावतां मानवी प्रगतीवर बंधन घालतें, नव्या अनुभवाचा समाधानकारक अर्थ सांगतां न आल्यामुळें खोट्या समर्थनास बळी पडतें किंवा गूढवादाचा आश्रय घेऊन आपल्या सत्यस्वरूपावर आवरण घालतें. अनुभवनिष्ठ तत्त्वज्ञान प्रवाही स्वरूपाचें असतें. उलट स्वयंसिद्ध कल्पनांवर आधारलेलें तत्त्वज्ञान सर्व बाजूंनीं कडेकोट बंदोबस्त केलेल्या स्वरूपाचें असतें. वस्तुतः कोणतेंहि तत्त्वज्ञान हा अनुभवाचा आणि विज्ञानाचा निष्कर्ष असतो. आपल्या विचारांत आणि विज्ञानांत ज्या कल्पना कळत वा नकळत आधारभूत म्हणून धरलेल्या असतात, ज्यांच्यामुळें विचार व विज्ञान यांचा पाया निर्माण झालेला असतो, त्यांची व्यवस्थित चर्चा व मांडणी तत्त्वज्ञान करीत असतें. अनुभव, विचार व विज्ञानें हीं मानवी संस्था आणि कला यांच्या रूपानें मूर्तिमंत स्वरूप धारण करतात. याकरितां अद्ययावत् अशा संस्थांच्या व कलांच्या रूपानें संचित झालेल्या अनुभवांची व विचारांची मीमांसा, आणि विज्ञानांच्या मूलभूत कल्पनांवर टीका, करीत असतां तत्त्वज्ञान वाढत असतें.

## भिन्न तत्त्वज्ञानांचा परस्परसंबंध

तत्त्वज्ञानास दुसरी एक महत्त्वाची जबाबदारी पार पाडावी लागते. पुरातन व समकालीन तत्त्वज्ञानांची समीक्षा करणें ही ती जबाबदारी होय. प्रमाणांच्या भक्कम आधारावर बुद्धिवादाच्या आश्रयानेंच कोणतेंहि तत्त्वज्ञान अस्तित्वांत येतें. त्याशिवाय तत्त्वज्ञान ही पदवी कोणत्याहि विचारसरणीस लाभत नसते. पुरातन व समकालीन तत्त्वज्ञानांचीं आधारभूत प्रमाणें व बुद्धिवादी चर्चा यांचें महत्त्वमापन करून त्यांचा निकाल लावावा लागतो. तो निकाल तीन पद्धतींनीं लागत असतो. एक तर विरोधी तत्त्वज्ञानाच्या मूलभूत वा प्राणभूत तत्त्वांचें खंडन करून त्यांचा मिथ्या कल्पना म्हणून त्याग करतात, किंवा विचारेतिहासांतील एक महत्त्वाची पायरी म्हणून त्यांना तत्त्वज्ञानांच्या इतिहासांत जमा करतात, अथवा आपल्या तत्त्वज्ञानाच्या विशाल रचनेची एक बाजू म्हणून त्या विरोधी तत्त्वज्ञानास साफसूफ करून सुधारून किंवा बदल करून स्थान देत असतात. पुराणप्रतिष्ठा मिळविलेलीं (Classical) दर्शनें इतर दर्शनांचा प्रथम पद्धतीनें प्रतिवाद करूनच आत्मसमर्थन करतात. अलीकडे तत्त्वज्ञान हा सामाजिक विकासक्रमाचा एक भाग आहे असें मानणारे इतिहासवादी



अनुक्रमणिका






दुसरी पद्धति स्वीकारतात. शंकराचार्यांच्या वेदांतीं आणि हेगेलच्या आत्मदर्शनाने यांनी तिसरी पद्धति स्वीकारली आहे. आधुनिक समीक्षकानें या तिन्ही पद्धतींचा मेळ घालूनच दर्शनांचा परामर्ष घेतला पाहिजे.

## तत्त्वज्ञानाची नैतिक प्रेरक शक्ति

उदात्त दार्शनिक विचार मानवजातीच्या मंद गतीनें चाललेल्या चढणीच्या प्रवासांत मानसिक सामर्थ्य निर्माण करून प्रगतीला मदत करूं शकतात. आपणांस सध्यां तर नव्या प्रतापी विचारांची गरज आहे. हिंदी समाज आणि मनुष्यजाति विनाशपरंपरेच्या दुष्ट चक्रांत सांपडली आहेत. म्हणून त्यांतून बाहेर पडण्यास समर्थ करणारी विचारसरणि आपणांस निर्माण केली पाहिजे. भिन्न भिन्न संस्कृती व भिन्न भिन्न राष्ट्रें यांच्यांतील विरोध व शत्रुत्व अधिकाधिक विकोपास जात आहेत; परंपरागत संस्कृतींचा विरोध नष्ट करून सर्व राष्ट्रांच्या जीवनांत संवादित्व आणि समतोलपणा राखणारी नवी मानवी संस्कृति उदयास यावयास पाहिजे. सगळ्या ऐतिहासिक धर्मांच्या आणि परंपराप्राप्त संस्कृतींच्या पेक्षां वरिष्ठ आणि प्रभावी असलेली नैतिक विचारसरणीच जगाला व या देशाला विपत्तींतून बाहेर नेऊं शकेल; मानवी बंधुत्वाचा आणि बुद्धिवादाचा विजय करणारी नैतिक विचारसरणीच या वेळीं तारूं शकेल.

## भारतीय दर्शनें व भारतीयांची प्रगति

भारतीयांच्या पाशीं मानवजातीला सहकार्य आणि बंधुत्व यांच्या मार्गावर नेणारी आध्यात्मिक विचारसंपदा आहे, असें म्हणतात. या आध्यात्मिक उदार वैभवाचें प्रत्यक्ष प्रत्यन्तर आपणांस आजच्या भारतीयांच्या सामाजिक संस्थांमध्यें तर मुळींच दिसत नाहीं. आपलें आजचें राजकारण किंवा समाजकारण मत्सरानें ग्रासलेलें व वैरानें तापलेलें आहे. गेलीं कित्येक शतकें तर भारतीयांची विद्या, कला, वाङ्मय आणि राजकारण यांच्यामध्यें वाढ खुंटलेलीच दिसते. अशा स्थितींत आपण जगाला आध्यात्मिक संदेश द्यावयाच्या ऐवजीं अंतर्मुख होऊन आत्मसंशोधनच केलें पाहिजे. आपली ही ऐतिहासिक अधोगति आपणांस उपरोधिकपणें असें सुचवीत आहे कीं, आतां तो आपला तथाकथित आध्यात्मिक संदेशच त्याकरितां तपासण्याची वेळ आली आहे. असेंहि संभवतें कीं, उदात्त विचारांची परंपरा जरी लाभलेली असली तरी त्यांचें वैशिष्ट्य खुलविणें किंवा लोपविणें ही गोष्ट प्रत्यक्ष मूर्त रूपानें वाढीस लागलेल्या व दृढमूल झालेल्या सामाजिक संस्थांच्या हातीं असते. भारतीयांची आध्यात्मिक संस्कृति आणि त्यांचीं तत्त्वदर्शनें यांना परिणामकारक व प्रभावी स्वरूप प्राप्त झालें नाहीं. त्यांना परिणामकारक व प्रभावी स्वरूप यावयास त्यांचें पुनर्मूल्यमापन झालें पाहिजे. आजच्या विज्ञानांच्या दृष्टीनें मिथ्या व व्यर्थ ठरलेल्या अनेक कल्पनांच्या जंजाळांत भारतीय दर्शनें गुंतून पडलीं आहेत. कल्पनांचें तें जंजाळ वेगळें करून, त्यांतून चिरस्थायी, आनुभविक व बौद्धिक तत्त्वें निवडलीं पाहिजेत. गेल्या शतकांत इंग्रजी राज्याच्या शांत वातावरणांत हें कार्य करण्याचें सोडून आधुनिक सुशिक्षितांनीं अति गुप्त व दुष्ट अहंतेमुळें भारतीय विचारांच्या भोंवतीं अधिक गूढ वातावरण निर्माण केलें व बुद्धिवादविरोधी चळवळीचा (Anti--intellectualism-चा) झेंडा उभारून भारतीय तत्त्वज्ञानाला जगाच्या आखाडीवर उभें केलें. त्यामुळें भारतीय तत्त्वज्ञानाचें बौद्धिक मूल्य अधिक दृष्टीआड झालें व भारतीयांच्या बौद्धिक जीवनाला आवश्यक असलेलें अधिष्ठान लाभलें नाहीं. ज्यांनीं भारतीयांच्या बौद्धिक संस्कृतीचा खरा अंदाज घेण्याचा प्रयत्न केला असे फार थोडे लोक झाले. वस्तुतः सर्व भारतीय तत्त्वज्ञानें उच्च दर्जाच्या तार्किक व्यवस्थेचीं पुराणकालांतील आदर्शभूत प्रतीकें होत, ही गोष्ट विसरून नवशिक्षित दार्शनिकांनीं गूढवादाच्या आवरणाखालीं त्यांची बौद्धिक तेजस्विता लोपवून टाकली. त्यामुळें ही भारतीयांची आध्यात्मिक परंपरा भविष्यकालाला मार्गदर्शक संदेश देऊं शकत नाहीं येवढेंच नव्हे, तर ती गूढवादाखालीं आत्मवंचना वाढीस लावून संमोह व कृतार्थतेची खोटी जाणीव उत्पन्न करते. या धोक्यांतून बाहेर पडण्याकरितां भारतीय तत्त्वज्ञानांतील जे विचार तर्कदृष्ट्या स्पष्ट आणि निश्चित स्वरूपाचे












असतील ते वेगळे करावयास पाहिजेत, अस्पष्ट व गूढ कल्पना यांची मर्यादा ठरविली पाहिजे आणि चिरस्थायी नैतिक मूल्यांना अंधश्रद्धेच्या पकडींतून मोकळें केलें पाहिजे.

### भारतीय तत्त्वदर्शनाची वैदिकधर्मरूप पार्श्वभूमि

~~प्रगल्भ~~ अवस्थेस पोंचलेला धर्म तत्त्वदर्शनाची विशाल पार्श्वभूमि विश्वरचनाशास्त्र सांगून प्रथम निर्माण करतो. ऐतिहासिक दृष्ट्या तत्त्वदर्शनें हीं धर्मविचारांचा वारसाहक्क आपणांकडे घेऊन धर्माचे उत्तराधिकारी बनतात. ~~समाजांतील इतर कोणतीहि मानवसंस्कृतीची शाखा तत्त्वदर्शनास आवश्यक असलेली वैचारिक पार्श्वभूमि इतक्या व्यापक स्वरूपांत प्राचीन काळीं निर्माण करूं शकली नाहीं.~~ संपूर्ण विश्वाच्या मननांत तन्मय करण्याचें सामर्थ्य प्रगल्भ अवस्थेस पोंचलेल्या धर्माचे ठायीं असतें. विज्ञान-युगापूर्वी धर्मामुळेंच विश्वाची व्यापक भावनापूर्ण खोल संवेदना धार्मिक मनुष्यांच्या मनाला आकर्षून टाकीत असे. अनंत विश्वाचें आकलन करण्याची प्रबल जिज्ञासा उत्पन्न झाल्या-शिवाय बौद्धिक अधिष्ठानावरचें तात्त्विक संशोधन सुरू होऊं शकत नाहीं. विश्वरहस्याचा शोध करा-वयास लावणाऱ्या या जिज्ञासेस आवश्यक असलेल्या आकांक्षा प्रथम धर्मांत प्रकट होतात.

भारतीय तत्त्वज्ञान प्रथम वैदिक धर्माच्या वाता-वरणांत जन्मलें. तें प्राचीन उपनिषदांत ग्रथित केलें आहे. उपनिषदांतील प्रौढ तत्त्वज्ञानाची बाल्यावस्था वेदांतील धर्मांत प्रत्ययास येते. उपनिषदांतील अनेक प्रगल्भ तत्त्वें पूर्वकालीन वाङ्मयांत वाढीस लागलेलीं दिसतात. विश्वाची सुसंगत रचना वैदिक ऋषींच्या मनाला विस्मय, आदर, पूज्यबुद्धि, यांनीं भारून टाकते. विश्वाच्या विशालतेनें व सौंदर्यानें त्यांचें मन मोहून गेलेलें आहे. त्यांच्या अगणित कामना तृप्त करण्याचें अनंत सामर्थ्य त्यांना विश्वशक्तींत प्रतीत होत आहे. विश्वाच्या शक्ती त्यांच्या दृष्टीनें देव होत. त्यांच्या दृष्टीनें त्या अमर आहेत आणि मनुष्याच्या आत्म्यास अमर करण्याचें त्यांच्यांत सामर्थ्य आहे असें त्यांस वाटतें. 'मी मर्त्य त्या अमर अग्नीला आवाहन देतों,' असें वैदिक ऋषि म्हणतो. ऐहिक जीवनाची स्वर्गाइतकी किंवा त्यापेक्षां जास्त महती वैदिक ऋषींना वाटते. त्यांच्या दृष्टीनें स्वर्ग आणि भूलोक हे सारखेच पवित्र आहेत, स्वर्गाचें व इह-लोकाचें रहस्य एकच आहे.

अशा प्रकारें अद्वैतवादाची संपूर्ण सामग्री व पूर्वतयारी उपनिषदांपूर्वीच्या वैदिक वाङ्मयांत तयार झालेली सांपडते. विश्वाच्या उत्पत्तीचें गहनत्व वैदिक ऋषींना गंभीर भावनेनें भारून टाकतें. पुराण-कथेच्या स्वरूपांत—देवतेच्या जीवन-चरित्राच्या रूपांत विश्वोत्पत्तीचें व विश्वरचनेचें गूढ उकलण्याचा प्रयत्न वैदिकांनीं प्रथम केला; परंतु त्याबद्दलचा बौद्धिक असंतोष कायमच राहिला; याचेंहि उदाहरण वेदांत आढळते. अग्नि, तारकामय आकाश, प्रकाश, वायु, जल, पृथ्वी, सूर्य, चन्द्र, पर्जन्य, ~~समुद्र~~ इत्यादि वस्तू व शक्ती निरनिराळ्या देवता होत, असें वैदिक ऋषी मानतात. परंतु त्या सर्व देवता एकाच मातेच्या पोटीं जन्मल्या आणि सकल विश्व म्हणजे त्यांचाच संसार होय. ती देवतांची माता म्हणजे आदितिदेवता होय. 'एका'तूनच 'अनेक' जन्माला येतें हें तत्त्व वेदास प्रथमपासून मान्य दिसतें. मनुष्य हा त्या विश्वशक्तिरूप देवतांच्याच समुच्चयानें बनलेला पिंड आहे. त्या विश्वशक्तीच मानवांतील सूक्ष्म इंद्रियसामर्थ्यें होत, ही कल्पना उपनिषत्पूर्व वाङ्मयांत रूढ झालेली दिसते. सूर्याचाच चक्षु बनला, वायूचा प्राण बनला, पृथ्वीचें शरीर बनलें, अशा तऱ्हेच्या विविध कल्पना मानव-रचनेबद्दल त्यांनीं केल्या आहेत.

ऋग्वेदांतील नंतरच्या विभागांत आणि इतर वेदां-मध्यें विश्व ही सजीवशरीरवत् संघटना आहे या कल्पने-लाहि महत्त्व आलेलें दिसतें. विश्व हा प्रजापति आहे. तो प्रजापतीच सूक्ष्मरूपानें प्रथम असतो व नंतर स्थूल-रूप धारण करतो; त्यास दृश्य विश्व म्हणतात. सजीव सृष्टीच्या रूपानें, मनुष्यरूपानें व समाजरूपानें तोच जन्मतो, अशा कल्पना वेदांत वारंवार सांपडतात. परंतु विश्व हें मुळांत कसें असावें याबद्दलच्या कल्पना वैकल्पिक रूपानें अनेक प्रकारें मांडलेल्या सांपडतात. त्यासंबंधीं सर्व वेदांमध्यें सुसंगति व ऐकमत्य स्थापन करण्याचा प्रयत्न केला, तरी तो चांगल्या रीतीनें यशस्वी होऊं शकत नाहीं. कांहीं ठिकाणीं अग्नितत्त्व किंवा उष्णता मूलभूत मानून विश्व हें अग्नीचेंच

व्यक्त स्वरूप मानलें आहे; अग्नीच्या ऐवजीं वायु मूळ स्वरूप मानून त्यांतून सर्व देवता आणि पदार्थ बाहेर आले असें सांगितलें आहे; जल हें आदितत्त्व आहे हीहि कल्पना वारंवार आढळते; भौतिक सूक्ष्म तत्त्वांचाच व्यक्त आविर्भाव होऊन निर्जीव व सजीव सृष्टि झाली आहे; अशा कल्पना मांडल्यानंतर किंवा त्यांच्या समकालीं दुसऱ्याहि तुल्य–बल कल्पना मांडलेल्या सांपडतात. काम, प्राण, मन, वाणी, आकाश, काल, सत्, असत्, हीं व अशीं अनेक तत्त्वें विकल्पानें विश्वाचें मूळ अधिष्ठान म्हणून कल्पिलीं आहेत. पण त्यांत समाधान न पावून 'विश्वाच्या आरंभाबद्दलचा प्रश्न कोणीच सोडवूं शकत नाहीं,' असें म्हणण्यापर्यंत एक ऋषि आला आहे. तो म्हणतो:––

"तेव्हां म्हणजे मुळारंभीं असत् नव्हतें आणि सत्‌हि नव्हतें! अंतरिक्ष नव्हतें आणि त्यापलीकडचें जें आकाश तेंहि नव्हतें. तेव्हां मृत्यु म्ह० मृत्युग्रस्त नाशवंत दृश्य सृष्टि नव्हती व म्हणून (दुसरा) अमृत म्ह० अविनाशी नित्य पदार्थ(हा भेद)हि नव्हता. (तसेंच) रात्र आणि दिवस यांचा भेद कळण्यास कांहीं साधन नव्हतें. (जें काय होतें) तें एकलें एकच स्वधेनें म्ह० आपल्या शक्तीनें वायूशिवाय श्वासोच्छ्वास करीत म्ह० स्फुरत होतें. त्याखेरीज किंवा त्यापलीकडे दुसरें असें कांहींच नव्हतें. सताचा हा विसर्ग म्हणजे पसारा कशापासून किंवा कोठून आला, हें विस्तारानें येथें कोण सांगणार? तें कोण निश्चयात्मक जाणतो? देवहि या (सत्–सृष्टीच्या) विसर्गानंतरचे. मग ती जेथून निघाली तें कोण जाणणार? (सताचा) हा विसर्ग म्हणजे पसारा जेथून झाला, किंवा तो निर्मिला गेला अगर न गेला तें परम, आकाशांत असणारा या जगाचा जो अध्यक्ष तो जाणत असेल किंवा नसेलहि! (कोणीं सांगावें?)" (ऋग्वेद. मंडल १०, सूक्त १२९.)

## उपनिषदांची विचारपद्धति

उपनिषदांच्या पूर्वी झालेल्या वैदिक वाङ्मयांतील विचारांचें स्वरूप बौद्धिक मननासारखें नसून त्यांचा आकार कविकल्पना आणि पौराणिक कथा यांच्यासारखा आहे. त्यांतील प्रश्नांचें व संशयांचें स्वरूप तार्किक नाहीं. गाढ धार्मिक श्रद्धा व देवकल्पना यांचें प्रभुत्व त्यांत सर्वत्र पसरलेलें दिसतें. उपनिषदांत त्या श्रद्धेला व देवताशास्त्राला बदलून टाकणारा बौद्धिक विचार प्रथम प्रकट झालेला दिसतो. ज्ञान ईश्वरानें आणि ईश्वरी प्रसाद झालेल्या दिव्यदृष्टीच्या व्यक्तींनीं प्रकट केलें आहे, या कल्पनेची छाप त्यांत क्वचित् आढळते; परंतु पुष्कळ ठिकाणीं त्यांतील चर्चा म्हणजे माणसांचा बौद्धिक विचार–विनिमय आहे; त्यांतील परमार्थ मानवी आहे; त्यांतील परमसिद्धांत मानवांच्या सूक्ष्म बुद्धीला गम्य आहे. पौराणिक कथा कलात्मक विचारसूचक साधन म्हणून त्यांत वापरली आहे; देवताशास्त्राला त्यांत दुय्यम स्थान आहे; देवांची व ईश्वराची मानवस्वरूपी कल्पना रूपक म्हणून त्यांत आली आहे. कारण वेदांमध्येंहि ती स्पष्ट व मूर्त स्वरूपांत दृढमूल केव्हांच झाली नव्हती. देवांचें मानवी रूप अत्यंत अस्पष्ट असेंच तेथें आहे; तेथें तें तसें आहे आणि तसें नाहीं, असें दोन्ही रीतींनीं म्हणतां येतें, हें समजण्याकरितां उपनिषदांतील विचार हे निरनिराळ्या पातळ्यांतील आहेत हें मात्र समजलें पाहिजे; त्यांतील त्या भिन्न भिन्न पातळ्या सहज ओळखतां येतात.

त्यांत तत्त्वज्ञानाची पातळी मुख्य व महत्त्वाची आहे व ती एकदम ध्यानांतहि भरते. प्रत्यक्ष सूक्ष्म अनुभवाला त्यांत उच्च दर्जाचें स्थान आहे; परंतु तार्किक पद्धतीशीं त्याचा विरोध नाहीं. बौद्धिक अन्वेषणा आणि तार्किक निर्णय यांचा तेथेंच प्रथम प्रारंभ झाला असल्यामुळें सुसंघटित दर्शनाच्या पदवीस ते तेथें पोंचले नाहींत. उपनिषदें ही संघटित दर्शनांची (Philosophical Systemची) पूर्वावस्था आहे. त्यांतून सुप्रसिद्ध भारतीय प्राचीन संघटित दर्शनें उगम पावलीं आहेत.

## उपनिषदांतील अद्वैतवाद

प्राचीन उपनिषदांतील विचार अद्वैत–जडवाद व अद्वैत–चेतनवाद यांच्या सीमेवर उभे असून ते दोन्ही दर्शनांच्या अंतःप्रदेशांत खोलवर व दूरवर प्रकाश टाकीत आहेत. वेदांतील 'देवता' ही कल्पना उपनिषदांतील तत्त्वांच्या भोंवतीं अस्पष्ट तेजोवलयासारखी रेंगाळत आहे. पुष्कळ ठिकाणीं

परंपरेची गौण पार्श्वभूमि म्हणूनच तिचें समर्थन करतां येतें. उपनिषदें जडवादपर आहेत असें प्रतिपादन करणारा संप्रदाय पूर्वी एकदां अस्तित्वांत होता. म्हणूनच उदाहरणार्थ, बादरायणाच्या ब्रह्मसूत्रांमध्यें प्रतिवादी म्हणून जडवादी सांख्यांचें मत मांडलें आहे, त्यावरून व त्यांवरील शंकराचार्यांच्या भाष्यावरून असें सांगतां येतें कीं, जडवादी सांख्य–दर्शन ब्रह्मसूत्रांच्या पूर्वी अस्तित्वांत आलें होतें आणि त्या दर्शनांत उपनिषदांच्या आधारें जडवादाची उपपत्ति समन्वय करून सिद्ध केली होती. उपनिषदांतील ब्रह्मतत्त्व भौतिक प्रकृति होय, असा सिद्धान्त प्राचीन सांख्यांनीं स्थापित केला होता. या विधानाला पूरक प्रमाणें महाभारतांतील शांतिपर्वांत आणि चरक–संहितेंत मिळतात. सध्यां प्रसिद्ध असलेलें सांख्य–दर्शन प्रकृति आणि पुरुष अशीं भिन्न मूळ तत्त्वें मानतें. केवळ जड प्रकृतीच एक तत्त्व मानून त्यांतून तेवीस तत्त्वांचा विस्तार मांडणारें अद्वैतजडवादी सांख्य–दर्शन ब्रह्मसूत्रांपूर्वी अस्तित्वांत होतें. तें उपनिषदांच्या चिंतनांतून निर्माण झालें होतें. नैसर्गिक धर्मांतून निर्माण झालेल्या उपनिषदांतील कल्पनांचा जडवादी अर्थ होणें अगदी सहज तर्कप्राप्त आहे.

## जडवादाकडे झुकलेले उपनिषदांतील विचार

जडवाद सूचित करणारे अत्यंत महत्त्वाचे विचार उपनिषदांत विखुरलेले सांपडतात. उदाहरणार्थ, छांदोग्यांतील ब्रह्मप्रकृतिविचार. छांदोग्य–उपनिषदांतील सहावा अध्याय हा उपनिषद्–वाङ्मयांतील विचारांची बौद्धिक उंची दाखविणारा महत्त्वाचा टप्पा आहे. 'तत् त्वं असि' म्हणजे 'तेंच तूं आहेस' हा निष्कर्ष त्यांत सांगितला आहे. तें म्हणजे विश्वतत्त्व; हें विश्वतत्त्व 'सत्' या शब्दानें तेथें बोधित केलें आहे. तेंच जगाचें संपूर्ण कारण आहे; तेंच जगत् आहे; आणि जगताचा लय त्यांतच होतो. या 'सत्' तत्त्वाची मीमांसा करतांना घेतलेले अनेक दृष्टांत उपादान( म्ह० प्रकृतिरूप )–कारणाचे आहेत. उपादान–कारण आणि कार्य एकच आहेत, ही जाणीव सगळ्या वेदांमध्यें भरून राहिलेली प्रत्ययास येते. त्यामुळें उपनिषदांवर आधारलेले बहुतेक वेदान्ती संप्रदाय ईश्वरास प्रत्यक्षपणें किंवा अप्रत्यक्षपणें विश्वाचें उपादान–कारण समजतात. ईश्वर हा विश्वाची प्रकृति आणि कर्ता असा दोन्हीहि आहे असें ते समजतात आणि कार्य आणि कारण एक मानून अद्वैतवाद सर्वस्वीं किंवा अंशतः स्वीकारतात.

प्राण हा जलमय आहे आणि मन हें अन्नाचें बनलें आहे, असें अत्यंत विशद रीतीनें छांदोग्य-उपनिषदांत म्हटलें आहे. हाहि विचार जडवाद दर्शित करतो. दुसरी एक कल्पना अशाच प्रकारची आहे, ती अशीः—विश्व हें प्राण्यांचें व मनुष्यांचें अन्न आहे; परंतु त्याबरोबरच प्राणी व मनुष्य हेहि स्वतःच अन्न आहेत. भोग्य आणि भोक्ता तत्त्वतः भिन्न नाहींत असें जें तैत्तिरीय–उपनिषदांत म्हटलें आहे तें जडवादसूचक आहे. भूतवस्तूंचें सार पृथ्वी होय, पृथ्वीचें जल होय, जलाचें सार अन्न, अन्नाचें सार माणूस आणि भाषेचें सार वेद होत, असें छांदोग्यांत व बृहदारण्यकांत म्हटलें आहे; यांतून जडवादी भावार्थ निघूं शकतो.

बृहदारण्यकांत सम्राट् जनकानें बोलाविलेल्या तत्त्वज्ञांच्या सभेचा वृत्तांत सांगितला आहे. त्या सभेंत सर्वांत श्रेष्ठ ठरलेल्या ब्रह्मज्ञ याज्ञवल्क्याशीं वादविवाद झाला. अनेक विद्वानांनीं विचारलेल्या मूलभूत प्रश्नांचीं उत्तरें दिल्यावर याज्ञवल्क्यानें स्वतःच एक प्रश्न विचारला व त्याचें उत्तर कोणासच देतां आलें नाहीं आणि त्यानंतर लगेच ती सभा विसर्जन पावली. हा प्रश्न पुनर्जन्मावर असून जडवादसूचक आहे, तो प्रश्न असा: —"मनुष्य आणि वृक्ष खरोखर अगदीं सारखेच आहेत; वृक्षाला पानें आहेत तसे याला केस आहेत, त्याला साल आणि याला त्वचा, त्याच्यांत रस आणि याच्यांत रक्त, त्याच्यांत कठिण लाकडाचा भाग आणि याच्यांत हाडें आहेत. वृक्ष मूळ राखून तोडला तर तो पुनः मुळांतून फुटतो; पण माणूस मृत्यूनें तोडला असतां पुनः कशांतून जन्मतो ? माणूस रेतापासून पुनः जन्मतो असें जर कोणी उत्तर देईल तर त्याला माझा प्रश्न समजला नाहीं. वृक्षहि बीजापासून उत्पन्न होतो; बीज किंवा मूळ राखलें नाहीं तर वृक्ष उत्पन्न होत नाहीं. त्याप्रमाणें बीजावांचून मनुष्य पुनः कसा



अनुक्रमणिका






उत्पन्न होईल ? " या प्रश्नाचं उत्तर कोणींच दिलें नाहीं. उत्तर निष्पन्न न होतांच ती सभा संपली. या प्रश्नाच्या स्वरूपावरून उपनिषदांतील विचारपद्धतींचें बौद्धिक स्वरूप ध्यानांत भरण्यासारखें आहे.

## उपनिषदांतील अध्यात्मदर्शन

उपनिषदांमध्यें सर्वांत प्रभावी आत्मविषयक दर्शन होय. 'आत्मज्ञ हा सर्वज्ञ होतो; म्हणून आत्म्याला जाण; त्यांतच तुझें परम कल्याण आहे,' असा संदेश मनुष्याला त्यांनीं दिला आहे. आत्मविषयक तत्त्वज्ञान हें विचार करतां करतां अत्यंत गहन अशा विचारांत शिरून गूढवादी बनतें. तसा गूढवाद उपनिषदांमध्यें कांहीं ठिकाणीं स्पष्टपणें दिसून येतो; परंतु आत्म्याचा प्रश्न हा सुद्धां बौद्धिक प्रश्न आहे, असें पुष्कळ ठिकाणीं दिसतें. 'आत्मपूजक मनुष्य हा देवपूजकापेक्षां श्रेष्ठ आहे; देवपूजक हा देवांचा भारवाही पशु आहे. आत्म्याचें ज्ञान मनुष्यांना होऊं नये अशी दुष्ट इच्छा देवांना असते; कारण, त्यामुळें आपलें दास्य मनुष्यें करणार नाहींत असें भय त्यांस वाटत असतें' असें उपनिषदांत घोषित केलें आहे. आत्मविषयक संशोधनाला या विचारापासूनच खरी सुरुवात होते.

सर्वच विश्व आत्मा आहे, असा सिद्धान्त उपनिषदांनीं काढला आहे आणि तो तर्कबुद्धीस अगम्य आहे असें तत्त्वज्ञ म्हणतात. परंतु त्यांत बुद्धीचा प्रवेश होऊं शकत नाहीं असा उपनिषदांचा आशय दिसत नाहीं. बुद्धिवादानें जडदेहाहून अन्य असा आत्मा सिद्ध करूं पाहणारीं प्राचीन तार्किक दर्शनें आपलीं साधक प्रमाणें उपनिषदांतूनच उचलतात, असा शंकराचार्यांचा त्यांच्यावर आक्षेप आहे. यावरून आत्मविद्या तर्कशास्त्राच्या मर्यादेच्या अतीत संपूर्णपणें आहे हें म्हणणें बरोबर नाहीं असें म्हणतां येतें. उदाहरणार्थ, शंकराचार्यांनीं बृहदारण्यकोपनिषदांतील सर्व अध्याय गौतमाच्या तर्कशास्त्रांतील पंचावयव न्यायाकारांत मांडून दाखविले आहेत.

कांहीं आत्मविषयक मूलभूत कल्पना बुद्धिगम्य स्वरूपाच्या सांपडतात: ( १ ) इंद्रियें आणि मन यांच्या कार्यांची संगति राखणारें आणि त्याकरितां जाणिवेच्या रूपानें प्रकट होणारें तत्त्व म्हणजे आत्मा होय. ( २ ) शरीरांतलि सर्व प्रवृत्तींचें प्रवर्तक तत्त्व म्हणजे आत्मा होय. ( ३ ) शरीरधारणार्थ व ध्येयसिद्धयर्थ आवश्यक असलेले नवे नवे बदल करून अनिष्ट अशा विद्यमान व भूतपूर्व घटनांपासून अलिप्त राहण्याचा प्रयत्न करून अलिप्त राहण्यांत यश मिळविणारें म्ह० पापावर विजय मिळविणारें तत्त्व म्हणजे आत्मा होय. ( ४ ) सतत बदलणाऱ्या अशा शरीरांत भूत, वर्तमान व भविष्य अशा तिन्ही काळीं एकत्व व व्यक्तित्व राखणारें तत्त्व म्हणजे आत्मा होय. ( ५ ) इंद्रियें आणि मन हीं निद्रेच्या वेळीं ज्यांत लीन होतात आणि ज्यांतून जागृतीच्या वेळीं प्रकट होतात तें तत्त्व आत्मा होय. ( ६ ) शरीर, इंद्रियें, जीवनशक्ति आणि मन यांच्याहून तें आत्मतत्त्व भिन्न नाहीं; परंतु तीं भिन्न-भिन्न दिसतात; म्हणून त्यांचें एकत्व ज्याच्यामुळें आहे तें तत्त्व आत्मा होय.

इंद्रियें, जीवनशक्ति आणि मन यांच्यासह हें शरीर ज्या विश्वांत उत्पन्न झालेलें आहे, तेंहि विश्व शरीरांतील आत्मतत्त्वाचेंच स्वरूप आहे असें उपनिषदांतील युक्तिवाद सांगतो. विश्वांतील नियमबद्धता किंवा विश्वांतील घडामोडींची म्हणजे सृष्टिव्यापारांची सुसंगति ही विश्वाची मौलिक एकता म्हणजेच आत्मरूपता सिद्ध करते. विश्वांतील सृजनशक्ति शरीरांतील सृजनशक्तीसारखीच आहे; म्हणून सृजनशक्तीचें दोन्ही ठिकाणचें अधिष्ठान एकच असलें पाहिजे; तोच आत्मा होय. द्रष्टा व दृश्य यांचा मौलिक भेद उपनिषदें मानीत नाहींत, त्याचप्रमाणें कर्ता व कार्य यांचाहि मौलिक भेद मानीत नाहींत; म्हणून देह व आत्मा, विश्व व परमात्मा यांचा मौलिक भेद तीं मान्य करीत नाहींत. जड व चेतन हे वस्तुतः एकच आहेत असा उपनिषदांचा निष्कर्ष आहे.

प्राचीन उपनिषदांतील विचारांची अगदीं सामान्य रूपरेषा वर दिग्दर्शित केली आहे. त्यांतील मनुष्याच्या निःश्रेयसाचें आणि नीति—तत्त्वाचें प्रतिपादन सुद्धां बुद्धिवादी आहे असें निश्चित म्हणतां येतें.








## उपनिषदांतील नीतिशास्त्र

विश्वाचे नियम हे देवांच्या वर्तनाचे नीतिनियम होत; विश्व नियमांवर अधिष्ठित आहे म्हणजेच नीतीवर अधिष्ठित आहे. विश्वाच्या मूलभूत नियमांचा गाभा म्हणजे ' ऋत ' होय असा हा वेदांचा सिद्धान्त उपनिषदांच्या नीतिशास्त्राची पार्श्वभूमि होय. त्याच्या आधारें मानवी जीवनाचे अबाधित नियम उपनिषदांच्या नीतिशास्त्राचा पाया बनले आहेत. किंबहुना उपनिषदांचें तत्त्वज्ञान हें अत्यंत व्यापक अर्थानें नीतिशास्त्रच होय. मानवाच्या अंतिम ध्येयाशींच त्या तत्त्वज्ञानाची सर्व बाजूंनीं सांगड घातलेली दिसून येते. अंतिम ध्येयाचा विचार उपनिषदांच्या प्रत्येक तात्त्विक चर्चेंत प्रतिबिंबित झाला आहे. औपनिषदिक नीतिशास्त्राचे सिद्धान्त पुढीलप्रमाणें आहेतः—( १ ) मनुष्य काममय आहे; कामनेची तृप्ति होण्याकरितां त्याचा प्रयत्न आहे. ज्याच्या योगानें इष्ट—लाभ होईल आणि अनिष्ट टळेल अशी स्थिति त्याला पाहिजे. ही स्थिति म्हणजेच संपूर्ण स्वातंत्र्याची आनंदमय स्थिति. स्वातंत्र्य म्हणजे उपनिषदांच्या भाषेंत 'यथाकामचारिता' किंवा 'अल्पकामता'. हीच ती उच्च स्थिति होय. (२) मनुष्याची सर्व कामना वस्तुतः त्याच्या स्वतःच्या ठिकाणीं केंद्रित झाली आहे. त्याचा संपूर्ण प्रेमाचा विषय त्याचा स्वतःचा आत्मा होय. पति, पत्नी, पुत्र, वित्त, गुरु, शूर पुरुष, देव, वेद, प्राणिमात्र व सर्व विश्व—यांवर मनुष्याचें जें प्रेम असतें, त्याचें निरुपाधिक आलंबन स्वतःचा आत्मा होय. तें सर्व प्रेम आत्म—प्रेमच होय. उपनिषदांना द्वैतवाद संमत नसल्यामुळें त्यांच्या दृष्टीनें आपल्या शरीराच्या गरजा सुद्धां आत्म्याच्याच गरजा आहेत. आरोग्य, दीर्घायुष्य, संपत्ति, संतति, स्वामित्व, इत्यादि ऐहिक सुखांचाहि अंतर्भाव आत्मसुखांत होतो. बुद्धिमत्ता (मेधा),विद्वत्ता (ब्रह्मवर्चस्), शहाणपण(पाण्डित्य), मधुर वाणी (सूनृता वाक्) या गुणांचीहि त्यांना महती वाटते; परंतु सत्यनिष्ठा, अहिंसा, ऋजुता, दया, औदार्य, तप, इत्यादि गुण आत्मप्रेमाच्या अंतिम विकासाचीं लक्षणें होत व असत्य, हिंसा, मायावीपणा, वक्रता हीं आत्मद्रोहाचीं चिन्हें होत. (३) सर्व कर्मांचें उगमस्थान आणि सर्व प्रयोजनांचा आश्रय स्वतः आत्मा म्हणजे जाणिवेचें अधिष्ठान असलेली व्यक्ति होय. सर्व भूतें, देव व पितर यांचा हाच लोक होय. सर्व कर्तव्यांचा निकष आत्मा होय. म्हणूनच संसारांत अलिप्तपणें शंभर वर्षेंपर्यंत कर्में करीत औदार्यानें जे जगूं इच्छीत नाहींत, ते आत्मविरोधी—आत्महत्यारे होत,असें ईशोपनिषदांत म्हटलें आहे. मनुष्याचें वरिष्ठ ध्येय आत्मप्राप्ति हेंच होय. कारण त्यांतच सगळी कामना तृप्त होते. आत्म्याच्या बाहेर, आत्म्याहून अन्यत्र पारतंत्र्य राहतें आणि आत्म्याच्या क्षेत्रांतच स्वातंत्र्य असतें. कारण आत्माच स्वतंत्र आहे म्हणून आत्म्यांतच सर्व जगत् आहे असें सिद्ध करतां आलें व तसें समजलें तरच संपूर्ण स्वातंत्र्य भोगतां येईल. आत्मप्राप्ति म्हणजे आत्मज्ञान होय. मनुष्याचें श्रेष्ठ ध्येय परलोकांत नाहीं, तर याच जगांत तें मिळविलें पाहिजे; नाहीं तर महान् विनाश होतो. देव किंवा स्वर्ग यांच्यापेक्षां आत्मा हें अधिक मोठें सत्य व श्रेय आहे. तो आत्मा म्हणजेच ब्रह्म. त्या आत्म्याचें सत्य हें स्वरूप होय; तो जीवनांत रमतो, मनांत म्हणजे मानसिक सृष्टींत आनंदाचा उपभोग घेतो, शांति हें त्याचें वैभव आहे व ज्ञान हें त्याचें अमृत आहे. आदर्श मनुष्य ' अकामहत श्रोत्रिय ' होय; म्हणजेच तो कामनांच्या आणि लोभाच्या माऱ्यांतून सुटलेला ज्ञानी पुरुष होय. त्याच्या ठायीं—त्याच्या हृदयांत वसत असलेला आनंद जगाचें राज्य करणाऱ्या तरुण, विद्वान् व निरोगी सम्राटाच्या आनंदाइतका मोठा आहे. तो विश्वरूपी शरीर धारण करणाऱ्या परमेश्वराच्या हृदयांतील आनंदाइतका मोठा आहे. ( ४ ) वरिष्ठ ध्येयाकडे जाण्याकरितां बुद्धि हा सारथि, आत्मा हा रथी, शरीर हा रथ, मन हा लगाम, इंद्रियें हे अश्व आणि ज्ञेय विश्व हा मार्ग होय. बुद्धि हा सारथि मिळाला नाहीं, तर रथ खड्ड्यांत जाऊन पडतो आणि प्रवासी आत्म्याचा विनाश होतो.

उपनिषदांमध्यें ( बृहदारण्यक, छांदोग्य व मुंडक यांत ) निराशावादी निवृत्तिपर नीतिशास्त्रहि आहे, परंतु वरील सिद्धांतांना त्याच्यामुळें बाध येत नाहीं।



नं. २

धागे एकमेकाहून भिन्न, एकमेकात मिसळलेले, एकमेकांशी विरोधी व एकमेकास उपकारक आहेत.



कारण निवृत्तिवाद हा उपनिषदांतील प्रभावी विचार नव्हे. तो तेथें नुकताच उदय पावत आहे. त्याला प्रभावी स्वरूप उपनिषदांच्या उत्तरकालीन वाङ्मयांत प्राप्त झालें आहे. कांहीं अपवाद सोडल्यास उपनिषदांनंतरची आतापर्यंतची सर्व जीवनविषयक भारतीय दृष्टि निवृत्तिवादीच आहे. ऐहिक जीवनाबद्दलच्या औदासीन्याला वरिष्ठ मूल्य किंवा अग्रस्थान या विचारसरणींत आहे.

## सांख्यदर्शनाचा उदय

उपनिषदांच्या तत्त्वज्ञानांतून प्रथम सांख्य–विचारसरणी वाढीस लागली, उपनिषत्–कालाच्या उत्तरार्धांत सांख्य–विचार उत्कर्षाला पोंचला; आणि त्याचे पडसाद कठोपनिषदांत आणि विशेषतः श्वेताश्वतरोपनिषदांत उमटले. उपनिषदांतील तत्त्वें आणि सांख्य–दर्शन यांची कायमची सांगड झालेली हिंदु–धर्मांत दिसून येते. भगवद्गीता, महाभारत, योगवासिष्ठ, भागवत इत्यादि ग्रंथांत आणि इतर वेदांतविषयक ग्रंथांत ह्याचें प्रत्यंतर मिळतें,

वेद व उपनिषदें यांच्यांतील बीजभूत मुख्य महत्त्वाच्या अशा दोन कल्पनांच्या आधारें सांख्य-दर्शन वाढलें. त्या बीजाचाच विस्तार म्हणजे सांख्य-दर्शन होय. त्यांतील एक कल्पना म्हणजे त्रिकालाबाधित आणि सर्वव्यापी 'सत्' हें विश्वाचें उपादान-कारण आहे आणि त्याचेंच विश्व बनलें असून व त्यांतच त्याची स्थिति असून, त्याच्यांतच त्याचा विलय होतो. दुसरी कल्पना म्हणजे तें मूळ तत्त्व व दृश्य विश्व हीं दोन्हीं एकच आहेत. पहिल्या कल्पनेंतून जड प्रकृति विश्वाचें मूळ कारण होय ही कल्पना निर्माण होऊन तिचा विस्तार झाला. दुसऱ्या कल्पनेंतून कार्य आणि कारण एकच होत ही कल्पना उत्पन्न झाली. मूळ कारणांतून विश्वाचा विकास होतो; म्हणजे तें मूळ कारणच कार्यरूप बनतें. कार्य हें उत्पत्तीपूर्वी कारणांत अव्यक्त वा तिरोभूत म्हणजे गर्भित असतेंच; तें उत्पन्न होतें म्हणजे आविर्भूत होतें. चित्रपट उघडावा आणि मिटावा त्याचप्रमाणें विश्व उत्पन्न होतें. कारणांत असतें तेंच उघडकीस येतें; नाश कशाचाच होत नाहीं. जें नष्ट झालेलें असतें तें कारणांत केवळ झांकून जातें.

## सांख्यदर्शनाचा निष्कर्ष

विश्वाचें मूळ कारण प्रकृति होय. त्या कारणाच्या स्वरूपाचें विशदीकरण करतांना सांख्याचार्यांनीं अंकांनीं मूळ तत्त्वें मोजण्याची कल्पना काढली. मूळ कारणाचे धर्म नेमके विशिष्ट संख्येचेच असले पाहिजेत असें त्यांनीं निश्चित केलें. म्हणून त्या तत्त्ववेत्त्यांस सांख्य म्हणतात. ते मूलभूत धर्म म्हणजे गुण—सत्त्व, रजस् आणि तमस् असे तीन होत. अनेकांत एकत्व ठेवणें, सुसंगति, व्यापकता आणि बौद्धिकता हें सत्त्वगुणाचें स्वरूप; सृजनशक्ति, प्रवृत्ति व क्रिया हें रजोगुणाचें स्वरूप; गतिविरोध, स्थितिशीलता आणि विसंगति (घोटाळा) हें तमोगुणाचें स्वरूप होय. विश्वांतील किंवा जीवनांतील सौंदर्य व साधुत्व हा सत्त्वगुणाचा आविर्भाव होय. बुद्धिवाद, ज्ञान, आनंद, सद्‌गुण, कला, व्यवस्था इत्यादि सत्त्वगुणाचा प्रभाव होत. पराक्रम, बदल करण्याची प्रवृत्ति, अस्वास्थ्य, दुःख हीं रजोगुणाचीं कार्यें होत. विश्वांतील अंधकार, स्थैर्य, कुरूपता, विकास–प्रतिबंध ही जीवनांतील तमोगुणाची परिणति होय. मनुष्य व विश्व हे एकाच मूळ त्रिगुणात्मक प्रकृतीचे भाग असल्यामुळें सुख, दुःख व मोह हे मानवी अनुभवाचे घटक कारणरूपानें मूळ प्रकृतींत व विश्वांत आहेत, असें सांख्यशास्त्र म्हणतें. 'विश्व हें सुख–दुःख–मोहात्मक आहे' याचा हा अर्थ आहे. दिक् आणि काल हीं विश्वाचीं कारणें असल्यामुळें तीं सुद्धां मूळ प्रकृतिरूपच होत. दिक् व काल प्रकृतीचेच भाव होत; ते अखंड प्रकृतीचेच धर्म होत.

उपनिषदांतील दुसऱ्या एका सिद्धान्ताचा स्वीकार सांख्यदर्शन करूं शकलें नाहीं. तो म्हणजे, 'जगास कारणीभूत असलेली मूळ वस्तु आत्मा होय,' हा सिद्धान्त. कारण आत्मा मानवी देहांतच प्रत्ययास येतो; तो विश्वाचा भोक्ता असूनहि विश्वाच्या घडामोडींतून व तदंगभूत पापपुण्यांतून बाहेर पडून अलिप्त होऊन मुक्त होऊं इच्छितो. विश्ववस्तु व आत्मा एकच असेल, तर विश्वाच्या व्यापापासून अलिप्त होण्याची इच्छा उत्पन्न झाली नसती; व अलिप्त होणें शक्यहि नाहीं. म्हणून प्रकृतीहून भिन्न असा पुरुष सांख्यांनीं मानला. प्रकृति व तिचा

समावेशन, प्रवेश व निष्क्रमण ... प्रकृतीचा स्वभाव ... देह व आणि गुणांचा प्रादुर्भाव व तिरोभाव, उदय व अस्त ...

विश्वात्मक विस्तार हें बंधनाचें क्षेत्र आहे व आत्मा हाच स्वातंत्र्याचें स्थान आहे. विश्वात्मक वस्तु हाच आत्मा मानल्यास बंधनमुक्तीची आशाच नको. उपनिषदांतील अन्य सर्व विचार थोडेबहुत वैचारिक संस्कार करून सांख्यांनीं स्वीकारले. सांख्य–शास्त्र म्हणजे उपनिषत्–तत्त्वज्ञानाची संघटित स्वरूपांतील परिणति होय.

विश्व–वस्तु ही अखंड, शाश्वत व एकच आहे; जगांतील बदल म्हणजे जें जें त्या विश्व–वस्तूच्या गर्भांत झांकलेलें असतें तें बाहेर येणें आणि पुनः आच्छादित होणें होय; वस्तुतः कांहींच उत्पन्न होत नाहीं व नष्ट होत नाहीं; ही अखंड शाश्वत व सर्वव्यापी वस्तु म्हणजेच आत्मा होय; या व अशा प्रकारच्या उपनिषदांतील विचारांनीं चिकित्सा व संशोधन सुरू होऊन प्रचंड वैचारिक चळवळी उत्पन्न झाल्या. बुद्धाचें तत्त्वज्ञान ही त्यांतील महत्त्वाची प्रतिक्रिया होय.

## बुद्धाच्या विचारसरणीचें वैलक्षण्य

बुद्धाची विचारसरणि ही जगाच्या इतिहासांतील कोणत्याहि धर्म–स्थापकाच्या वा धार्मिक महात्म्याच्या विचारसरणीपेक्षां विलक्षण आहे. आणि हें वैलक्षण्य विस्मयजनकहि आहे. इतर धर्मसंस्थापक व महात्मे पुरातनकालापासून आजपर्यंत सांगत आले आहेत कीं ' आम्हांस मिळालेल्या दिव्य आदेशांत, अनुभवांत वा साक्षात्कारांत दिसणारें सत्य चिकित्सेस दूर सारून स्वीकारा; त्यावर श्रद्धा ठेवा. ' याच्या उलट बुद्धानें म्हटलें कीं, ' मी सांगत आहें म्हणून वा मी श्रेष्ठ आहें म्हणून हें सत्य स्वीकारूं नये. सुवर्णपरीक्षेप्रमाणें परीक्षा करून तें स्वीकारावें. ' इतर धर्मसंस्थापक व महात्मे यांनीं सांगितलें आहे कीं या जगतापेक्षां परलोक व परमात्मा यांचीच सत्यता व श्रेयस्करता जाणली पाहिजे. याच्या उलट बुद्धानें निक्षून आदेश दिला कीं मानवी मनाची पोंच जेथें नाहीं अशा पारलौकिक वा ईश्वरविषयक गोष्टींची चर्चा करण्यांत कालक्षेप करूं नका; या जीवनांतील अपरिहार्य व अत्यंत कठिण समस्यांचाच विचार करा. इतर धर्मसंस्थापकांनीं व महात्म्यांनीं नैतिक मूलतत्त्वांच्या इतकीच परलोकादि गूढ तत्त्वांची, तपश्चर्येची, कर्मकांडाची अथवा मंत्र, यज्ञ, प्रार्थना वा भजन यांची श्रेष्ठता उच्चरवानें प्रतिपादिली. त्याच्या उलट बुद्धानें गूढवादाला आणि तज्जन्य विधिविधानाला झिडकारून गणितासारखीं स्पष्ट आणि गूढतेचा स्पर्शहि नसलेलीं सरल आर्य–सत्यें सर्व मानवांस उपदेशिलीं व संयमाचा मध्यम मार्ग दाखविला; परलोक, देवता व परमेश्वर यांच्या ऐवजीं मानवी जीविताचें मूल्य वरिष्ठ आहे हें उघडकीस आणिलें; तलवार व रक्तपात यांना साधन म्हणून मानवी जीवनांत कोठेंहि स्थान असतां कामा नये, म्हणून त्यांचा सार्वभौम निषेध तर बुद्धानें केलाच; परंतु सांप्रदायिक धर्मश्रद्धेच्या ( वा शब्दप्रामाण्याच्या ) पोटीं हटवादीपणा आणि परमताबद्दलची असहिष्णुता जन्माला येऊन त्यांतून तलवारीपेक्षांहि परिणामतः क्रूर व निर्घृण अशा गर्वाविष्ट प्रवृत्ती व सामाजिक संस्था जन्मतात म्हणून सहिष्णुता, अनाग्रही व निरभिमान वृत्तीचें मतपरिवर्तन, बुद्धिवाद आणि बुद्धिद्वारा सूर्य–प्रकाशवत् निश्चित होणारीं नीतितत्त्वें यांना महत्त्व देणारा धर्म त्यानें स्थापिला. त्यांतूनच अनेक सुंदर दर्शनें जन्मलीं.

## बुद्धाचा अनात्मवाद व क्षणभंगवाद

अनात्मवादाचा जोराचा पुरस्कार बुद्धानें केला, असें त्रिपिटकांतील वचनांवरून सिद्ध होतें. ' बदलणाऱ्या दृश्याच्या मुळाशीं असलेलें व न बदलणारें, अखंड, शाश्वत, व्यापक व स्वयंभू तत्त्व म्हणजे आत्मा होय. कार्य आणि कारण एक असल्यामुळें सर्व विश्वच आत्मा होय. आत्मरूपानें विश्व हें शाश्वत आहे ' या विचारापेक्षां अगदीं भिन्न विचार बुद्धानें सांगितला. प्रत्येक सद्वस्तु क्षणिक आहे, अणुरूप आहे; कारणाचा विनाश होऊनच कार्य अस्तित्वांत येतें; विश्व म्हणजे विनाश–परंपरा होय. प्रतिक्षणीं कारण नष्ट होऊन कार्य त्याची जागा घेतें व तें पुढील क्षणाच्या जन्माचें कारण बनतें. अनेक वस्तूंच्या सहकार्यानें कार्य बनतें; म्हणून 'विश्वांतील कारणवस्तु नित्य व एकच आहे' हें उपनिषदांचें मत अग्राह्य आहे. व्यापकता, स्थिरता व शाश्वतता हे आत्म्याचें वैशिष्ट्य दाखविणारे धर्मच








सद्वस्तूंत राहूं शकत नाहींत; म्हणून आत्मा नाहीं. अनेक पदार्थांच्या समुदायाचा रथ बनतो, त्याप्रमाणें शरीरांतील आत्मा (अहंकार ?) हा समुदायाचा परिणाम आहे. शरीरांत स्थिर व अखंड आत्मा (अहंता ?) आहे ही कल्पना केवळ भ्रम होय. सर्व शाश्वत, व्यापक व सामान्यविषयक कल्पना भ्रमरूप आहेत. या शरीरांतील स्थिर आत्म्याच्या(अहंतेच्या ?) भ्रमांतूनच तृष्णा किंवा कामना उत्पन्न होते आणि ती दुःखात्मक संसाराचें बंधन उत्पन्न करते. आत्मकल्पनेच्या निरासाशिवाय कामना नष्ट होत नाहीं आणि त्याशिवाय दुःखनाश होत नाहीं. अशा तऱ्हेनें उपनिषदांच्या वस्तुविषयक शाश्वतवादापेक्षां अत्यंत भिन्न असा वस्तुविषयक क्षणभंगवाद बुद्धानें उत्पन्न केला.

बुद्धाचें तत्त्वज्ञान पुनर्जन्माचा सिद्धांत मानतें; त्यामुळें बुद्धाचा अनात्मवाद पुनर्जन्मवादाशीं विसंगत दिसतो. त्यामुळें अनेक प्रख्यात पुरातत्त्ववादी घोटाळ्यांत पडले आहेत. परंतु उपनिषदांतील आत्मकल्पना लक्षांत घेतली तर ही विसंगति कशी तरी टाळतां येते. न बदलणारें, दृश्य जगाच्या मुळाशीं असलेलें व व्यापक असें तत्त्व आत्मा होय; तें बुद्ध मानत नाहीं. प्रवाहरूपानें असलेला, समुदायानें बनलेला व सतत बदलणारा जीवात्मा बुद्धास मान्य आहे. त्या जीवात्म्यास पुनर्जन्म आहे असें कदाचित् म्हणतां येईल.

## चार्वाकाचें बंड

बुद्धाच्या काळीं किंवा तत्पूर्वींच उपनिषदांतील तत्त्वज्ञानाला विरोधी असा शुद्ध पाखंडी अनात्मवाद जन्मला. व तो म्हणजे चार्वाकाचा जडवाद होय. त्याचें हें घोर जडवादी व पाखंडी बंड मोडण्याकरितां त्याचे व त्या संप्रदायाचे शुद्ध बुद्धिवादी ग्रंथ धार्मिकांनीं बुडविले. त्याची परंपरा फार पूर्वींच नष्ट झाली; परंतु धार्मिक दार्शनिकांच्या ग्रंथांतून पूर्वपक्ष म्हणून या शुद्ध जडवादाची मांडणी पाहावयास सांपडते. चार्वाकाला पुनर्जन्म मुळींच मान्य नाहीं. त्याच्या मतें मनुष्याचे व्यवहार यशस्वी रीतीनें चालविण्यास धर्मसंस्थेची गरज नाहीं. अर्थशास्त्र आणि राजकारण यांच्याच आश्रयानें लोकसंस्थेची व्यवस्था उत्तम चालूं शकते असा या तत्त्वज्ञानाचा सिद्धांत होता. "इंद्रियजन्य ज्ञानच व्यवहारोपयोगी म्हणून खरें होय; अनुमान हें निश्चयात्मक प्रमाण नव्हे; त्याचें प्रामाण्य संभावनात्मक आहे; ज्ञानाच्या प्रामाण्याबद्दल नेहमीं सावधच राहिलें पाहिजे; धर्मग्रंथ शाश्वत सत्याच्या बुरख्याखालीं असत्याचाच प्रसार करीत असतात" असें चार्वाकाचें मत होतें.

## जैन व वैशेषिक दर्शनें

बुद्ध आणि चार्वाक यांच्या अनात्मवादी आणि जडवादी बौद्धिक चळवळींबरोबरच दुसरी एक स्वतंत्र वैचारिक चळवळ निर्माण झाली; ती म्हणजे वैशेषिक व जैन तत्त्वज्ञानांची. उपनिषदांप्रमाणें विश्व—वस्तु केवळ शाश्वतहि नाहीं आणि बौद्धांप्रमाणें सर्वस्वीं क्षणभंगुरहि नाहीं. विश्व—वस्तु शाश्वत व अशाश्वत किंवा स्थिर व क्षणभंगुर अशी द्विविध आहे. त्याचप्रमाणें आत्मरूप वस्तु जशी आहे, तशी अनात्मरूपहि वस्तु आहे; अशा तऱ्हेनें वैशेषिक व जैन यांनीं बहुत्ववादी तत्त्वज्ञान निर्माण केलें. जैन तत्त्वज्ञान जैन धर्माच्या धार्मिक चळवळींत पुष्कळ काळपर्यंत सुप्तप्राय होऊन त्याची प्रभावी वाढ लवकर झाली नाहीं.

## वैशेषिक दर्शनाचीं वैशिष्ट्यें

वैशेषिक—दर्शन हें ज्ञानाची शाखा या दृष्टीनें परिणामकारक रूप धारण करूं शकलें. परमाणुवाद प्रथम त्यांनीं शोधून काढला. त्या परमाणुवादाची छाप बौद्ध व जैन विचारसरणींवर प्रथमपासूनच पडली. वैशेषिकांच्या दृष्टीनें भूमितींतील बिंदूप्रमाणें असलेले अनंत व शाश्वत परमाणू हा दृश्य विश्वाचा पाया आहे. त्या परमाणूंच्या संयोगांतून दृश्य जगत् होतें. वस्तूंची समानता आणि वस्तूंचीं वैशिष्ट्यें हीं दोन्हीं तत्त्वें गृहीत धरल्याशिवाय भेदयुक्त जगाचा अर्थ समजत नाहीं. वस्तूंचीं मौलिक वैशिष्ट्यें सुद्धां त्यांच्या समानत्वाइतकींच महत्त्वाचीं आहेत. वस्तूंच्या मूलभूत वैशिष्ट्याला वा विशेषाला म्हणजे भेदाला कणादानें महत्त्व दिल्यामुळें कणादाच्या तत्त्वज्ञानास





वैशेषिक दर्शन म्हणतात. विश्वांतील दृश्य फरक हा केवळ बाह्य देखावा नसून वस्तूंच्या मूळ स्वभावांतच विशेष–तत्त्व भरून राहिलें आहे. मूळद्रव्यरूप कारणांत भेद आहे; म्हणूनच कार्यें भिन्न होतात. अशा रीतीनें उपनिषदांच्या विचारसरणीच्या विरुद्ध विचार कणाद ऋषीनें सांगितला. विश्वाचीं (द्रव्यरूप) मूळ कारणें नित्य म्हणजे शाश्वत आहेत; परंतु कार्यें अनित्य आहेत. या नित्य मूलभूत कारणांचे-परमाणुरूप व विभु द्रव्यें–असे दोन विभाग वैशेषिकांनीं पाडले. आकाश, दिक्, काल आणि आत्मे हीं विभु द्रव्यें होत.

कणादाच्या तत्त्वज्ञानाचें परमाणुवाद हें जसें वैशिष्ट्य आहे, तसेंच दुसरें एक मोठें वैशिष्ट्य आहे. त्या वैशिष्ट्यानें भारतीय तत्त्वज्ञानांत क्रांतिकारक विचारसरणीचा प्रवेश केला. तें वैशिष्ट्य म्हणजे पदार्थ–पद्धति होय. विश्व–वस्तूंचा अर्थ समजण्यास भाषेच्या गाभ्यांत कणादानें दृष्टि फेंकली. कारण मनुष्याच्या अनुभवाचें व ज्ञेयाचें सार, बुद्धीचे नियम आणि ज्ञानाची सामान्य रचना हीं भाषेंत सामावलेलीं असतात. प्रत्येक विशेष अनुभवाचा अर्थ भाषेंतील अर्थतत्त्वांच्या म्हणजे पदार्थांच्या Meaning-Scheme च्या योगानें उलगडतां येईल, असें कणादानें ठरविलें. शब्दांच्या तीन प्रकारच्या राशी व्याकरण-शास्त्रानें अर्थदृष्ट्या सांगितल्या आहेत. द्रव्यवाचक पदें, गुणवाचक पदें आणि क्रियावाचक पदें. त्यांचे पुन: दोन वर्ग होतात; सामान्यवाचक व विशेषवाचक. वाक्यानें यांचा संबंध सूचित केलेला असतो. वैशेषिकदर्शनांतील पदार्थपद्धति या सहांची बनली आहे. द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष आणि समवाय-संबंध अशा सहा पदार्थांत सर्व विश्ववस्तु अंतर्भूत केली आहे. अभाव हा सातवा पदार्थ या पद्धतींत वैशेषिक-दर्शनांत कालांतरानें पंडितांनीं घातला. त्याचें सूक्ष्म विवेचन कणादाच्या सूत्रामध्यें आलेलें आहे; परंतु स्वतंत्र पदार्थ म्हणून त्याचें परिगणन करून, सातवा पदार्थ म्हणून मात्र सांगितलेला नाहीं. अभावाची कल्पना ही भारतीय तत्त्वज्ञानांतील विसंवादपद्धतीची (Dialectics ची) मुख्य मेढ आहे. भारतीय तर्कशास्त्रांत विशेषतः नव्यन्यायांत अभाव फार गाजला आहे.

## गौतमाची प्रमाणविद्या

वैशेषिक दर्शनालाच जोडून भारतीय तर्कशास्त्र निर्माण झालें. भारतीय तर्कशास्त्राची स्थापना एक स्वतंत्र दर्शन म्हणून गौतमानें केली. तत्त्वज्ञानांतील सर्व प्रश्न ज्ञानविद्येचे (Epistemology चे) किंवा प्रमाणविद्येचे भाग मानून त्यांची चर्चा गौतमाच्या न्यायदर्शनांत केली आहे. प्रमाणविद्येच्या दृष्टीनें सर्व तात्त्विक मुद्यांचा उलगडा करण्याची पद्धति गौतमानें काढल्यानंतर तिचा परिणाम कालांतरानें सर्व भारतीय दर्शनांवर झाला. बौद्ध व जैन यांचीही प्रमाणविद्या आणि तर्कशास्त्रें स्वतंत्र रीतीनें वाढीस लागलीं. विश्ववस्तूबद्दलच्या विचारसरणीचा परिणाम प्रमाणविद्या व तर्कशास्त्र यांच्यावरहि होतो. विश्ववस्तूबद्दलचा जसा दृष्टिकोण असतो, त्यास अनुसरून तदनुरूप भिन्न प्रमाणविद्या व तर्कशास्त्र बनतें. आज सांख्य, वेदान्त व पूर्वमीमांसा यांचीहि प्रमाणविद्या निराळी असलेली दृष्टोत्पत्तीस येते, याचें हेंच कारण होय.

प्रमाणविद्या व तर्कशास्त्र यांच्या स्वतंत्र वाढीमुळें सर्वच भारतीय दर्शनें अत्यंत सुसंघटित व बौद्धिक व्यवस्थेनें संपन्न बनलीं. गूढ अनुभव किंवा साक्षात्कार याला सुद्धां त्यांच्या तार्किक व्यवस्थेच्या रचनेंतच स्वतःकरितां एक स्थान पाहावें लागलें. शंकराचार्य, रामानुज, माध्व इत्यादिकांचीं धार्मिक तत्त्वज्ञानें सुद्धां व्यापक अर्थानें तर्कशास्त्राच्या व्यवस्थेचा आश्रय करून राहिलीं. बौद्धिक मननाची प्रवृत्ति सर्व भारतीय तत्त्वज्ञानांच्या मध्यें अत्यंत खोल रुजलेली दिसते. यास मूळ कारण गौतम व कणाद यांची प्रमाणविद्या व तर्कशास्त्र होय.

भारतीय प्रमाणविद्येवर गणितज्ञानाचा कांहींच परिणाम झालेला दिसत नाहीं, हें एक आश्चर्य आहे. कारण हिंदुस्थान ही बीजगणिताची मूळ जन्मभूमि आहे. अंकगणित भारतांतच चांगल्या तऱ्हेनें वाढलें. तरीहि गणितज्ञानाची उपपत्ति हा भारतीय प्रमाणविद्येचा विषय होऊं शकला नाहीं. पाश्चात्य प्रमाणविद्येचा गणितविषयक ज्ञानाची उपपत्ति हा मध्यवर्ती प्रश्न झाला आहे.

## विचारस्वातंत्र्यावर आधारलेली बौद्धिक संस्कृति

बौद्धिक संस्कृति आणि तिचा आधार असलेलें विचारस्वातंत्र्य हा भारतीय दर्शनांचा पुरातन वारसा-हक्क आहे. त्यामुळेंच ब्रह्मसूत्रांच्या पूर्वी संपूर्ण जडवादी सांख्य-दर्शन उत्पन्न झालें होतें व त्यामुळेंच गौतमाच्या प्रस्तुत उपलब्ध होणाऱ्या तर्कशास्त्रापूर्वी जडवादी तर्कशास्त्र उत्पन्न झालें होतें असा पुरावा इतिहासांत सांपडतो. वैदिक धर्माचे कट्टे अनुयायी जे पूर्वमीमांसक त्यांच्यांतहि जडवादी पूर्वमीमांसा-दर्शन वाढीस लागलें होतें असें कुमारिलभट्टांनी पूर्वमीमांसा-वार्तिकांत म्हटलें आहे. या जडवादी दर्शनाच्या सर्व शाखा आज नष्ट झाल्या आहेत. परंतु बुद्धिवादाचें व विचारस्वातंत्र्याचें दुसरें एक महत्त्वाचें लक्षण अनेक भारतीय दर्शनांत अजूनहि शिल्लक राहिलेलें दिसतें; तें म्हणजे अनीश्वरवाद होय. सांख्यदर्शन, पूर्वमीमांसा, वैशेषिकसूत्रें, जैन-दर्शन आणि बौद्ध-दर्शन ईश्वराचें अस्तित्व मानीत नाहींत.

भारतीय दर्शनांची ग्रंथसंपत्ति मोठी आहे; त्यांचें आलोडन करून त्यांतून टिकाऊ व स्फूर्तिदायक विचार आणि तत्त्वें सांपडूं शकतील. नीतिशास्त्र, मानसशास्त्र, तर्कशास्त्र, प्रमाणविद्या, इत्यादिकांसंबंधीं पुष्कळ सामग्री कच्च्या मालाच्या स्वरूपांत त्यांत सांठलेली आहे. अलीकडे भारतीय विद्यांच्या पुनरुद्धाराची चळवळ सुरू झाली आहे. अलिप्तता-युक्त बौद्धिक दृष्टिकोण न ठेवतां, अंधश्रद्धा आणि गूढवाद यांचा आश्रय करून हें काम केलें व ममत्वबंधनाची बाधा होऊं दिली, तर त्या पुरातन जराजीर्ण विचारांच्या ओझ्याखालीं आपलें बौद्धिक सामर्थ्य दडपलें जाईल. या बाबतींत सावध राहिलें पाहिजे. भूतकाळ पुष्कळ वेळां स्फूर्ति देत नसतो, तो धडा शिकवीत असतो.

---

## हक्क कीं कर्तव्य ? —

अहिंसेवर आधारलेल्या स्वराज्यांत आपले हक्क काय आहेत हे लोकांना कळण्याची जरुरी नाहीं, परंतु आपलीं कर्तव्यें काय आहेत हें मात्र त्यांना कळणें आवश्यक आहे. असें कोणतेंहि कर्तव्य नाहीं कीं ज्याच्या पासून योग्य असा हक्क उत्पन्न होत नाहीं. तेच खरे हक्क, जे योग्य अशा कर्तव्यपालनापासून उत्पन्न होतात.

—महात्मा गांधी

## सर्वधर्मी समानत्त्व—

माझ्या स्वतःच्या धर्माप्रमाणेंच मी इतर धर्मांबद्दलहि आदर बाळगतों. म्हणून धर्मांतर-प्रचाराविषयीं विचार करणें माझ्या दृष्टीनें अशक्यच आहे. दुसऱ्याकरितां जर आपणाला प्रार्थना करावयाची असेल तर ती अशी असूं नये कीं, " परमेश्वरा, जो प्रकाश तूं मला दाखविला आहेस तोच यांनाहि दे. '' उलटपक्षीं ती प्रार्थना अशी असावी कीं, " हे परमेश्वरा, यांच्या सर्वोच्च आत्मोन्नतीकरितां जेवढा प्रकाश लागत असेल तेवढा सर्व आणि जेवढी सत्यदृष्टि लागत असेल तेवढी सर्व यांना दे. ''

—महात्मा गांधी








# कम्युनिस्ट जाहीरनाम्याच्या चष्म्यांतून

आचार्य शं. द. जावडेकर

इ. स. १८४८ सालीं कार्ल मार्क्स आणि फ्रेड्रिक एञ्जल्स् यांनीं "कम्युनिस्ट मॅनिफेस्टो" या नांवानें प्रसिद्ध असलेला जाहीरनामा युरोपांत त्यावेळीं असलेल्या कम्युनिस्ट लीग नांवाच्या गुप्त क्रांतिकारकांच्या संस्थेच्या वतीनें प्रसिद्ध केला. कम्युनिस्ट लीगचें एक अधिवेशन १८४७ च्या नोव्हेंबरमध्यें लंडन येथें भरलें होतें. त्या वेळीं कार्ल मार्क्स आणि फेड्रिक एञ्जल्स् या दोन पुढाऱ्यांच्याकडे आपल्या संस्थेचें ध्येय, धोरण आणि कार्यक्रम ज्यांत नमूद केला आहे असा एक जाहीरनामा तयार करण्याचें काम सोंपविण्यांत आलें होतें. हें कार्य १८४८ मध्यें पुरें होऊन हा जाहीरनामा जर्मन भाषेंत लिहिण्यांत आला. त्याचें फ्रेंच भाषान्तर १८४८ च्या जून महिन्यांत पॅरिसमध्यें क्रांति झाली, त्याच्या आधीं थोडे दिवस प्रसिद्ध करण्यांत आलें होतें. या क्रांतींत कम्युनिस्ट पक्षानें कामगारवर्गाच्या संघटित शक्तीच्या साहाय्यानें समाजवादी क्रांति करण्याचा पहिला प्रयत्न केला. तो विफल झाल्यानंतर त्या पक्षावर जी दडपशाही झाली ती लक्षांत घेऊन कम्युनिस्ट लीगचें विसर्जन करण्यांत आलें. यानंतर हा जाहीरनामा बरींच वर्षें युरोपांतील बहुतेक देशांत बेकायदाच होता. मधून मधून त्याचीं भाषान्तरें निरनिराळ्या भाषांत होत व त्याला कांहीं वर्षें प्रकाशांत वावरतां येई. पण कम्युनिस्ट पक्षाच्या व क्रांतिकारक कामगार संघटकांच्या बाहेर त्याला फारशी प्रसिद्धि मिळाली नव्हती. रशियांतील १९१७ च्या क्रांतीनंतर त्या जाहीरनाम्याचें अध्ययन व प्रचार बहुतेक सर्व राष्ट्रांत मोठ्या प्रमाणावर सुरू झाला आणि त्यांतील तत्त्वांना व सिद्धान्तांना सरकारमान्य प्रतिष्ठित विद्यापीठांतील विद्वानांकडूनहि हळूहळू मान्यता मिळूं लागली. जे कम्युनिस्ट या विशिष्ट पक्षाचे सभासद नाहींत, तेहि समाजवादाची शास्त्रीय उपपत्ति समजून घेण्यासाठीं त्याला प्रामाण्य देतात आणि ज्यांना कम्युनिस्ट तत्त्वावर टीका करावयाची आहे तेहि त्या तत्त्वज्ञानाचा एक आधारग्रंथ म्हणून त्याला मान्यता देतात. ज्यानें हा ग्रंथ वाचिलेला नाहीं, त्याला कम्युनिस्ट विचारांवर टीका करण्याचाहि अधिकार प्राप्त होणार नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. तसेंच, हिंदु संस्कृतीचें अध्ययन करूं इच्छिणाऱ्यास भगवद्गीतेचें अध्ययन जितकें अवश्य आहे तितकेंच कम्युनिस्ट मॅनिफेस्टोचें अध्ययन प्रत्येक समाजवाद्यास अथवा त्याच्या टीकाकारांस अवश्य आहे, असें म्हटलें तर त्यांत फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. तसेंच, भगवद्गीता हें जसें एक छोटें पण तात्विक व व्यावहारिक दोन्ही दृष्टींचा समन्वय करणारें धर्मपुस्तक आहे तसाच हा अगदीं छोटा पण तात्त्विक व व्यावहारिक अशा समाजवादाच्या दोनहि अंगांचा परिचय करून घेण्यास योग्य असा प्रमाणभूत ग्रंथ आहे. या ग्रंथाचें प्रमुत्व ज्यांच्यावर आहे असे क्रांतिकारक पक्ष आज जगांतील प्रत्येक देशांत पसरलेले असून जगांतील पहिलें समाजवादी राष्ट्र म्हणून ज्याची ख्याति आहे त्या राष्ट्राचा तो एक तात्त्विक दृष्ट्या आधारग्रंथ मानिला जातो. त्या ग्रंथाचें अध्ययन तेथील प्रत्येक तरुणास करावें लागतें आणि त्या पक्षाच्या प्रत्येक सभासदास तो ग्रंथ प्रमाणभूतहि मानावा








लागतो. ' मानव–संस्कृतींत अपरिहार्य बनलेली समाजवादी क्रांति आज कां घडत आहे, तिच्या पाठीमागें कोणतीं ध्येयें व तत्त्वें आहेत, त्यांच्या मागें कोणाची शक्ति आहे, ही शक्ति वाढण्याचीं कारणें कोणतीं, तिला शिक्षक व तत्त्वज्ञान यांचा सतत पुरवठा कसा होतो आणि ही शक्ति कोणत्या परिस्थितींत, कोणत्या साधनांनीं आणि कोणत्या प्रकारें प्रभावी होईल या सर्वांचा उलगडा होण्यास या जाहीरनाम्याचा फार उपयोग होण्याजोगा आहे. तसेंच आजच्या संस्कृतींत कोणती क्रांति समाजवादी करूं पाहतो व ती क्रांति झाल्यावर त्या संस्कृतीचें स्वरूप कसें असेल, यासंबंधींचे मार्क्सचे विचारहि या छोट्या पुस्तकांत थोडक्यांत वाचावयास मिळतात. इतकें या जाहीरनाम्याचें ऐतिहासिक महत्त्व असून जगांतील सर्व प्रबल राष्ट्रांतील सरकारांनीं व झार, मुसोलिनी व हिटलर यांसारख्या निष्ठुर व सर्वशक्तिमान् गाणिलेल्या सत्ताधीशांनीं जे विचार नेस्तनाबूद करण्याचा आटोकाट प्रयत्न केला, धर्माच्या, नीतिच्या व संस्कृतीच्या नांवावर ज्यांचा उच्छेद करण्याचा प्रयत्न शंभर वर्षें चालू आहे, परंतु जे विचार असल्या आसुरी शक्तींच्या माऱ्यालाहि तोंड देऊन जगभर उघडपणें फैलावत आहेत, असे विचार या ग्रंथांत प्रकट झालेले आहेत.

## ही भुतावळ कोणीं उठविली ?

मार्क्सनें या जाहीरनाम्याची प्रस्तावना करतांनाच असें म्हटलें आहे कीं; कम्युनिझमचें भूत आज सर्वत्र थैमान घालीत आहे अशी ओरड युरोपांतील सर्व सत्ताधीश करीत आहेत आणि त्याला गाडून टाकण्यासाठीं सर्व शत्रू आपापसांतील मतभेद विसरून एकत्र येत आहेत, पण भांडवलशाहीच्या जिवावर उठलेलें हें भूत तिचा अंत केल्याखेरीज शांत होणार नाहीं. त्यानें पुढें असेंहि दाखवून दिलें आहे कीं हा समंध भांडवलशाहीनेंच जागृत केलेला आहे आणि तोच आतां तिच्या उरावर बसून तिचा प्राण घेणार आहे. भांडवलदारवर्गाची ही अवस्था, एखाद्या मंत्राक्षऱ्यानें आपल्या मंत्रसामर्थ्यानें अनेक भुतें जागीं करावीं आणि त्यांना शांत करण्याचें सामर्थ्य मात्र त्याच्यापाशीं नसावें, त्याच्या स्थितीप्रमाणें केविलवाणी झालेली आहे असें मार्क्सनें जाहीरनाम्याच्या पहिल्या भागांत वर्णन केलें आहे.

हा सामाजिक क्रांतीचा समंध कसा जागृत होतो, याचा शास्त्रीय विचार करून त्यानें असें दाखवून दिलें आहे कीं, सामाजिक क्रांतीची प्रेरक शक्ति वर्गविग्रहांतून निर्माण होत असते. हा वर्गविग्रह मानवी समाजाच्या ऐतिहासिक कालांत सर्व समाजांत नित्य चालू आहे. आतांपर्यंतचा मानवी इतिहास हा वर्गविग्रहानें सर्वत्र व्याप्त असाच आहे. प्रत्येक समाजांत दुसऱ्याच्या श्रमावर जगणारा आणि आपल्या श्रमांतून निर्माण होणारें फल फक्त पोटापुरतें स्वतः खाऊन सर्व वाढावा मालकाच्या पदरांत टाकणारा असे दोन वर्ग असतात. पहिला शोषक आणि दुसरा शोषित, पहिला पीडक आणि दुसरा पीडित, अथवा पहिला पिळणारा व दुसरा पिळला जाणारा असे दोन वर्ग असणें असें आजपर्यंतच्या मानवसंस्कृतीचें एक शाश्वत लक्षणच आहे. आजच्या भांडवलशाही समाजांतहि हा वर्गविग्रह चालू असून शोषण, पीडन अथवा पिळणूक करणारा वर्ग व त्याचे स्तुतिपाठक हेच तेवढे हा वर्गविग्रह नाकारीत असतात. या वर्गविग्रहाचीं बीजें आजच्या उत्पादन–पद्धतींत आणि धनार्जन–पद्धतींतच आहेत. आज उत्पादनपद्धति सामुदायिक बनली असून उत्पादनाचीं साधनें—जमिनी, कारखाने, पेढ्या व दळणवळणाचीं साधनें—यांच्यावर खासगी मालकी आहे. उत्पादनपद्धति सामुदायिक आणि धनार्जनाचे मार्ग मात्र जुन्याच मालमत्तेच्या कायद्यानुसार खासगी व्यक्तींच्या हातीं आहेत. यामुळें मालक व मजूर अथवा भांडवलदार व कामगार असा हितविरोध व वर्गविग्रह निर्माण होत आहे. धनोत्पादनाचीं सर्व साधनें भांडवलदार वर्गाच्या हातीं गोळा होत असून संपत्तीचें संकलन आणि आर्थिक सत्तेचें केंद्रीकरण होत आहे. यामुळें राजसत्तेचेंहि केंद्रीकरण होत असून ही








# कम्युनिस्ट जाहीरनाम्याच्या चष्म्यांतून

राजसत्ता लोकशाही स्वरूपाची दिसत असली तरी आजचें सरकार हें भांडवलदारांच्या कंपनीचें व्यवस्थापक अथवा कारभारीमंडळ बनलें आहे, ज्यांच्या हातीं धनोत्पादनाचीं साधनें असतील व आर्थिक सत्तेचीं सूत्रें खेळत असतील, त्यांच्याच हातीं राजसत्तेचीं सूत्रें असतात असा सार्वत्रिक नियम आहे असें मार्क्स सांगतो.

आज ज्या भांडवलदार, व्यापारी, कारखानदार, पेढीवाले या वर्गाच्या हातीं आर्थिक व राजकीय सत्ता एकवटली आहे, तो वर्ग एके काळीं सरंजामदार वर्गाचा दास होता आणि त्याच्या हातीं असणारीं धनोत्पादनाचीं साधनें फार छोटीं व विखुरलेलीं होतीं. पुढें आफ्रिका, अमेरिका या खंडांचा शोध लागून व्यापार व बाजारपेठा यांना जागतिक स्वरूप प्राप्त झाल्यावर या वर्गाची भरभराट झ ली आणि त्याच्या हातचीं उत्पादनसाधनें वाढूं लागलीं, सरंजामशाही युगांतील सर्व बंधनें त्यांच्या विकासास अडथळा करूं लागलीं तेव्हां तीं बंधनें तोडून टाकून या वर्गानें नव्या उत्पादनपद्धतीस व विनिमयपद्धतीस पोषक असें व्यक्तिस्वातंत्र्याचें व अनियंत्रित स्पर्धेचें तत्त्व पुरस्कारुन आपला विकास करून घेतला. प्रथम सरंजामदारवर्ग, नंतर धर्माधिकारी आणि त्यानंतर राजे या सर्वांविरुद्ध यशस्वी बंडखोरी करून या वर्गानें नवा समाज व नवी राज्यपद्धति शोधून काढिली. हा नवा समाज व ही नवी राज्यपद्धति म्हणजेच आजची भांडवलदार लोकशाही होय. या समाजांत कामगारवर्गाचें शोषण चालू असून तें अप्रतिहत चालवितां यावें म्हणून राजसत्तेनें आर्थिक व्यवहारांत हात घालू नये हें अनियंत्रणाचें तत्त्व ती पुकारीत असतो. पण या समाजांत ज्या प्रचंड उत्पादनसाधनांच्या योगानें संपत्ति निर्माण होते, तीं साधनेंच आज इतकीं वाढलीं आहेत व त्यांतून निर्माण होणारे आर्थिक व्यवहार इतके संकीर्ण व विश्वव्यापक बनले आहेत कीं ते खासगी मालमत्तेचा कायदा बदलून धनोत्पादनाचीं साधनें सार्वजनिक मालकीचीं बनविल्यावांचून या समाजांत चालू असणारा वर्गविग्रह थांबणें शक्य नाहीं.

हा वर्गविग्रह करण्यास लागणारी संघटना ही उत्पादनपद्धतीच करीत असते. देशभर पसरलेले व खेड्यापाड्यांत विखुरलेले कामगार ही पद्धति एकत्र आणते. पोटासाठीं व जगण्यासाठीं ही पद्धतच त्यांना संघटना करण्यास प्रवृत्त करते. रोज अनेक धंद्यांतील स्वतंत्र व प्रतिष्ठित धंदेवाले स्वातंत्र्य गमावून कामगारवर्गांत लोटले जातात. हे नवे नवे बुध्दिमान्, बेकार पण सुशिक्षित लोक कामगारवर्गाचे नेते बनतात आणि त्यांना आपला लढा शास्त्रीय पध्दतीनें कसा चालवावा तें शिकवितात. छोटे व्यापारी, दुकानदार, वकील, डॉक्टर, एंजीनियर, शेतकरी हे सर्व या वढ्या भांडवलदारांचे दास बनून त्यांच्यापुढें लोटांगणें घालूं लागतात व त्यांनाहि कामगारक्रांति व समाजवाद हीं तत्त्वें पटूं लागतात. तसेंच या समाजावर एकामागून एक अशीं आर्थिक अरिष्टें गुदरूं लागून मधून मधून त्यांतील कारखाने, पेढ्या बंद पडून उत्पादनकार्यच स्थगित होतें. भांडवलदार समाजाचे हे आंचके वाढत जाऊन अखेरीस संघटित क्रांतिकारक कामगारवर्ग समाजवादी बनून त्याचा अंत करणार आहे. अशा प्रकारें भांडवलदारच आपल्या हातांनीं आपले मारेकरी निर्माण करीत आहेत आणि आपली थडगीं खणणारे व चिता रचणारे तयार करीत आहेत. या मारेकऱ्यांची वाढ व्हावी, त्यांची संघटना व्हावी आणि त्यांना सुशिक्षित व सुविद्य नेते मिळावे अशीच या समाजाची उत्पादनपध्दति व आर्थिक संघटना आहे.

## क्रांतितंत्र कोण शिकवितें ?

यापुढें मार्क्सनें असें दाखवून दिलें आहे कीं या भांडवलदार वर्गाला जमीनदार वर्गाविरुद्ध, धर्माधिकारी वर्गाविरुद्ध, राजांविरुद्ध, परकीय भांडवलदारांविरुद्ध आणि आपल्यांतलेच पोटवर्गांविरुद्ध अनेक लढे करावे लागतात. या लढ्यांत त्याला कामगारवर्गास राजकीय क्रांतितंत्र शिकवून त्याचें साहाय्य घ्यावें लागतें. लोकशाहीची व सामाजिक समतेची शिकवण द्यावी लागते. राजसत्तेविरुद्ध क्रांति करण्याचें शिक्षण मिळालेला हा कामगारवर्ग








त्याच तंत्राचा उपयोग करून लोकशाहीचा लढा पुरा करणार आहे आणि भांडवलदार लोकशाहीला समाजवादी लोकशाहीचें स्वरूप आणून देणार आहे. सत्तारूढ वरिष्ठ वर्ग जबरदस्तीनें दूर लोटल्यावांचून आपल्या हातची सत्ता सोडीत नाहीं, हें शिक्षण कामगारांना प्रथम भांडवलदारांनीं जमीनदारांविरुद्ध व राजांविरुद्ध लढतांना दिलेलेंच आहे. आतां तीच विद्या त्यांचें शिष्य आपल्या गुरूंवर उलटविणार आहेत. एके काळीं भांडवलदार वर्ग हाच क्रांतिकारक वर्ग होता. वर्गविग्रहहि तो करीत असे. धर्म, समाजसंघटना, राज्यघटना या सर्वांत त्यानें क्रांति केली. उत्पादनपद्धतींत क्रांति केली. खेड्यांतील धंदे उध्वस्त केले. मागसलेले देश गुलाम केले. व्यापार व बाजारपेठा यांना जागतिक स्वरूप दिलें. शेतकऱ्यांचे जोडधंदे आणि जित देशांतील सर्व धंदे नष्ट केले. पण आतां खासगी मालमत्ता नष्ट करून सार्वजनिक कारखानदारी, जमीनदारी व सावकारी करण्यास तो विरोध करित आहे. आतां तो प्रतिक्रांतिकारक बनला आहे आणि प्रातिनिधिक राज्ययंत्र आपल्या कबजांत घेऊन कामगारवर्गावर गोळ्या घालीत आहे. देशांतील नव्वद टक्के लोकांचे मालकी हक्क व मालमत्ता यांचा अपहार त्यानें केलाच आहे. आतां त्याच्या मालकींत देशांतील सर्व धन गोळा झालें आहे. हें चोरलेलें धन त्याच्यापासून हिरावून घेऊन तें समाजाच्या मालकीचें करणें हेंच समाजवादी क्रांतीचें ध्येय आहे. यांत चोरी नसून चोरानें लुबाडलेली संपत्ति त्याच्यापासून हिरावून घेण्याची ही क्रिया आहे. कामगारांच्या कष्टाचें फळ ज्यांनीं लुबाडून घेतलें, त्याची वाढहि जे त्याचें रक्तशोषण करूनच करीत असतात, त्यांचे मालकी हक्क नष्ट करणें याचा अर्थ चोरानें चोरून मिळविलेले मालकी हक्क नष्ट करणें येवढाच आहे; पण ही क्रांति केवळ कामगारवर्गच करूं शकेल.

कामगारवर्गाव्यतिरिक्त इतर अनेक वर्गहि भांडवलदारवर्गाविरुद्ध भांडत असतात. छोटे शेतकरी, छोटे व्यापारी, गरीब मध्यमवर्ग, छोटे दुकानदार व धंदेवाले, हस्तव्यवसायानें पोट भरणारे ग्रामोद्योगवाले, हे सर्व भांडवलदारांविरुद्ध ओरड करीत असतात आणि 'त्यांचें नियंत्रण करून आमचें रक्षण करा' असें म्हणत असतात. हे सर्व आपणांस समाजवादी समजूंहि लागतात व या प्रत्येक वर्गांतून भांडवलदारांचें नियंत्रण करण्याच्या अनेक योजना पुढें येत असतात. या योजनांना कांहीं लोक भोळेपणानें व कांहीं लोक भामटेपणानें समाजवादी योजना अशीं नांवें देत असतात. पण जुनाट अर्थोत्पादनपद्धति टिकवून धरण्याचे हे सर्व प्रयत्न वस्तुत: क्रांतिकारक किंवा समाजवादी नसून ते प्रतिक्रांतिकारकच असतात. कामगारवर्गाला आपला वर्गलढा चालवीत असतांना भांडवलशाही समाजाचें जें स्वरूप अनुभवास येतें, तेंच त्या समाजाचें खरें स्वरूप आहे आणि या लढ्यांतूनच कम्युनिस्ट क्रांतीचें तत्त्वज्ञान आणि त्याचे सिद्धान्त जन्मास येत असतात. हें अनुभवगोचर वास्तववादी शास्त्र असून तें कोणा महान् विभूतीच्या डोक्यांतून स्फुरण पावणारें नाहीं. त्याचा विकास करण्याची स्फूर्ति व दृष्टि तो लढा चालवितांनाच मिळत असते. कम्युनिस्ट पक्ष हा कांहीं कामगारवर्गाहून अलग असा त्याचें नेतृत्व करूं पाहणारा अनेक कामगारपक्षांपैकीं एक परोपकारी पक्ष नव्हे. कम्युनिस्ट पक्ष हा कामगारवर्गाच्या अनुभवांशीं, आशाआकांक्षांशीं, आचार–विचारांशीं समरस बनलेला, त्यांना तोंड फोडणारा, त्यांना मूर्त करून व्यक्त स्वरूप देणारा, वर्गलढ्याच्या आघाडीवर उभा राहून अखेरपर्यंत लढणारा असा पक्ष आहे. असें जो करील तोच खरा कम्युनिस्ट पक्ष होय. कामगारवर्गाचें क्रांतिकारक नेतृत्व करणारा जो पक्ष त्यालाच कम्युनिस्ट पक्ष म्हटलें पाहिजे. या क्रांतिकारक वर्गाहून भिन्न अथवा त्याचा हार्दिक पाठिंबा नसणारा असा पक्ष कम्युनिस्ट पक्ष होऊं शकत नाहीं. तात्पर्य, कामगारवर्गाशीं समरस झालेला व त्याच्या आशाआकांक्षा व्यक्त करून त्याच्या क्रांतिकार्यांत नित्य आघाडीवर राहणारा वर्ग हाच खरा कम्युनिस्ट पक्ष होय असें मार्क्सनें या जाहीरनाम्यांत म्हटलें आहे. अर्थात्,








# कम्युनिस्ट जाहीरनाम्याच्या चष्म्यांतून

आम्ही कामगार व कारखानदार या दोघांचेंहि हित करतों असें म्हणणारा पक्ष म्हणजे मी चोर आणि साव या दोघांचे हक्क शाबूत ठेवतों असें म्हणणारा पक्ष असून त्याच्या म्हणण्यांतच विसंगति आहे असें मार्क्सचें मत आहे.

आजपर्यंत ज्या क्रांत्या झाल्या त्यांत एका वर्गाचे मालकीहक्क नष्ट होऊन दुसऱ्या वर्गाच्या हक्कांची वाढ झाली आणि एका वर्गाची पिळणूक थांबून दुसऱ्या वर्गाची पिळणूक निर्माण झाली. पण आतां सर्वांत तळचा कामगारवर्गच क्रांति करीत असल्यानें खरा वर्गहीन समाज यापुढें स्थापन होणार आहे. असा वर्गहीन समाज निर्माण होऊन सर्व संपत्ति समाईक झाली म्हणजे एका वर्गाचें दुसऱ्या वर्गावर प्रभुत्व स्थापन करण्यासाठीं निर्माण झालेलें राज्ययंत्र गळून पडेल व मग फक्त समाईक संपत्तीची व्यवस्था ठेवणारी एक नियामक संस्थाच राहील. माणसांवर राज्य करणें हें तिचें स्वरूप न उरतां समाईक उत्पादन चालू ठेवणें आणि त्यांतून निर्माण होणाऱ्या संपत्तीचा उपभोग घेण्यास सर्वांस साहाय्य करणें, सर्वांच्या उद्धारांतच प्रत्येकाचा उद्धार आहे व प्रत्येकाचा उद्धार हाच सर्वांचा उद्धार असा अनुभव या वर्गहीन समाजांतच सर्वांना येऊं शकेल.

## आक्षेपांचें निरसन

कार्ल मार्क्सनें या जाहीरनाम्यांत समाजवादी तत्त्वज्ञानावर जे आक्षेप घेण्यांत येत असतात, त्यांचें निरसन थोडक्यांत पण जोरदार आणि मुद्देसूद भाषेंत केलें आहे. पहिला आक्षेप असा कीं, तुम्ही कष्टार्जित संपत्ति व मालकी हक्क नष्ट करणार आहां. त्यावर त्यानें असें उत्तर दिलें आहे कीं, भांडवलदारांनीं कष्टजीवी वर्गाच्या श्रमफलांचा अपहार करून शेंकडा नव्वद लोकांचे मालकीहक्क व कष्टार्जित संपत्ति यांचा अपहार आधींच केलेला आहे व आपले मालकीहक्क विनकष्टानें वाढविलेले आहेत. त्यांच्या संपत्तीचा व मालकीहक्कांचा अपहार करून त्यावर समाजाची मालकी स्थापन करण्यांत कांहींच अयोग्य नाहीं. दुसरा आक्षेप असा घेण्यांत येतो कीं, मालकीहक्क व खासगी धनसंग्रह यांची वाढ करण्याचे हक्क नष्ट केल्यास उत्पादनाचें कामच बंद पडेल. यावर मार्क्सचें उत्तर असें आहे कीं मालकी हक्कांची व धनसंग्रहांची वाढ करण्याचे हक्क ज्यांना आहेत, ते आज कोणतेंहि काम करीत नसतात आणि ज्यांना उत्पादनाचें काम करावें लागतें त्यांना मालकहिक्क किंवा संग्रह यांची वाढ करतां येत नाहीं. आजच्या समाजांत संग्रह आणि श्रम यांचें प्रमाण व्यस्त आहे. आमच्या समाजांतच तें प्रमाण सम होणार आहे. सर्वांना आपल्या श्रमफलांचा पूर्ण उपभोग मिळावा आणि एकाच्या श्रमाचीं फळें दुसऱ्यानें उपटूं नयेत अशी व्यवस्था करण्यासाठींच उत्पादनसाधनांवरची मालकी सार्वजनिक करावयाची आहे. असें केल्यानें श्रम करणारांना मिळणारा धनार्जनाचा व उपभोगाचा भाग वाढणार आहे, तो कमी होणार नाहीं. फक्त ऐदी निरुद्योग्यांचा स्वामित्वानें धनसंग्रह करण्याचा अपहारहक्क नष्ट होणार आहे. सर्वांची मालमत्ता नष्ट होणार नसून फक्त भांडवलदारी मालमत्ता समाजाची बनणार आहे. यामुळें श्रम करणारांचा उपभोग वाढणार आहे.

समाजवादी अमदानींत व्यक्तिस्वातंत्र्य नष्ट होणार या आक्षेपाला मार्क्सनें असें उत्तर दिलें आहे कीं असें म्हणणारे लोक 'व्यक्ति' म्हणजे भांडवलदार आणि 'स्वातंत्र्य' म्हणजे 'भांडवलदारी स्वातंत्र्य' असा अर्थ करीत असतात. हें भांडवलदार व्यक्तींचें भांडवलदारी व्यवहार करण्याचें स्वातंत्र्य आम्ही नष्ट करणार आहों; पण असें केल्यानें इतरांच्या व्यक्तिमत्त्वाचें व स्वातंत्र्याचें संरक्षण व संवर्धनच होणार आहे. चौथा आक्षेप असा घेण्यांत येतो कीं, समाजवादी लोक कुटुंबसंस्था नष्ट करून सर्व स्त्रिया समाईक मालकीच्या बनविणार आहेत. पण स्त्रिया ही कोणाच्या मालकीची मालमत्ता आहे किंवा त्या केवळ उत्पादनसाधनें आहेत अशी भावना असणाऱ्या भांडवलदारी वृत्तींतूनच हा आक्षेप उत्पन्न झालेला आहे. स्त्री ही उत्पादन—साधन वा मालमत्ता नव्हे हेंच समाजवाद्यांना शिकवावयाचें आहे. आज भांडवलदार धनिकांनीं गरिबांची कुटुंबसंस्था नष्ट








करून त्यांच्या बायकामुलींचा बाजार थाटलेला आहे आणि त्याला वेश्याव्यवसाय असें नांव देण्यांत येत असतें. धनार्जनाच्या इतर धंद्यांप्रमाणें हा धंदाहि हा धनिक वर्ग करीत असून निर्धन जनतेच्या स्त्रियांचा क्रयविक्रय करीत असतो. गरिबांच्या कुटुंबांचा विध्वंस करून आणि त्यांना कौटुंबिक जीवन अशक्य करून बाजारांत मांडण्यांत येणाऱ्या या स्त्रियांवरहि संतोष न पावल्यामुळें हा धनिक वर्ग आपल्या वर्गातील व्यक्तींचीं कुटुंबें फोडून त्यांच्या स्त्रियाहि भ्रष्ट करीत असतो. अशी जी धनिक वर्गाची पैशावर उभारलेली कुटुंबसंस्था आहे, ती मात्र समाजवादी चालूं देणार नाहींत, हें उघड आहे.

यानंतर शिक्षण, संस्कृति व धर्म यांचा विध्वंस समाजवादी करणार आहेत या आक्षेपाचेंहि असेंच निरसन करण्यांत आलें आहे. आजपर्यंत अनेक क्रांत्या झाल्या तरी वर्गसंस्था टिकून होती; यामुळें शिक्षण, संस्कृति व धर्म या सर्व संस्थांनीं वर्ग-संस्थेला पाठिंबाच दिला आहे. हें शिक्षण, ही संस्कृति व ही धर्मसंस्था यांची आतां गरज उरणार नाहीं. कामगारसंस्कृति ही वर्गहीन संस्कृति होणार असल्यानें तिचें स्वरूप आजपर्यंतच्या कोणत्याहि संस्कृतीहून अत्यंत भिन्न असेंच असेल. येवढें थोडक्यांत सुचवून मार्क्सनें हा आक्षेपनिरसनाचा भाग पुरा केलेला आहे.

## हिंदी राजकारणाचें आजचें व उद्यांचें स्वरूप

येथपर्यंत कॉर्ल मार्क्स याच्या जाहीरनाम्याच्या पहिल्या दोन विभागांचा संक्षिप्त गोषवारा दिला त्यावरून या जाहीरनाम्यांतील बहुतेक महत्त्वाच्या मुद्यांची ओळख वाचकांस होईल, अशी आशा आहे. जाहीरनाम्यांतील तत्त्वांच्या दृष्टीनें चालू हिंदी राजकीय प्रश्नांचा विचार जर आपण करूं लागलों तर त्यासंबंधीं आपणांस काय दिसतें तें पाहूं. हा जाहीरनामा, शंभर वर्षांपूर्वीं युरोप-खंडांत जेव्हां इंग्लंड, फ्रान्स व हॉलंड या तीन देशांत लोकशाहीची क्रांति यशस्वी करून भांडवल-दारवर्ग अधिकारारूढ झाला होता त्या वेळीं या लोकशाहीचें भांडवलदारी स्वरूप नष्ट करून तिला समाजवादी स्वरूप देऊं पाहणाऱ्या, क्रांतिकारक कामगारसंघटनेच्या वतीनें कार्ल मार्क्सनें काढिला होता. अद्यापि या तीन देशांत समाजवादी क्रांति घडलेली नाहीं. यावरून आमच्या देशांतील कांहीं लोकांना असा भ्रम होण्याचा संभव आहे कीं, ज्याअर्थीं गेल्या शंभर वर्षांत या भांडवलदार लोकशाही देशांत समाजवादी क्रांति यशस्वी होऊं शकली नाहीं, त्याअर्थीं आपल्या हिंदुस्थान देशांतहि समाजवादी क्रांति आणखी पांच–पन्नास वर्षें तरी होण्याचा बिलकुल संभव नाहीं; पण हा शुद्ध भ्रम आहे. ज्यावेळीं हा जाहिर-नामा प्रसिद्ध झाला त्या वेळीं वरील युरोपीय देशांनीं आपलीं प्रचंड साम्राज्यें आशियाखंडांत विस्तारलेलीं असल्यामुळें आणि जगांतील मागस-लेल्या देशांची लूट करण्यास त्यांना भरपूर क्षेत्र आणि मुबलक अवकाश मिळाल्यामुळें, सर्व जगांतून लूटमार करून नेलेल्या धनाचा कांहीं अंश आपल्या देशांतील निर्धन कामगारांना थोड्या-थोड्या प्रमाणांत एकसारखा देत राहून, त्यांनीं समाजवादी क्रांतीपासून भांडवलशाहीचा बचाव केला आणि आपल्या देशांतील लोकशाहीचें भांडवलदारी स्वरूप कायम ठेविलें. परंतु असें करण्यासाठीं त्यांनीं हिंदुस्थानप्रभृति आशियांतील राष्ट्रांची संपत्ति इतकी धुऊन नेली कीं, हीं सर्व राष्ट्रें केवळ शेतकरी कामकरी वर्गांचीं गुलाम राष्ट्रें बनलीं. येथें युरोप खंडांतील भांडवलशाहीशीं स्पर्धा करणारा भांडवलदार वर्गहि आपल्या शक्तीनें आपलें डोकें वर काढूं शकला नाहीं. पुढें इटली व जर्मनी हे युरोपियन देश पुढें येऊन जर्मनी, ऑस्ट्रिया आणि तुर्कस्थान यांनीं ब्रिटिश, फ्रेंच व डच यांच्या साम्राज्यांविरुध्द, महायुध्द पुकारलें. यांत जर्मनीचा पाडाव झाला. तरीहि इंग्लंड, फ्रान्स व हॉलंड यांचीं साम्राज्यें हादरलीं आणि भांडवलशाही संस्कृति मोडकळीस येऊन गडगडूं लागली.

या भांडवलशाही संस्कृतीला उलथून पाडून तिला कायमची गाडून टाकणारा कम्युनिझम

# कम्युनिस्ट जाहीरनाम्याच्या चव्ह्यांतून

याच युध्दामध्यें १९१७ सालीं रशियांत विजयी झाला आणि आपल्या धर्तीवर सर्व युरोपांत आणि आशियांत क्रांत्या करण्याचे प्रयत्न त्यानें गेलीं तीस वर्षें सतत चालविले आहेत व या काळांत १९३९ सालीं सुरू झालेलें दुसरें महायुध्द होऊन गेलें आणि त्या युध्दानंतर रशिया हें कम्युनिस्ट राष्ट्र सर्व पूर्व युरोप आपल्या कक्षेंत आणून बर्लिनपर्यंतचा प्रदेश आपल्या पायांखालीं घालून बसले आहेत. आशिया खंडांतील निम्मा चीन कम्युनिस्ट राज्य स्थापन करून, उरलेल्या निम्म्या चीनवर आक्रमण करूं लागला आहे. सर्व मुसलमानी राष्ट्रें आणि हिंदुस्थान यांच्या सरहद्दीपर्यंत रशियाचें कम्युनिस्ट राज्य पसरलेलें असून, या प्रचंड राष्ट्राशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य एकट्या अमेरिकेखेरीज इतर कोणत्याहि राष्ट्रास नाहीं, याबद्दल आज कोणासहि शंका नाहीं. अमेरिकेलाहि रशियावर चढाई करून विजय संपादन करण्याची शक्ति कितपत आहे ही शंकाच आहे. तथापि रशियाचें बळ आणि प्रभाव एकसारखा वाढत असल्यानें त्याचा बंदोबस्त लवकरच केला पाहिजे, या वृत्तीनें अमेरिका आज आक्रमक धोरण स्वीकारीत आहे. पश्चिम युरोपांतील इंग्लंड, फ्रान्स आदि लोकशाही राष्ट्रें आज हतबल होऊन, अमेरिकेच्या कक्षेंत जाऊं लागलीं आहेत व त्या विभागांत लोकशाही पध्दतीचा समाजवाद स्थापन करण्याची भाषा, तेथील लोक बोलत आहेत. इंग्लंडांतहि लोकशाही पध्दतीनें समाजवादी मंत्रिमंडळ अधिकारावर आलेलें आहे. ही सर्व परिस्थिति लक्षांत घेतां, लोकशाहीचें भांडवलदारी स्वरूप आतां जगांत कोठेंहि टिकूं शकत नाहीं, हें सर्वमान्य झालें आहे.

आपला देश नुकताच स्वतंत्र होऊन, त्यांत भांडवलदार लोकशाही स्थापन झाली आहे. या लोकशाहीवर ज्या काँग्रेसपक्षाचें प्रभुत्व आज स्थापन झालें आहे ती काँग्रेस अद्यापि समाजवादाची जहाल भाषा बोलूं लागली नसली तरी समाजवादी लोकशाही हेंच आमचें ध्येय आहे असें ती म्हणत आहे. पं. नेहरू हे तिचे आज सर्वश्रेष्ठ नेते असून ते जगप्रसिध्द समाजवादी आहेत व राष्ट्रीय सभेला त्यांचीं मतें सर्वस्वीं मान्य नसलीं तरी त्यांच्या नेतृत्वावांचून तिला या देशावर राज्य करणें अशक्य आहे. तेव्हां समाजवादी लोकशाही ही आतां या देशांत स्थापन होणें अपरिहार्य झालें आहे, हें कोणासहि नाकारतां येणें शक्य नाहीं. तथापि राष्ट्रीय सभेंतून भांडवलदार वर्गाचें उच्चाटन झालेलें नाहीं आणि तिचीं सूत्रें कामगारवर्गाशीं समरस व एकरूप झालेल्या समाजवादी पक्षाच्या हातीं आलेलीं नाहींत. म्हणून राष्ट्रीय स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर समाजवादी पक्ष आज तिच्यांतून बाहेर पडत आहे. यामुळें राष्ट्रीय सभा ही एक नेमस्त समाजवादी अशी संस्था बनत आहे.

समाजवादी पक्ष हा 'प्रत्यक्ष प्रतिकार आणि सत्याग्रह या मार्गांनीं समाजवादी लोकशाहीची स्थापना आम्ही करूं, आणि राष्ट्रीय सभेला अवश्य असल्यास सनदशीर विरोध करूं' असें म्हणत आहे. निःशस्त्र क्रांति हें त्यानें आपलें धोरण जाहीर केलें आहे. जोंपर्यंत देशांतील राज्ययंत्र लोकशाही स्वरूपाचें आहे आणि लोकशाहीला आधारभूत असे—मतस्वातंत्र्य, आचारस्वातंत्र्य आणि संघटनास्वातंत्र्य हे—हक्क शाबूत आहेत, तोंपर्यंत आपणांस शांततेच्या व न्यायाच्या मार्गानें समाजवादी क्रांति करतां येईल, असा विश्वास या पक्षाचे अधिकृत नेते बोलून दाखवितात आणि काँग्रेसच्या नांवानें राज्य करणाऱ्या पक्षानें जर लोकशाही राज्य नष्ट केलें नाहीं, तर प्रत्यक्ष प्रतिकाराच्या पण शांततेच्या मार्गापासून हा पक्ष ढळेल, असें वाटत नाहीं. परंतु १९४२ सालीं ब्रिटिश सत्तेनें जशी हिटलरशाही या देशांत गाजविली तशी हिटलरशाही युद्धाच्या किंवा इतर कोणत्या तरी सबबीनें जर या देशांत निर्माण झाली तर हा पक्ष आपलें कार्य या धोरणानें चालवूं शकणार नाहीं. ज्या परिस्थितींत म. गांधींना सुद्धां ब्रिटिश सरकारला असें बजावून सांगावें लागलें कीं १९४२ च्या ८








ऑगष्टनंतर जे शोचनीय प्रकार घडून आले, त्यांची सर्व जबाबदारी एकट्या सरकारच्याच माथ्यावर आहे आणि सरकारनेंच लोकांना अत्याचारास प्रवृत्त केलें, ज्या परिस्थितींत म. गांधींच्यासारख्या तपस्वी सत्याग्रही यतीलाहि जर असें म्हणून स्वस्थ बसावें लागलें, तर तशीच परिस्थिति निर्माण झाल्यास समाजवादी पक्ष लोकाना शांत ठेवूं शकेल, अशी अपेक्षा कोणाहि सुज्ञ मनुष्यास करतां येणार नाहीं. समाजवादी पक्ष हा विवेकी पक्ष आहे. सन्मार्ग सोडूं नये, लोकशाही मोडूं नये आणि अविवेकी हिंसा करूं नये अशी त्याची वृत्ति आहे. आणि ही वृत्ति नष्ट न होतां, वाढत जाण्यास अनुरूप व अनुकूल अशी परिस्थिति कायम ठेवण्याची जबाबदारी कॉंग्रेसच्या नांवानें राज्य करणाऱ्या मंत्रिमंडळावर आहे. त्यांचा जर लोकशाहीवर आणि नागरिक हक्कांवर विश्वास असेल आणि कठोर तत्त्वनिष्ठेनें त्यांनीं त्यांचें रक्षण केलें, तर या देशांत समाजवादाची स्थापना करण्यासाठीं रक्तपाती क्रांति टाळण्याची जबाबदारी समाजवादी पक्ष आपल्या हिंमतीवर पार पाडूं शकेल असें आम्हांस वाटतें.

ही परिस्थिति कायम टिकेल, तर राष्ट्रीय सभेचा नेमस्त सनदशीर मार्ग आणि समाजवाद्यांचा प्रत्यक्ष प्रतिकारी निःशस्त्र क्रांतिमार्ग या दोहोंच्या साहाय्यानें हिंदुस्थान लोकशाही समाजवादाची स्थापना करील, कम्युनिस्टांचा सशस्त्र क्रांतिमार्ग या देशाला अनुसरावा लागणार नाहीं, असें आम्हांस वाटतें. अर्थात् तो मार्ग चोखाळावा लागल्यास देशांतील लोकशाही मोडेल हें उघड आहे. तसेंच सशस्त्र क्रांतीनंतर जी एकपक्षीय अनियंत्रित सत्ता स्थापन होते, तिच्या अमदानींत नागरिकस्वातंत्र्य नष्ट होतें व विरोधी पक्षसंघटना उखडून टाकण्यांत येतात. रशियांतील ही अनियंत्रित हुकूमशाही पाहिली असतां या मार्गानें जाणें कोणासहि इष्ट वाटणार नाहीं. म्हणून समाजवाद्यांच्या निःशस्त्र क्रांतीचा मार्गच अखेरीस इष्ट व शक्य असा या देशांत ठरेल असें वाटतें. या मार्गाचें श्रेष्ठत्व म. गांधींनीं या देशास शिकविलें असून त्यांच्या निधनानंतर त्या मार्गानें जाऊन आपण समाजवादी लोकशाही निर्माण करूं हा विश्वास साथी जयप्रकाश प्रभृतींना आज वाटत आहे. येथील लोकशाही नष्ट करण्याइतका कम्युनिस्ट पक्ष प्रबल व प्रभावी होण्याचें वस्तुतः आज कांहींच कारण नाहीं. पण राष्ट्रीयसभापक्षानेंच समाजवादी पक्षाला उखडून काढण्याचें धोरण स्वीकारलें तरच कम्युनिस्ट पक्ष जोरास लागेल. पण मग लोकशाहीचा अंत राष्ट्रीयसभापक्षानेंच केला असें म्हणावें लागेल ! समाजवादी पक्ष हा जीं साधनें वापरूं इच्छीत आहे, तीं राष्ट्रसभेनेंच त्याला शिकविलेलीं आहेत हें लक्षांत घेऊन त्याला शांततेनें आपला मार्ग चोखाळूं दिल्यास लवकरच येथें जी लोकशाही स्थापन होत आहे तिचें समाजवादांत रूपान्तर होईल.

## गांधींचें कार्य आणि समाजवाद

गांधींचे खरे वारस कोण हा वाद निरर्थक आहे. म. गांधींच्या कल्पनेप्रमाणें सर्व राष्ट्रसभा सर्वोदय-समाज बनली नाहीं आणि पं. नेहरूंच्या मताप्रमाणें ती समाजवादीहि पूर्णपणें बनली नाहीं. टिळक-गोखले यांच्याप्रमाणें जयप्रकाश–जवाहरलाल हे जहाल–मवाळ राजकारण करीत आहेत. दोघांना एकत्र ठेवून दोघांच्या सहकार्यानें कार्यभाग साधून देणारी शक्ति म. गांधींनीं आपल्या आत्मबलाच्या प्रेरणेनें राष्ट्रसभेंत निर्माण केली होती. त्यांच्या निधनानें ती नष्ट झाली आहे. सर फेरोजशहा यांच्या हट्टामुळें पूर्वीं सुरतेस राष्ट्रसभा दुभंगली आणि गोखले व टिळक एकमेकांपासून दुरावले. त्यामुळें स्वराज्य लांबणीवर पडलें, राष्ट्रसभा राष्ट्रीयत्व गमावून बसली आणि देशांत अत्याचार व दडपशाही यांचा प्रादुर्भाव झाला. या आपत्ती टाळण्यास मंत्रिमंडळें पं. नेहरूंच्या धोरणानें चालवून त्यांचें बाहेरून नियंत्रण करण्याची सत्ता साथी जयप्रकाश किंवा आचार्य नरेंद्रदेव यांच्या हातीं देणें अवश्य होतें. हें जर कोणीं केलें असतें तर त्यांना गांधींच्या राजकीय वारशावर हक्क सांगतां आला असता. आतां दोन पक्ष अलग झाले त्याचे दुष्परिणाम भोगावे लागणारच. पण आतां

## कम्युनिस्ट जाहीरनाम्याच्या चष्म्यांतून

हे दुष्परिणाम किमान प्रमाणांतच राहावे येवढी तरी काळजी उभयपक्षीं घेतली जावी. आज गांधी नाहींत, तरीहि त्यांनीं निःशस्त्र क्रांतीचा जो मार्ग दाखवून दिला, त्यामुळें समाजवाद्यांना एक नवी दृष्टि लाभली आहे. मार्क्सच्या वेळीं निःशस्त्र क्रांतीचा पर्याय जगाला माहीत नव्हता. तो पर्याय म. गांधींनीं आम्हांस शिकविला. त्या मार्गानें जाण्याचें धोरण आंखणारा एक समाजवादी पक्ष पुढें आला हाहि गांधींचाच प्रभाव आहे. पण ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं शहाणा स्वार्थ लक्षांत घेऊन शांततारक्षण करतांना कठोर वृत्ति स्वीकारली तरी, निःशस्त्र क्रांतिकारकांना सशस्त्र क्रांतिकारकांप्रमाणें उखडून काढण्याचें अविवेकी धोरण स्वीकारलें नाहीं तोंपर्यंतच गांधींना राष्ट्रसभा निःशस्त्र क्रांतीच्या मार्गावर ठेवतां आली. चर्चिल–मंत्रिमंडळानें हा विवेक गुंडाळून ठेविला तेव्हां गांधींनाहि त्यांत अपेश येऊं लागलें. पण थोड्याच काळांत चर्चिल गेले आणि गांधी यशस्वी झाले. हें शहाणपण पं. नेहरू यांच्या व्यतिरिक्त किती मंत्री दाखवितील आणि पं. नेहरूंची समाजवादी लोकशाही संस्कृति त्यांच्या अंगीं किती प्रकट होईल, यावर देशाचें भवितव्य अवलंबून आहे. पं. नेहरूंच्या वृत्तीशीं व विचारांशीं ते जितके समरस होतील आणि म. गांधींच्या असामान्य निरपेक्ष अहिंसावादाची भाषा सोडून सापेक्ष नीतीच्या वृत्तीनें लोकशाही राज्य चालवितील तितक्या प्रमाणांत हिंदी समाजवादी पक्ष निःशस्त्र क्रांतीच्या मार्गावर खंबीर राहून समाजवादाची संस्थापना करील आणि गांधींचें कार्य चिरंतन करण्याचा व्यवहार्य व शास्त्रीय मार्ग जगाला दाखवून देईल. मार्क्सवादांत जर कोणती भर घालणें हिंदुस्थानला शक्य असेल तर ती येवढीच होय. म. गांधी जिवंत असते, तर त्यांनीं हें करण्यांत मार्गदर्शन केलें असतें. पण आतां त्यांनीं जेवढें कार्य केलें तेवढें चिरंतन करण्याचा हाच मार्ग आहे. पं. नेहरू व साथी जयप्रकाश हे आजचे गोखले–टिळक आहेत. गांधी प्रत्येक पिढीस कसे लाभणार? तथापि त्यांनीं आपले संस्कार या दोनहि पुढाऱ्यांवर भरपूर केले आहेत. तेच त्यांचें कार्य शक्य तितकें पुढें चालवितील. कम्युनिस्ट जाहीरनाम्याच्या चष्म्यांतून आजच्या हिंदी राजकारणाचें स्वरूपदर्शन आम्हांस असें होत आहे.

---

### अहिंसकाचें स्वयंबलिदान—

दुसऱ्यांना ठार मारतां मारतां मरून जाणाऱ्या लक्षावधि लोकांच्या बलिदानांपेक्षां एका निरपराधी माणसाचें स्वयंबलिदान हें लक्षावधि पटींनीं अधिक प्रभावशाली आहे.

—महात्मा गांधी

### खरा त्याग—

त्याग करून दाखविणाऱ्या माणसानें दुर्मुखलेलें असणें हें दृश्य विद्रूप होय. ज्या त्यागांत आनंद नाहीं तो त्यागच नव्हे.

—महात्मा गांधी








# स्वतंत्र भारतांतील जाती

डॉ. के. ल. दप्तरी

मध्यप्रदेश–कायदेमंडळांत 'जाती कायद्यानें मोडून टाकाव्या' ह्या विषयींच्या ठरावावर ता. ३ व ४ मार्च १९४८ रोजीं जीं भाषणें झालीं, तीं वाचून 'जाती' ह्या विषयाचा संपूर्ण विचार लोकांपुढें ठेवण्याची आवश्यकता वाटली म्हणून हा निबंध लिहीत आहें.

जातीयतेमुळें भारतीयांचें फार नुकसान झालें आहे ह्याविषयीं दुमत नाहीं. पण जातीयता नाहींशी करण्याकरितां जातीच मोडल्या पाहिजेत हें मात्र खरें नाहीं. शिवाजीच्या कार्यांत सर्व जातींच्या लोकांनीं सारखीच मदत केली किंवा महात्मा गांधींच्या कार्यांत सर्वच जाती सामील झाल्या हें प्रत्यक्ष पाहिल्यावर तरी जाती नष्ट केल्याशिवाय जातीयता नष्ट होणार नाहीं हें आपण म्हणूं शकत नाहीं. आणि जाती नष्ट केल्यानें जर नुकसान होणार असेल तर जाती नष्ट करण्याच्या मार्गे न लागतां, जातीयताच नष्ट करण्याच्या मार्गे आपण लागलें पाहिजे हें उघड आहे. किंवा जाती नष्ट कराव्याच असें ठरलें तर त्या नष्ट करण्याचा उत्तम उपाय कोणता ह्याचा विचार केला पाहिजे.

## जाती कशा उत्पन्न झाल्या?

जाती नष्ट न करतां जातीयताच नष्ट करण्याचा उपाय कोणता किंवा जातीच नष्ट करण्याचा उत्तम उपाय कोणता ह्याचा विचार करण्याकरितां जाती कशा उत्पन्न झाल्या ह्याचें यथार्थ ज्ञान आपण करून घेतलें पाहिजे. जातींचा मागील इतिहास जाणून घेतल्याशिवाय जातींचें पुढील भवितव्य ठरवितां येणार नाहीं. जातींचा संपूर्ण इतिहास माझ्या "Social Institutions in Ancient India" ह्या ग्रंथांत पाहावयास सांपडेल. त्याचें सार येथें सांगतों.

शकपूर्व ३१८० म्हणजेच खिस्तपूर्व ३१०२ ह्या काळीं, आनंद नांवाच्या ब्रह्मदेवानें म्हणजेच त्या वेळच्या सर्वश्रेष्ठ अधिकाऱ्यानें समाजाचे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र असे चार वर्ण म्हणजेच वर्ग किंवा विभाग, सर्व समाजाच्या हिताकरितांच पाडून त्या प्रत्येक वर्णास त्याचीं त्याचीं कर्तव्येंहि वांटून दिलीं. सुखाचा हिस्सा प्रत्येक व्यक्तीस सारखाच मिळाला पाहिजे हें जरी खरें आहे, तरी सर्वांचें बुद्धिबल, शरीरबल, आणि मानसिक बल सारखेंच असत नाहीं. त्यामुळें कर्तव्यकर्मे करण्याची योग्यता सर्वांत सारखीच असत नाहीं. म्हणून असे वर्ग पाडून प्रत्येक वर्गास निरनिराळीं कर्तव्यें सांगणें हाच समाजाच्या आत्यंतिक हिताचा मार्ग आहे व तोच आनंद या ब्रह्मदेवानें अनुसरला. नवीन जन्मलेल्या मुलांची निरनिराळ्या वर्णांत भरती करण्याकरितां, मनुसप्तर्षि नांवाचे अधिकारीहि त्यानें निर्माण केले. सप्तर्षि ब्राह्मण-वर्णांत नवीन भरती करीत, मनु क्षत्रियवर्णांत व वैश्यवर्णांत नवीन भरती करी; बाकीचे अर्थात्च शूद्र समजले जात. पुढें रैवत मनूनें थोडी निराळी व्यवस्था केली. ब्राह्मणाची संतति ब्राह्मणच समजली जावी, क्षत्रियाची क्षत्रियच, वैश्याची वैश्यच आणि शूद्राची शूद्रच समजली जावी असा








नियम त्यानें केला. हें त्याचें करणें फारसें चूक नव्हतें. कारण बुद्धिबल, शरीरबल तसेंच मानसिक बल बहुधा संततींत उतरत असतेंच. तथापि कांहीं कांहीं अपवादभूत प्रसंगीं तीं बलें संततींत जशीचीं तशींच उतरतहि नाहींत; म्हणून वर्ण जन्मजात मानले तरी ब्राह्मण वर्णांतहि क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र वर्णांत घातले जाण्यास योग्य असे मनुष्य उत्पन्न होतात; शूद्रवर्णांतहि ब्राह्मण, क्षत्रिय, किंवा वैश्य वर्णांत घातले जाण्यास योग्य असे मनुष्य उत्पन्न होतात. ह्यामुळें वर्णांचा विभाग पुनः पुनः करणें भाग पडतें आणि तसा वर्णांचा पुनः पुनः विभाग, चाक्षुष मनु, वैवस्वत मनु वगैरे सहा मनूंनीं वेळोवेळीं केला. ह्याशिवाय एका वर्णांतून दुसऱ्या वर्णांत आपोआपच, म्हणजेच मनुसत्तर्पीच्या कारवाईशिवायच, जाण्याची व्यवस्थाहि होतीच, ती अशीः—

क्षत्रियानें आपल्या संततीस क्षत्रियाला योग्य असेंच शिक्षण द्यावें; पण असें शिक्षण दिलें असूनहि संततीनें जर ब्राह्मणास आवश्यक असे गुण प्रकट केले, तर त्या संततीनें वयाच्या चोविसाव्या वर्षानंतर ब्राह्मणवर्णांत कोणत्या तरी ब्राह्मणाच्या संमतीनें जावें; असेंच इतर वर्णांचेंहि होत असे. "शूद्रो ब्राह्मणतामेति ब्राह्मणश्चैति शूद्रताम् । क्षत्रियाज्जातमेवं तु विद्याद् वैश्यात्तथैव च ॥" अशी मनुस्मृतींत वर्णिलेली व्यवस्था तेव्हां होती व ह्या व्यवस्थेप्रमाणें झालेलीं अनेक वर्णांतरें पुराणांत दिलेलीं आहेत. विश्वामित्र मूळचा क्षत्रिय असून ब्राह्मण झाला हें त्यांपैकींच एक उदाहरण होय.

बुद्धाच्या काळीं जी गडबड झाली त्या गडबडीपासून मनुसत्तर्पीचाहि लोप झाला आणि आपोआप होणारें वर्णांतरहि लोपलें; एकूण दोनहि प्रकारचें वर्णांतर लोपलें. कोणत्याहि वर्णांतील मनुष्याला आपणाशीं समान अशा दुसऱ्या वर्णांतील मुलीशीं विवाह करण्याची परवानगी होती तीहि बुद्धानंतर लवकरच हळूहळू बंद होत गेली. ह्या दोन कारणांमुळें वर्णांतूनच आजच्या जाती उत्पन्न झाल्या व त्या हजार वर्षांपासून जशाच्या तशाच आहेत.

## वर्णसंकर

ह्या प्रत्येक जातीमध्यें आज चारहि वर्णांना योग्य असे मनुष्य आहेत. म्हणजे ब्राह्मण जातींत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य वा शूद्र वर्णाला योग्य असे मनुष्य आहेत आणि शूद्र वर्णांत देखील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य वा शूद्र वर्णाला योग्य असे मनुष्य आहेत. आणि ब्राह्मण जातींतील मनुष्य चारीहि वर्णांचीं कर्में करूं लागले आहेत. आणि शूद्रवर्णांतील मनुष्यहि चारी वर्णांचीं कर्में करूं लागले आहेत. ह्यालाच वर्णसंकर असें म्हणतात.

## जातीयतेचें विष

ह्याप्रमाणें वर्णांपासून जाती व वर्णसंकर उत्पन्न होतांनाच नवीनच एक विष उत्पन्न होत गेलें. प्रत्येक जात दुसऱ्या जातीचें नुकसान करून देखील स्वजातीचें हित करण्याचा प्रयत्न करूं लागली. प्रत्येक जातींत आपण इतर जातींहून वेगळे आहों व आपल्या हिताहिताचा इतर जातींच्या हिताहिताशीं कांहीं संबंध नाहीं अशी भावना उत्पन्न झाली. ह्यालाच वेगळेपणाची भावना किंवा पृथक्त्वभावना किंवा जातीयता असें म्हणतात. भारतीयांचें नुकसान खरोखर जातींनीं झालें नसून ह्या जातीयतेनें झालेलें आहे हें आपण ओळखलें पाहिजे. शिवाजीच्या वेळीं जातीयता जेव्हां लुप्त झालेली होती तेव्हां आपण मोठें कार्य केलें आणि पेशवाईच्या शेवटीं जातीयतेचा फार जोर झाला तेव्हां आपण परतंत्र झालों हें लक्षांत ठेवलें पाहिजे. जातीयता सुविचारांनीं घालवितां येईल; त्याकरितां जातीच घालविल्या पाहिजेत असें नाहीं, हें आपण समजून घेतलें पाहिजे.

ह्यावर कांहींचें म्हणणें असें येईल कीं "जातींपासून फायदा असा कोणताच नाहीं; उलट जातीयता उत्पन्न होण्यास त्या कारणच होतात, तर 'जातीच' कां घालवूं नयेत? जाती घालविल्यानें जातीयता घालविली जाईलच." हें त्यांचें म्हणणें बरोबर आहे. जाती घालविल्याच पाहिजेत; पण त्याकरितां जे उपाय आपण योजूं त्यांनीं राष्ट्राचें नुकसान होऊं नये ह्याची काळजी









अनुक्रमणिका

आपण घेणें जरूर आहे. राष्ट्राचें नुकसान होणार नाहीं असेच उपाय आपण योजिले पाहिजेत.

### पतिपत्नींमध्यें समान गुणधर्म आवश्यक

मध्यप्रांत–कायदेमंडळाचे सभासद व घटना-परिषदेचे सदस्य श्री. दादा धर्माधिकारी ह्यांनीं सुचविलेला एक उपाय असा आहे कीं कोणत्याहि जातींतील मुलानें आपल्याच जातींतील मुलीशीं विवाह करूं नये, भिन्न जातींतील मुलीशीं विवाह करावा; अगर समानजातीय विवाहास कायद्यानें प्रतिबंध करावा. ह्या प्रतिबंधाची इष्टानिष्टता ठरविण्यापूर्वीं विवाह कोणीं कोणाशीं करावा ह्याचें तत्त्व ठरविलें पाहिजे. मनुष्यानें आपले जे गुणधर्म आहेत तेच जिच्यांत आहेत अशा स्त्रीशीं विवाह केल्यास संततीहि बहुधा त्याच गुणधर्मांची होते, हा नैसर्गिक नियम लक्षांत ठेवला पाहिजे. म्हणून राष्ट्रांत चांगल्या गुणांचा परिपोष करावयाचा असल्यास चांगल्या गुणांच्या मनुष्यानें चांगल्या गुणांच्या स्त्रीशींच विवाह करावा असाच नियम असला पाहिजे. बुद्धिबल व मानसिक बल ह्यांनीं संपन्न असे मनुष्य कोणत्याहि राष्ट्रांत किंवा समाजांत थोडेच असतात. त्यांना जर बुद्धिहीन व मानसिकबलहीन स्त्रियांशीं विवाह करण्यास भाग पाडलें, तर राष्ट्रांतील बुद्धिबलयुक्त व मानसिकबलयुक्त मनुष्यांचा भरणा कमी होऊन राष्ट्र अधोगतीस जाईल हें निश्चित आहे. म्हणून मनुष्यानें समान गुणधर्मांच्या स्त्रीशीं विवाह करावा, असाच विवाहनियम पाहिजे व त्याचें उल्लंघन होणार नाहीं अशी काळजी कायदे करणारांनीं घेतली पाहिजे. वैदिक धर्मग्रथांत असाच नियम आहे. गौतम म्हणतो "गृहस्थः सदृशीं भार्यां विन्देत ॥ १ ॥ (अध्याय ४) वसिष्ठहि "गृहस्थः सदृशीं भार्यां विन्देत" असेंच म्हणतो. (अध्याय ८, १.) ह्या नियमानेंच चांगल्या गुणधर्मांच्या मनुष्यांचा पुरेसा भरणा राष्ट्रांत राहील.

आतां आज वर्णांची अवनति होऊन जाती बनल्या असल्या तरी ब्राह्मण जातींतच बुद्धिमान् मनुष्यें जास्त प्रमाणांत सांपडतील; मराठा, रजपूत वगैरे क्षत्रिय जातींतच शूर माणसें पुष्कळ सांपडतील; कुणबी वगैरे वैश्य जातींतच शरीरबलसंपन्न माणसें पुष्कळ सांपडतील; अशी स्थिति आहे. ह्या जातींतील माणसांना भिन्न जातींतील स्त्रियांशीं विवाह करण्यास भाग पाडलें तर पतिपत्नींमध्यें मागील परिच्छेदांत ठरविल्याप्रमाणें जें समानत्व पाहिजे तें बहुतेक प्रसंगीं असणार नाहीं आणि त्यामुळें संततीची अवनति होऊन राष्ट्राचें नुकसान होईल. ह्या दृष्टीनें श्री. दादा धर्माधिकारी यांची सूचना अग्राह्य ठरते.

### राष्ट्रस्वामित्वपद्धती( Socialism )नेंच जातीयता नष्ट होईल.

जातीयता नाहींशी करण्याकरितां विवाहाच्या कायद्यांत बदल करणें केव्हांहि गैरच आहे. कारण विवाहनियमांचें प्राप्तव्य सुप्रजा हेंच मानलें पाहिजे आणि जातीयतानाशाचें प्राप्तव्य राष्ट्रांत ऐक्यभावना असणें हें मानावें लागतें. ऐक्यभावना उत्पन्न करण्याकरितां सुप्रजेला मुकणें केव्हांहि इष्ट नाहीं. कारण ऐक्यभावना ही केवळ मनाची भावनाच असल्यामुळें शिक्षणानें मनावर चांगले संस्कार करूनहि, ती प्राप्त करून घेतां येते. अशा शिक्षणास अनुकूल अशी परिस्थिति मात्र निर्माण करणें आवश्यक आहे. ती परिस्थिति म्हणजे सुखाचा वांटा सर्वांस सारखा मिळेल अशी योजना. प्रत्येकानें आपल्या बुद्धिबलाशीं, शरीरबलाशीं किंवा मानसिक बलाशीं जुळेल असें काम करावें आणि त्या कामाचें सर्व फळ राष्ट्रास अर्पण करावें आणि राष्ट्रानें प्रत्येकास त्याच्या त्याच्या सुखाकरितां जें जें लागेल तें तें सर्व पुरवावें. एका कुटुंबांतील निरनिराळ्या व्यक्ती निरनिराळीं कामें करतात तरी प्रत्येकास त्याला जितकें व जसें अन्नवस्त्र लागेल तितकें व तसें मिळतें, किंबहुना सर्वांत कमी काम करणाऱ्या माणसासहि त्याला जरूर असेल तर सर्वांत जास्त आणि जास्त खर्चाचें अन्न मिळतें; त्यासारखेंच हें आहे. ह्यालाच राष्ट्रस्वामित्व–पद्धति ( Socialism ) म्हणतात आणि ह्यानेंच ऐक्यभावना व प्रेम निर्माण होतील आणि जातीयता नाश पावेल. कारण 'जातीयते'चा उद्देश






खरी जातीला धनाचा व सुखाचा जास्त वांटा मिळवून देणें हाच आहे.

वरील प्रतिपादनावरून दिसून येईल कीं जातीयता नष्ट करण्याचा खरा मार्ग राष्ट्र-स्वामित्वपद्धतीच होय. ह्याविषयीं मी दुसरा एक स्वतंत्र निबंध लिहिलेला आहे आणि त्यांत राष्ट्र-स्वामित्वपद्धति स्थापन करण्याची आवश्यकताहि प्रतिपादिली आहे. ती पद्धति स्थापन केली म्हणजे सर्वांस सारखें सुखहि मिळेल आणि ऐक्यभावनाहि उत्पन्न होईल. एकाच गोळ्यानें दोनहि पक्षी मरतील.

## वर्णव्यवस्थेची आवश्यकता

मग जातींचें काय होईल ? जातींचे पुनः वर्ण बनविता येतील आणि तेंच इष्ट आहे. ' स्वतंत्र भारतांतील शासनपद्धति ' ह्या मीं लिहिलेल्या दुसऱ्या एका निबंधांत, राष्ट्रस्वामित्वनिष्ठ समाजांतील शासनपद्धति वर्णिली आहे. तेथें " धनोत्पादन आणि कर्मविभजन " यांचें एक खातें सांगितलें आहे आणि त्या खात्याचें काम ग्रामपंचायतीनें करावें असें सांगितलें आहे. ग्रामपंचायत कोणालाहि जें काम सांगेल, तें त्याचें बुद्धिबल, शरीरबल आणि मानसिक बल ह्यांना झेपेल असेंच काम सांगेल हें उघड आहे. ग्रामपंचायतीच्या आदेशाप्रमाणें जे समान काम करीत असतील त्यांमध्येंच किंवा त्यांच्या संततींमध्येंच विवाह व्हावे असा निर्बंध केल्यास वर्णच स्थापल्यासारखें होईल. मनु-सप्तर्षी जें वर्णविभागाचें काम मधून मधून पुनः पुनः करीत तेंच ग्रामपंचायत सतत करीत राहील आणि आपोआप होणाऱ्या वर्णांतराचें कामहि ग्रामपंचायतच करीत राहील. ह्याप्रमाणें उत्तम प्रकारची वर्णव्यवस्था स्थापन होईल व तिनें राष्ट्राचा फार फायदा होईल. रशियांत अशा प्रकारचा विवाहनिर्बंध आहे किंवा नाहीं हें मला माहीत नाहीं. तो निर्बंध तेथें नसला तरी आपल्या भारतांत असा निर्बंध घालण्यास कोणतीच हरकत दिसत नाहीं. तें आपल्या शहाण्या पूर्वजांच्या शहाणपणाचें अनुसरण करण्यासारखेंच होईल आणि त्या वर्णपद्धतीमुळें त्यांना जो उत्कर्ष बुद्धपूर्वकाळीं प्राप्त झाला त्यापेक्षांहि उच्चतर उत्कर्ष आपणांस प्राप्त होईल; कारण, त्यांच्या वर्णव्यवस्थेस आपण राष्ट्र-स्वामित्वनिष्ठेची जोड देत आहों. आज राष्ट्र-स्वामित्वनिष्ठ समाज स्थापन करणें हें आपलें मुख्य कर्तव्य आहे. वर्णव्यवस्था त्यामागोमाग येईलच, अर्थात् जातींचे पुनः वर्ण बनतील.

## हिंदु-मुसलमान ऐक्य—

वीर सावरकर आणि कायदे आझम जिना यांच्याशीं माझे मतभेद आहेत याबद्दल मी माफी चाहतों. परंतु माझा दावा असा आहे कीं, लक्षावधि हिंदु आणि मुसलमान त्याचप्रमाणें ' हिंदुस्थान ही आमची मायभूमि आहे ' असें समजणारे इतर हिंदेतर या सर्वांच्या संयुक्त ऐक्यभावनेचा मी प्रतिनिधि आहे. आपल्या या देशांतील प्रत्येक रहिवाशाला स्वातंत्र्य मिळावें ह्याकरितां मी जगत आहें आणि ह्याप्रीत्यर्थच मरणहि पत्करण्याइतकें मनोधैर्य माझ्या अंगीं असावें अशी माझी इच्छा आहे......माझ्या जिवंतपणीं नसली तरी मरणानंतर तरी हिंदु आणि मुसलमान अशा दोघांचीहि खात्री पटेल कीं, जातीय ऐक्याबद्दलची माझी तळमळ शेवटपर्यंत अखंडपणें चालू होती.

—महात्मा गांधी








# जीवनप्रयोग !

( छंद : जीवनलहरी )

महात्मा गांधींचा आत्मा अंतराळांतून जात असतां स्वत:संबंधीं त्यांच्या मनांत कोणते विचार येत असतील ?

१

आयु असे मम
जीवनप्रयोग !

२

कुणी शिकवी न
कुणी आचरी न
असा हा प्रयोग
असे मानसिक.

३

मम गुरु जाया,
भारतीय स्त्री जी
आधुनिकतेच्या
दृष्टीनें अज्ञान
अशिक्षित असे
मागासलेली जी
परी सत्याग्रही
प्रबळ अत्यंत
असे मनोजयीं
गुरु माझी तीच.

४

तिचा तो सत्याचा
आग्रह, निग्रह
मनाचा महान्
अत्यंत अबला
हातामाजीं एक
शस्त्र अहिंसेचें
तेंच शस्त्र करीं
हृदया जिंकण्या
मनाचा निग्रह
थोर थोर थोर.

५

दुर्बल अहिंसा
पतना कारण
तयारी मनाची
दुजें तप जणूं
तयाला आचरी
क्रूर अमानुष
मजसम मीच
अमानवालाहि
शिकवियलें तिनें
केला गुरु तो मी.

६

योग मीं मांडिला
मानव—धर्माचा
अहिंसा—शस्त्राचा
आग्रह सत्याचा
जिवंत प्रयोग








जीवनप्रयोग !

साऱ्या जीविताचा
अखिल काळाचा
मर्यादा देशाची
परदास्याचिया
विशाल शक्तीला
देऊन आव्हान
प्रयोग मांडिला.

७

व्यक्तीची अहिंसा
सामाजिक केली
व्यक्तीच्या सत्याच्या
आग्रहाला रूप
विशाल समाजीं
द्यावया पातलों
ईश पाठीराखा
यशस्वी होवो वा

अपेशी खुशाल
फलाशा मज न
कर्म मम करीं
अंतीं भगवान्.

८

आज मुक्त झालों
मृत्युलोकांतून
यश अपयश
कांहींहि नांव द्या
क्रांति—प्रतिक्रांति—
कारक म्हणा वा
परि मम आयु
योग जीवनाचा
सजीव ज्वलंत
जीवनप्रयोग !

ता. ५-२-१९४८
नागपूर

केशव एकनाथ पोतदार

---

## शौर्य हा आध्यात्मिक गुण—

शौर्य हा शारीरिक सद्‌गुण नसून तो एक आध्यात्मिक सद्‌गुण आहे. जो तलवार हातांत घेऊन लढतां लढतां मरतो, तो शूर तर खराच; परंतु जो बोट देखील न उगारतां धैर्यानें मृत्यूस तोंड देतो, तो अधिक शूर होय.

—महात्मा गांधी



अनुक्रमणिका







# उद्धारक उत्तमराय

श्री. कारन्थ [ अनुवादिका—श्री. प्रेमा कंटक ]

सार्वजनिक चळवळींतून भाग घेतला पाहिजे. लोकांना कांहीं तरी करून त्यांचा कसा तरी उद्धार केला पाहिजे, असें उत्तमरायांचें उत्तम मत होतें. उत्तमराय श्रीमंत नव्हते. पण कसें तरी करून, श्रीमंतांच्या पायां पडून सुद्धां काम करून घेण्याचा चमत्कार करण्यांत त्यांचा हातखंडा होता. त्यांना नेहमीं लोकांत दिसून येणारी उणीव म्हणजे लोक रसिक नाहींत हीच ! लोक कसे तरी रसिक झाले तरी पुष्कळ, असें वाटून ते धडपड करीत. पण त्या धडपडींत कपट नसे. तहानभुकेची पर्वा न करतां, उद्यां अखिलभारतीय ( शक्य असल्यास आंतरराष्ट्रीयही ) रंगवल्ली—(रांगोळी )—परिषद् भरवावयाची असल्यास त्यांची तयारी असे. त्यासाठीं कोणत्याहि वर्तमानपत्रांत लेख लिहावयाचे असल्यास ते त्यालाहि तयार असत. यासाठीं पैसा नको का ? हवा. ते तो गोळा करतील, काकप्पांपासून तों तहत पोकप्पांपर्यंत जाऊन मागतील !

एकदां अखिलभारतीय रंगवल्ली—परिषद् बोलावण्याचें त्यांच्या मनांत आलें. रंगवल्ली म्हटली म्हणजे मनुष्याच्या रसिकतेचें पहिलें लक्षण नव्हे का ? परिषद् बोलावली. परिषद् त्यांच्या घरांत भरविण्याची सोय नव्हती म्हणून गांवांतील नाटकगृहांत भरवावी असें ठरविलें. त्या क्षणापासून जारीनें तयारी सुरू झाली. हॅन्डबिलें वांटलीं. " रंगवल्लीशिवाय कोणत्याहि देशाचा उद्धार होणार नाहीं, म्हणून कर्णाटकांतील पहिली रंगवल्ली—परिषद् भरवलीच पाहिजे " असें जाहीर केलें. स्वागतसमितीमध्यें जरीपटक्याचे सारे लोक समाविष्ट करण्यांत आले.

मंगळूरचे पुढारी श्री. बसवण्णा, आनंदप्पा, कोट्यप्पा—सगळे स्वागतमंडळाचे सभासद झाले. गांवांतील प्रत्येक सभेचे व मंडळाचे अध्यक्ष म्हणा, उपाध्यक्ष म्हणा, हीच मंडळी आलटून पालटून असत. म्हणून त्यांनाच याहि मंडळांत घुसडून देण्यांत आलें. कार्यकारी मंडळाच्या सात आठ बैठका झाल्या, सभासदच हजर नव्हते ! उत्तमरायच प्रोसिडिंग—बुक घेऊन प्रत्येक सभासदाच्या घरीं जात व बसल्या बसल्या सभा भरवीत ! श्री. कोट्यप्पा स्वागतमंडळाचे अध्यक्ष झाले. गांवांतील शवदहनमंडळ, मोचीसंघ, ललितकलासंघ, विद्यावर्धक संघ, वेदान्तसंघ, थिऑसॉफिकल लॉज, आर्यसमाज इत्यादि संस्थांचे तेच अध्यक्ष होते. म्हणून तेच स्वागतसमितीचे अध्यक्ष होण्यास योग्य आहेत असें उत्तमरायांनीं ठरविलें.

आतां परिषदेचे अध्यक्ष कोण ? फारच फाजितीचा प्रश्न ! लोक गोळा झाले पाहिजेत, पैसा पाहिजे. काय उपाय ? श्रीमती मिस् नूरजहान बेगम त्याच समयीं भोरघाट उतरून आल्या होत्या. " हें काम मजकडून होण्याजोगें नाहीं, " असें त्या म्हणाल्या. तरी पण " आपण श्रम घेण्याचें कारण नाहीं, लिहून आणलेलें भाषण दिलें तरी चालेल " असें त्यांचें समाधान करण्यांत आलें.

परिषदेचा दिवस आला. उत्तमरायांचें घर पुरेना म्हणून त्यांनीं गांवांतील नाटकगृहांत परिषद् भरवली. हजारों रसिकजन जमले होते. रंगवल्लीचें तोंड न पाहिलेल्या मिस् सुब्बुलक्ष्मी येऊन मिस्टर उत्तमरायांशीं त्यांनीं शेकहॅण्ड केला. उत्तमरायांनींच मि. कोटप्पांचा








बेगमशीं परिचय करून दिला. त्या दिवशींची परिषद् यशस्वी झाली. बेगमनीं उर्दू भाषेंत 'रंगवल्ली अतिशय आवश्यक कला आहे' असें एक वाक्य बोलून अर्धा तासपर्यंत शिशुसंगोपनावर विचार बोलून दाखविले. एकंदरींत सभा यशस्वी झाली.

सभा झाल्यावर एका आठवड्यानें उत्तमरायांचें घर शोधीत मीच एकदां गेलों होतों. त्यांच्या घराच्या उंबरठ्यावर रांगोळीशिवाय सर्व कांहीं होतें. माझी त्यांची भेट झाली, नमस्कार—चमत्कार झाला. मी म्हणजे त्यांना जीव कीं प्राण! कर्णाटकाला शिरोधार्य ब्रह्म असल्यास 'तें मीच' असें ते म्हणत. हें सांगण्यासाठींच त्यांनीं एक अभिनंदनपर सभा जमवून आणिली. या सभेची स्वागत—समिति मागील रंगवल्लीपरिषदेचीच स्वागतसमिति होती. सभेंत त्यांनीं माझा परिचय करून देऊन "श्री. कारन्थ कलावंत आहेत, त्यांनीं किती तरी नाटकें लिहिलीं आहेत, त्यांतील किती तरी नाटकें गुब्बि वीरण्णांच्या "प्रभामणि"प्रमाणें रस, भाव, कला, संगीत यांनीं पुष्ट आहेत," असें सांगून टाळ्या वाजवून माझ्या गळ्यांत हार घातला. सर्वांनीं टाळ्या वाजविल्या. मीं एका हातांत हार असल्यामुळें एकच हात कपाळावर मारून घेतला!

त्याच दिवशीं सभा विसर्जन होण्यापूर्वी, "मी लवकरच कुंकुम—विभूति—परिषद् भरवीन म्हणतों. आमच्या आर्य—महिलांना अजून आपलीं कपाळें चांगल्या प्रकारें सुशोभित करतां येत नाहींत याचा अतिशय विषाद वाटतो," असें सांगून त्यांनीं सर्वांना निरोप दिला. ही कल्पना अजून अव्यक्त स्थितींतच आहे. 'मिस्टर गुडवरी साहेबांना फुरसत नसल्यामुळें परिषद् पुढें ढकलण्यांत आली' असें त्यांनीं मला सांगितलें.

उत्तमरायांना अर्थशास्त्र, नीतिशास्त्र, न्यायशास्त्र इत्यादि अनेक शास्त्रांचा परिचय होता. परिचयच नव्हे, तर त्यांना त्यांबद्दल प्रेमहि वाटत असे. मि. राजप्पांच्या श्रीबसवेश्वर—कर्णाटक—संगीत—नाट्य-कला—विवर्धक संघाच्या शेवटच्या पडद्यावरील डिझाइन त्यांना इतका आवडला होता कीं त्याचा फोटो घेऊन तो त्यांनीं आपल्या देवघरांत ठेवला होता. तो पडदा ब्रिटिश आर्ट एक्झिबिशनमध्यें पाठवून द्यावयाचा विचार ते करीत होते. पण तितक्यांत कंपनीला ती अमूल्य कलासंपत्ति रागीबेन्नूर येथील कॉफी-हॉटेलच्या मालकाकडे गहाण ठेवावी लागली! —

उत्तमराय संगीताचे भोक्ते होते. त्यांनीं आपल्या एका बहिणीला दाक्षिणात्य संगीताचें शिक्षण दिलें होतें. आपलें संगीत अजून जडावस्थेंतच आहे असें पाहून तें सुधारण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. हल्लीं त्यांची भगिनी त्यागराजाची "मोक्षमु गलदा" ही कृति "खरा तो प्रेमा" या मराठी गाण्याच्या धाटणीवरच गाण्यास शिकली आहे. त्यागराजाचें "एवरुने" गीत तामिळ "अंडिपंडारवु" गाण्याच्या चालींत सुरू करून व "गांधी माराजाम्"-प्रमाणें मध्य करून "चरखा चला चला के" या चालींत ती त्याचा लय करते. हें गाणें ऐकलेले उत्तमरायांचे सारे मित्र "हें बीथोवनच्या सिंफनी-सारखें असल्याप्रमाणें कानांला लागतें," असें मला म्हणाले व "आपलें मत कसें काय, महाराज?" असें मला विचारूं लागले. "मला बीथोवन भेटला नाहीं. तो कधीं मंगळूरला आला होता काय?" असें मीं विचारलें.

दरम्यान उत्तमरायांच्या मनांत द्वितीय रंगवल्ली-परिषद् भरविण्याचें आलें. ती लखनौमध्यें भरवून कर्णाटकांतील रंगवल्लीची पद्धति हिमालयापर्यंत प्रसृत करावी अशी त्यांची अभिलाषा होती, असें ते म्हणाले.

मला विश्वास वाटतो कीं जर श्री. उत्तमराय आणखी कांहीं वर्षें जगले असते तर त्यांनीं कर्णाटकांतील रंगवल्ली, कुंकुम, तांबूलविधि, अर्थशास्त्र इत्यादि विषयांत प्रगति घडवून आणून कांहीं वर्षांत जर्मनी, अमेरिका, जपान इत्यादि देशांतील विद्यार्थ्यांना ओढून आणिलें असतें. नाहीं तरी युरोपांतील राजकीय वातावरण अस्थिर असतांना भविष्यकालांत वरील गोष्टीला अवकाश मिळाला असता किंवा नाहीं याविषयीं मला संशयच वाटतो!

---






# जातीयतेचा प्रश्न

प्रा. श्री. व्यं. पुणतांबेकर

" देशकालवर्तमान । सर्वहि अवेवधान
कोणते विधी विधान । सावधान सावधान ।। "

--रामदास.

परमपूज्य राष्ट्रगुरु महात्माजींच्या अमानुष ब्रह्म-हत्येनंतर जे अत्याचार महाराष्ट्रांत ब्राह्मणांविरुद्ध झाले त्यांची कारणमीमांसा आज विद्वान् लोक करीत आहेत व त्याबरोबरच तसें न घडावें म्हणून उपाय-योजनाहि सुचवीत आहेत. त्यांच्या मतें समाजांत नांदत असलेली जातीयता अथवा जातिसंस्था व त्यामुळें उत्पन्न झालेली विषमता व उच्चनीचता ह्या त्या अत्याचाराचीं व त्यांच्या मागें असलेल्या अ-संतोषाचीं व द्वेषाचीं कारणें आहेत. तेव्हां जाति-संस्था व जातीयता नष्ट करणें हीच याबद्दलची मुख्य उपाययोजना आहे. मात्र ती कोणत्या मार्गानें व कोणत्या क्रमानें नष्ट करावी, ह्याबद्दल मतभेद आहेत. पण ब्राह्मणांविरुद्धच हे अत्याचार घडले असल्यामुळें ब्राह्मणजात अथवा ब्राह्मण्य नष्ट करणें हा जातिसंस्था अथवा जातीयता नष्ट करण्याचा प्रथमचा व अखेरचा, पण आग्रहाचा मार्ग समजला जात आहे.

ह्याबद्दल समाजशास्त्रीय दृष्ट्या अनेक प्रश्न उद्भ-वतात, त्यांबद्दल विवेचन झालें पाहिजे. ( १ ) जातीयता नष्ट करणें इष्ट आहे काय? ( २ ) जातीयता नष्ट होणें अथवा करणें अनिवार्य आहे काय? ( ३ ) जातीयता नष्ट होईल का व ती कोणत्या संभवनीय उपायानें व मार्गानें होईल?

## समाजशास्त्राची दृष्टि

कोणतेंहि तत्त्व व कोणतीहि संस्था व त्याबद्दलचा आग्रह व वाद अथवा विचारप्रणाली–मग तो ब्राह्मण्यवाद अथवा श्रामण्यवाद असो, ब्राह्मणेतर-वाद अथवा समाजवाद असो, जातीयतावाद अथवा राष्ट्रीयतावाद असो, हे सर्व–समाजशास्त्राच्या दृष्टीनें एकांगी व अतिरेकी असतात व पुढें समाजघातकी होतात. त्यांच्या स्थलकालसमाजसंबंधीं आवश्यकता व मर्यादा ओळखूनच त्यांचें मूल्यमापन व महत्त्वमापन केलीं पाहिजेत. ज्याप्रमाणें मोठ्या व्यक्तींचें अथवा विभूतींचें ऐतिहासिक महत्त्व त्या त्या स्थल–काल-समाजाला अनुसरून असतें, त्याप्रमाणें सामाजिक तत्त्वांचें, संस्थांचें व वादांचें आहे. एकच तत्त्व अथवा एकच वाद हा सर्व स्थल–काल–समाजाला उपयोगीं पडत नाहीं. जरी तें अथवा तो एकाद्या विशिष्ट स्थल–काल–समाजाला उपयोगीं पडला व आवश्यक असला तरी अनेक तत्त्वांच्या व संस्थांच्या साह्यानें समाज आपली सुस्थिति व आपला तोल राखीत असतो. एकाच तत्त्वाला फाजील महत्त्व देऊन व त्याचें मूल्य फुगवून समाज आपली सुस्थिति राखूं शकत नाहीं; पण समाजाच्या सुस्थितीला त्या त्या काळीं जीं जीं तत्त्वें व संस्था–साधनें लागतात त्यांच्यामध्यें प्रमाणबद्धता वा तोल असावा लागतो. पण समाजाच्या घटकांतील परस्परसंबंधांत एकाद्या नव्या ध्येयामुळें अथवा नव्या अडचणींमुळें जर फरक झाला व ते संबंध बिघडले वा अपुरे पडले आणि त्याचे जुने व्यवहार वा त्याची जुनी जीवनप्रणाली विस्कळित झाली तर जीं तत्त्वें व ज्या संस्था व समजुती समाजजीवनाला आवश्यक असतात, त्यांचें मूल्यमापन, तरतमता व तोल हीं पुनः स्थापावीं लागतात.








प्रत्येक सामाजिक वादामध्यें ज्या अंगाच्या महत्त्वाचा विचार उत्कटतेनें मांडलेला असतो, वा विशेष रूपानें रंगविलेला असतो, त्यामध्यें कोणी व्यक्तीला, तर कोणी विशिष्ट जातीला, पक्षाला अथवा गटाला अधिक महत्त्व देतात. कोणी सर्व समाजाला व कोणी राष्ट्राला महत्त्व देतात. कोणी आर्थिक, कोणी राजनैतिक, कोणी सामाजिक तर कोणी सांस्कृतिक अंगच एकमेव प्रधान व प्रभावी समजतात. कोणी स्वातंत्र्य, कोणी समता, कोणी बंधुता तर कोणी एकता हेंच मुख्य सामाजिक संघटनेचें सूत्र व अधिष्ठान समजतात. त्यामुळें समाजजीवनाचा तोल बिघडतो व समाजांत विग्रह व कलह उत्पन्न होतात. मानवी जीवनाला सर्व अंगांची व पुरुषार्थांची कमी–अधिक प्रमाणांत आवश्यकता असते. मानवाच्या सर्वांगीण जीवनाचा विकास त्यावर अवलंबून असतो. त्याच्या विविध पुरुषार्थांना व त्यांमधील भिन्न गटांना योग्य प्रमाणांत वाव मिळाला पाहिजे. समता हें समाजव्यवस्थेचें एकमेव तत्त्व होऊं शकत नाहीं व तें तसें मानणें अशास्त्रीय आहे. सर्व तत्त्वांची, अंगांची व घटकांची त्याला अवश्यकता असते. नाहीं तर तो टिकणार नाहीं. तीं सर्व अन्योन्याश्रयी व परस्परसंबंधी आहेत. मानवी जीवन एका अंगाच्या पोषणानें विकास पावत नाहीं, त्यांतील एकाच घटकाला सर्वांगांचें पोषण करतां येत नाहीं. मनुष्य हा गुणकर्मांनीं भिन्न असतो. त्याचप्रमाणें त्याचे आर्थिक व राजनैतिक, सामाजिक व सांस्कृतिक असे भिन्न गट असतात.

कोणत्याहि समाजाची प्रगति वा अधोगति एकाच तत्त्वाच्या प्रभावामुळें अथवा एकाच वादाच्यामुळें होत नाहीं. त्याला अनेक कारणें असतात. तेव्हां हिंदु समाजाची अधोगति केवळ जातीयवादानें अथवा ब्राह्मण्यवादानेंच झाली आहे असें म्हणणें कितपत समाजशास्त्राला अनुसरून आहे ! ज्या समाजांत जातिसंस्था नव्हती, त्यांची अधोगति कां झाली, याचाहि विचार झाला पाहिजे. असो ; ही वरील विचारसरणि सोडून आपण जातीयता नष्ट करण्याचा विचार करूं.

## जातीयतेविरुद्ध सुचविलेले उपाय !

आज आपल्या पुढारीवर्गांत लोकशाही तत्त्वाच्या प्रभावामुळें जातीयता नष्ट करण्याची इच्छा प्रबळ होऊन बसली आहे. कारण जातीयतेमुळें आपल्या लोकांत समता, स्वातंत्र्य, बंधुभाव व ऐक्य उत्पन्न होत नाहींत आणि प्रगति व न्याय नांदत नाहींत, अशी दृढ समजूत होऊन बसली आहे. देशांत शेंकडों जाती व उपजाती असल्यामुळें त्यांच्यामध्यें योग्य सहकार्य होत नाहीं व प्रेमभाव वाढत नाहीं. उलट, विरोध, वैमनस्य व विषमता हीं वाढत आहेत व या जातीयतेच्या मुळाशीं ब्राह्मणजाति अथवा ब्राह्मण्यवाद आहे, असें मानलें जात आहे. मानवधर्म व मानवसमाज हा एकजातीय समाज असावयास पाहिजे. तो जातिभेदातीत, संप्रदायभेदातीत, वर्गभेदातीत व वर्णभेदातीत असला पाहिजे, असें प्रतिपादन होत आहे. पण हें समाजशास्त्रदृष्ट्या व मानवहितदृष्ट्या शक्य आहे काय ? मानवता ही तिच्या एकरूपतेमध्यें उत्तम प्रकारें आविष्कृत होते, का नानारूपतेमध्यें, हा प्रश्न विवाद्य नाहीं. अनेकत्व हें सृष्टीचें तसेंच मानवतेचें लक्षण आहे. तेव्हां मानवतेचें ऐक्याचें महत्त्व तिच्या एकरूपतेंत नसून तिच्या कलहातीत प्रेमभावांत व सहकार्यांत आहे. हा सिद्धान्त सर्वांना मान्य होण्यासारखा आहे व तो इतिहासदृष्ट्या व समाजशास्त्रदृष्ट्या शुद्ध व इष्ट आहे. जातीयवाद नाहींसा करावयाचा असेल तर प्रथम ब्राह्मण्यवाद नाहींसा केला पाहिजे असें विधान सध्यां केलें जात आहे. ब्राह्मण हे आपणांला श्रेष्ठ व उच्च समजतात व इतरांना कनिष्ठ व नीच समजतात. इतर क्षत्रिय व वैश्य जाती त्यांचेंच अनुकरण करतात. तेव्हां ब्राह्मण जात नष्ट झाली म्हणजे आपोआप क्षत्रिय, वैश्य व शूद्र जाती आपलें जातीयत्व विसरतील व सोडतील व आपल्या देशांतून जातीयता नाहींशी होईल.

जे उपाय जातीयता नष्ट करण्यास सुचविले जात आहेत त्यांनीं जाती नष्ट होतील असें वाटत नाहीं. जातींचें अधिष्ठान भोजनव्यवहार व विवाहसंबंध यांच्या मर्यादेमध्यें मुख्यतः आहे. त्या मर्यादा कशा नष्ट करावयाच्या हा प्रश्न आहे. त्या कायद्यानें








शिक्षणानें, धर्मान्तरानें वा देशान्तरानें नष्ट होतील का? त्या तावडतोब नष्ट होऊं शकतील, का क्रमाक्रमानें होतील ? माझ्या मतानें ब्राह्मण जात नष्ट केल्यानें जातीयता नष्ट होणार नाहीं. धर्मांतरानें सुद्धां ती नष्ट होणें सोपें नाहीं, देशांतरानें सुद्धां नाहीं. शिक्षणानें मात्र क्रमाक्रमानें तिचा कठोरपणा जाऊन ती वठत जाईल अथवा सुकेल. कायद्यानें कोणाला ब्राह्मण म्हणूं न देणें, दुसऱ्या जातींतच त्यांना लग्नव्यवहार करण्याची परवानगी देणें व ब्राह्मण जातीमध्यें सवर्ण विवाह न होऊं देणें, हे मार्ग निंद्य व अशक्य असून यशस्वी होणार नाहींत. दुसऱ्या जाती मात्र शिल्लक राहतील व नव्या संकर व मिश्र जाती निर्माण होतील. जातींची संख्या वाढेल. जातीयता मोडण्याचा खरा मार्ग म्हणजे लग्नसंस्थाच मोडून टाकणें व श्वेतकेतूच्या कालाकडे जाणें. कोणत्याहि पुरुषानें कोणत्याहि स्त्रीशीं संबंध ठेवावा. तसें झालें म्हणजे त्यांच्या मुलांना कोणतेंच जातित्व प्राप्त होणार नाहीं व जातिविरोधकांचा प्रश्न सहज सुटेल. केवळ ब्राह्मण जातच प्रथम मोडावयाची असेल तर ब्राह्मणांना संस्कारयुक्त विवाह करूं न देणें व त्यांना (Sterilisation नें) वंशोत्पादनास असमर्थ करणें हा एक उपाय आहे. त्यापासून देशाचें व त्या जातीचें काय नुकसान होईल हा प्रश्न भिन्न आहे. त्यामध्यें स्त्रीस्वातंत्र्याचा व कुटुंबसंस्थेचाहि प्रश्न गोंवला गेला आहे. येथें पुढील विचार मात्र नमूद करून ठेवला पाहिजे:—ब्राह्मण्यानें जातिसंस्था उत्पन्न केली नसून जातीयतेनें ब्राह्मण्य उत्पन्न केलें. मग जाती कोणीं उत्पन्न केल्या ? त्या तात्कालीन राजकीय, आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक गरजांमुळें उत्पन्न झाल्या. त्या गरजा बदलल्या व नव्या विचारानें व गरजेनें समाजामध्यें नवे संबंध उत्पन्न केले म्हणजे जाती नष्ट होतील. मात्र मनुष्याला जुन्या परंपरेंतून सोडविण्यास शिक्षणानें उत्पन्न केलेली नवी जागृति व नवी जाणीव पाहिजेत. जातींची उत्पत्ति व त्यांचें अस्तित्व यांविषयीं समाजशास्त्रज्ञांचे विचार माझ्या म्हणण्याला पुष्टि देतील.

सामाजिक न्याय व सुस्थिति योकरतां ज्याप्रमाणें प्लेटोनें ( Community of Property ) संपत्तीची समाईकता व (Community of Women) स्त्रियांची समाईकता सुचविल्या, त्याचप्रमाणें आजच्या नव्या सामुदायिक होऊं इच्छिणाऱ्या समाजाला संपत्तीची, सत्तेची व कुटुंबाची समाईकता पाहिजे, असा आग्रह धरल्यावांचून एकजातीय मानवी वर्गरहित व वर्णरहित समाजाची स्थापना होणार नाहीं. केवळ सत्ता अथवा संपत्ति यांच्या त्यागानें आणि मान व विद्या यांच्या वितरणानें तें होणार नाहीं. लोकशाहीच्या व्यक्तिमूलक सिद्धांतानें अथवा बहुसंख्याक मतांनींहि हें घडणार नाहीं. जातीयता मोडावयास लग्नसंस्थाच मोडणें हाच एकमेव उपाय आहे. पण तो अघोरी व अराजकतारूपी आहे. प्लेटोनें मनुष्यांमध्यें उपजत भिन्न प्रकार कल्पिले—जसें, विवेकी व्यक्ती ( Rational Men ), धाडशी व्यक्ती ( Spirited men) व कामुक व्यक्ती (Greedy men). समाजाच्या सुस्थितीकरतां त्यांच्या गुणांप्रमाणें योग्य कार्याकडे त्यांचा उपयोग करून घेणें हाच खरा न्याय आहे व हेंच खरें समाजशास्त्र व राजनीतिशास्त्र आहे, असें शास्त्रकार सांगत आले आहेत. मनुष्यें हीं गुणकर्मांनीं भिन्न आहेत.

दुसरे जे सौम्य उपाय सुचविले जात आहेत ते असे:—१ सत्ता, संपत्ति, समाज व विद्या या क्षेत्रांतील प्राप्त झालेले अधिकार व मान यांचा ब्राह्मणांनीं त्याग करणें, म्हणजे अधिकार-संन्यास. २ ब्राह्मणेतर बहुसंख्याक जातींना शासनसत्तेनें शिक्षणानें पुढें आणणें, त्यांना द्रव्यसाह्य करणें, नौकऱ्या देणें व त्यांच्या मताप्रमाणें ब्राह्मणांनीं काम करणें. ३ विद्यार्जनामध्यें पुढें गेलेले ब्राह्मण व तत्सम लोक यांना विद्येपासून परावृत्त करणें किंवा त्यांच्या जीवनावर एक प्रकारचें (Moratorium) तहकुबीचें नियंत्रण घालणें. हें त्यांच्या जीवनांवर समाधीच उभारण्यासारखें होय ! जोंपर्यंत मागसलेले लोक त्यांच्या बरोबरीचे व तत्सम होत नाहींत, तोंपर्यंत त्यांचें जीवन स्थगित करणें हा एक प्रकारचा ‘ अव्यापारेषु व्यापार ’च होईल. ब्राह्मणांना नष्ट करावयाचें किंवा त्यांचें जीवन वठवावयाचें याचें समर्थन कां ? तर ते इतर जातींच्या दृष्टीनें कांहीं बाबतींत पुढें जातात व तो पुढाकार राखतात. काय हे विचार, कोणते हें शास्त्र, व कसले हे शास्त्रकार ! हीं सगळी परा-

जयाच्या व वैफल्याच्या जाणिवेची भूमिका आहे व हें अद्भुत तत्त्वज्ञान आहे. यासंबंधीं अखंड ' साव-धान ' राहावयास पाहिजे.

## ब्राह्मणांचा काय दोष?

ब्राह्मणांच्या हातांत सत्ता व संपत्ति फार नाहींत; त्यांजवळ विद्या व मान मात्र जास्त आहेत. सत्ता व संपत्ति ह्या गोष्टी कायद्यानें वंशजांकडे जातात; त्याला लायकी नको. पण विद्या व मान हीं मात्र तशीं जात नाहींत. तीं श्रमानें व शीलानें प्राप्त करून घ्यावीं लागतात. एका विशिष्ट जातींत या सर्व गोष्टी केंद्रित नसाव्या; पण त्या तशा आहेत काय ? असल्या तर समाजामध्यें असंतोष, दुही व द्वेष नांदतील. ज्या जातींना ह्या गोष्टींमध्यें वांटा मिळणार नाहीं, त्या विशेष रूपानें असंतुष्ट राहतील. पण खरोखरी त्यांचें तसें केंद्रीकरण नाहीं. महाराष्ट्रामध्यें केवळ ब्राह्मण जातच सत्ताधारी वर्ग आहे काय ? केवळ तीच धनिक वर्ग आहे काय ? केवळ तीच मानधारी आहे काय ? आणि केवळ तीच विद्या घेणारी आहे काय ? ह्या प्रश्नांचें उत्तर देण्यास या सर्व गोष्टींची गणती झाली पाहिजे व तिचा आढावा काढला पाहिजे. शेतकरी-वर्ग व जमीनदार वर्ग हे ब्राह्मणेतर आहेत. व्यापारी-वर्ग, सावकारवर्ग व भांडवलदारवर्ग गुजराती व मार-वाडी असून महाराष्ट्रीयेतर आहेत. सैनिकवर्ग ब्राह्मणेतर मराठा आहे. मात्र बराचसा कारकून-वर्ग, व्यावसायिक वर्ग (वकील, डॉक्टर, एंजिनिअर इ.) व शिक्षकवर्ग हे ब्राह्मण आहेत, येवढेंच त्यांचें वैशिष्ट्य आहे. तेव्हां महाराष्ट्रामध्यें सत्ता, संपत्ति व मान हीं सर्व वांटलीं गेलीं असून ब्राह्मणां-कडे त्यांच्यांतील थोडासा अंशच आहे. मात्र शिक्ष-णामध्यें ते पुढें असल्यानें तें लागणारे व्यवसाय (Professions) त्यांच्या हातांत आहेत. पण हा कांहीं त्यांचा दोष नाहीं. शिक्षण घ्यावयाला कोणाला बंदी नाहीं. शिक्षणाचीं दारें सताड उघडीं आहेत. पण जर एकाद्या जातीचें लक्ष शिक्षणाकडे जास्त असलें तर व दुसरीचें इतर गोष्टींकडे असलें तर त्याचे परिणाम त्याला अनुसरून होणारच. जाती नकोत म्हणणें हें वाजवी ठरेल; पण त्यांनीं शिक्ष-णामध्यें पुढें जाऊं नये व मिळालेल्या शिक्षणाचा फायदा घेऊं नये व देऊं नये, हें म्हणणें जरी कदाचित् एकाद्या जातीच्या हिताचें असलें, तरी तें राष्ट्रहिताचें कितपत आहे बरें ? जवळ जवळ सगळी जमीन ज्यांच्या हातांत आहे, त्यांनीं इतरांना शिक्षण-स्वातंत्र्य व आर्थिक स्वातंत्र्य नसावें असें म्हणावें काय ? अशा तत्त्वावर कोणता समाज रचतां येईल वा कोणत्या शास्त्रकारानें रचला आहे ? जर खरोखर जातिसंस्था मोडावयाची असेल तर पुढारलेल्या धनवान्, विद्यावान् व सत्तावान् सुसंस्कृत जातींनीं स्वार्थत्याग व अधिकारन्यास करावयास पाहिजे व एक प्रकारचा संन्यास घ्यावयास पाहिजे, असेंहि सांगण्यांत येतें.

## विद्यापाननिषेध व समता-स्थापना !

सत्ता व संपत्ति हीं जर पिढीजाद व संकलित झालेलीं असतील तर त्यांचा त्याग करतां येईल; पण जीं कर्तबगारीनें व अंगच्या योग्यतेनें प्राप्त होतात व वाढतात तीं केवळ बहुसंख्य व जन्मानें मानव येवढ्याचमुळें कशीं प्राप्त होतील व वाढतील ? विद्या व मान हीं सुद्धां सतत अभ्यासानें व योग्यतेनेंच प्राप्त होतात. सत्ता व संपत्ति सर्वांमध्यें वांटतां येतील; त्यांच्याकरितां परिश्रम न केले तरी त्या दानानें मिळूं शकतील; पण विद्या व मान हीं मात्र अभ्यासा-वांचून मिळत नाहींत वा वांटतांहि येत नाहींत. सत्ता व संपत्ति लोकशाहीच्या व समाजशाहीच्या तत्त्वांनुसार सामान्य जनांमध्यें वांटतां येतील व त्यांमध्यें कृत्रिम समता उत्पन्न करतां येईल; पण विद्या व मान ह्या दोन्हींमध्यें समता आणावयाची असेल व विद्या व मान असल्यामुळें सामान्य जनांच्या विचारानें जाती-यता उत्पन्न अथवा दृढ होत असेल, तर मद्यपान-निषेधाप्रमाणें विद्यापान-निषेध (Prohibition of Learning) व मानापमान-निषेध ( Prohibition of degrees and titles) कायद्यानें अंमलांत आणावे लागतील व विद्येचे आजचे वृक्ष खच्ची करून अथवा तोडून जाळावे लागतील. समता स्थापन करणें व समाजांतील विषमता नाहींशी करणें यांचे दोन प्रकार अथवा उपाय असूं शकतात. एक देण्याचा (Positive ) व दुसरा घेण्याचा अथवा नाशाचा (Negative). सत्ता व संपत्ति ह्या देतां

येतात व वांटतां येतात. त्यांना योग्यता व प्रयत्न पाहिजेतच असें नाहीं. पण विद्या व मान हीं प्राप्त करावयास मात्र योग्यता व प्रयत्नच लागतात. त्यांना शिक्षण व स्वाभाविक गुण यांची आवश्यकता असते. तेव्हां ज्यांना सर्वांची सर्व बाबतींत समता पाहिजे व उचनीचता नको, त्यांच्या दृष्टीनें विद्यापान–निषेध (Prohibition of Learning) हाच उपाय समता–स्थापक होईल. मात्र हा उपाय राष्ट्रहिताच्या व समाज–सुस्थितीच्या व प्रगतीच्या दृष्टीनें योग्य आहे काय, हा प्रश्न निराळा ! जोंपर्यंत मागसलेल्या जाती पुढें येत नाहींत, तोंपर्यंत पुढारलेल्या जातींनीं आहे तेथेंच (Stand-still Position) थांबलें पाहिजे अथवा त्यांच्या पुढें असलेल्या पिढीनें मागें गेलें पाहिजे. दिसायला हें जरी वेडेंवांकडें असलें तरी विसाव्या शतकाच्या लोकशाहीच्या व समतेच्या(Myth of the Common Manच्या ) ध्येयांना अनुसरून तें योग्यच आहे. आपण त्यांचा असंतोष व द्वेष कमी करून त्यांना समता व स्वातंत्र्य हीं दिलीं पाहिजेत. त्यांना कार्याची संधि, द्रव्याचें साह्य व परिस्थितीची समता हीं दिलीं पाहिजेत. माझ्या मतें दुसरे कोणतेहि उपाय उपयोगी ठरणार नाहींत. ते केवळ जातिद्वेष व वर्गद्वेष वाढवतील. रशियाचें तंत्र बरेंचसें अशाच प्रकारचें होतें; आज मात्र नाहीं. वरिष्ठ वर्गाचा नाश करणें (Elimination ), शिक्षकवर्गाचें पूर्ण नियंत्रण करणें, शुद्धता व शोधन ( Purge ) करणें, लग्नसंस्थांची पवित्रता मोडणें, कामकरी व किसान यांच्या हिताकडे लक्ष देणें, त्यांच्या हातांत अथवा त्यांच्या नांवानें सत्ता व संपत्ति राखणें, त्यांनाच शिक्षण देणें, त्यांनाच नागरिकत्व देणें, इतरांचें म्हणजे (Clergy, Capitalists,Merchants and other bourgeiosie Classes यांचे ) ते अधिकार काढून घेणें, अशा उपायांनीं Common Manचें राज्य दृढ झालें, संपत्तीचा उपयोग त्यांच्या करतांच होऊं लागला, शिक्षण त्यांनाच मिळूं लागलें, त्यांचेंच Culture वाढूं लागलें व त्यांचीच पूजा होऊं लागली. परंतु पुढें त्यांनींच मान्य केलेल्या अथवा वाढविलेल्या लोकांचा शिक्षित वर्ग बनला. त्यांनीं मानलेल्या पक्षांनीं अथवा त्यांच्यावर लादलेल्या पुढाऱ्यांनीं आपल्या हातांत सत्ता, संपत्ति, विद्या व मान हीं ठेविलीं व त्यांची वांटणी तसाच त्यांचा उपयोग आपल्या तंत्रानें केला.

## बुद्धिमंतांचे अतिरेकी मार्ग !

सांप्रतच्या कालांत समतेबरोबर दुसरी एक ओरड ऐकूं येते व ती प्रत्येक गोष्टीमध्यें एकता पाहिजे अशी आहे. " एकच धर्म, एकच राष्ट्र, एकच जात, एकच वर्ग, एकच वर्ण, एकच संप्रदाय व एकच संस्कृति चोहोंकडे करा " ही सर्व ओरड एकनायकी ( Totalitarian ) पद्धतीची आहे; हिच्या उलट " सर्व धर्म, सर्व राष्ट्रें, सर्व जाती, सर्व वर्ग, सर्व वर्ण, सर्व संप्रदाय व सर्व संस्कृती तोडा " ही ओरड निर्नायकी ( Anarchist ) अथवा विध्वंसक ( Nihilist ) पद्धतीची आहे. या दोन पद्धतींमध्यें क्रान्तिकारी लोकांना ऐहिक स्वर्ग, खरें स्वराज्य, श्रेष्ठ सुराज्य, 'सर्वोदय मानवी समाज' इत्यादि आज दिसत आहेत. ह्या एकनायकी वा तिच्या अगदीं उलट निर्नायकी पद्धतीनें आज ते खऱ्या मानवी समाजाची व श्रेष्ठ धर्माची स्थापना करूं पाहत आहेत. त्यांना एकान्तवाद पसंत आहे, अनेकान्तवाद नाहीं. त्यांना एक–धारणावाद पाहिजे, अनेक–सुधारणावाद नको. इतिहासाच्या अनुभवाला व मानवी चरित्राला कांहीं अर्थ असेल तर मानवी जीवनाचें वैचित्र्य व अनेकत्व हींच त्याचीं खरीं लक्षणें आहेत. तीन धर्मप्रसारकांनीं मानवी जीवनाला एका सांच्यांत व रेषेंत बसविण्याचे प्रयत्न केले आहेत. ते म्हणजे खिस्ती पंथाचा, महंमदी पंथाचा व मार्क्स पंथाचा हे होत; पण ते सफल झालेले नाहींत. तेव्हां हे असे अघोरी अथवा राक्षसी, एकंकारी अथवा निराकारी उपाय व मार्ग मानवी समाजाच्या प्रगतीला व उच्चतेला किती उपयोगीं पडतील हा मोठा प्रश्नच आहे. माझ्या मतानें हे बुद्धिमंतांचे काल्पनिक सुखाचे आततायी व अतिरेकी मार्ग आहेत; ते वास्तविक व व्यावहारिक मुळींच नाहींत. जगामध्यें नास्तिकता, अराजकता, भौतिकता, एकनायकत्व व निर्नायकत्व हीं सर्वांशानें मुळींच सफल झालेलीं नाहींत. तसेंच एकाच धर्मप्रणालीचे, एकाच तत्त्वप्रणालीचे व एकाच जीवनप्रणालीचे पुरस्कर्ते विजयी झाले नाहींत. त्यांच्यामध्यें कलह,












फूट वा दुही उत्पन्न झाली, त्यांचा एकंकारी प्रयत्न निष्फळ ठरला व ते इतिहासाच्या गांठोड्यांत बांधले गेले.

समाजशास्त्राच्या दृष्टीनें मानवी संस्कृति व समाज एका रोखानें व एका रेषेनें जात नाहींत; त्यांतील भिन्न समूहांचा संपर्क अनेक प्रकारें दृग्गोचर होतो व टिकतो. त्यांतील तीन मुख्य प्रकारांपैकीं पहिला, संकराचा, मिश्रणाचा व देवघेवीचा ( fusionचा ) होय; पण त्याचीं नानारूपें असतात. दुसरा इतरांना ग्रासण्याचा, पचविण्याचा व त्यांच्या नाशाचा ( eliminationचा ); पण त्याचें रूप मात्र एकच असतें. तिसरा, संपर्कानंतरहि आपला मार्ग स्वतंत्र ठेवणें, दुसऱ्यांमध्यें मिसळून न जाणें व दुसऱ्यांपुढें न नमणें ( independence ); यांपैकीं आम्हीं कोणता मार्ग पूर्वी पत्करला व आज आम्ही कोणता पत्करणार आहों हें इतिहास व समाजशास्त्र सांगणार आहेत.

## सामान्य जनांचा समज

कोणत्याहि जयिष्णु व वर्धिष्णु समाजाला श्रम-विभागाचें अथवा कार्यविभागाचें तत्त्व लागतें, का त्यांतील सर्वजण सर्व कामें करण्यास योग्य व पात्र असतात, ह्या प्रश्नांचा विचार करणें समाजशास्त्राच्या दृष्टीनें आवश्यक आहे; Myth of the Common Manच्या दृष्टीनें नाहीं. त्याला आपल्या सुखसोयी कशा वाढतील येवढीच विवंचना असते. पण ह्या सुख-सोयींच्या प्राप्तीचें व उत्पत्तीचें ज्ञान तद्वतच त्यांचे उपाय कोणीं शोधावयाचे व सफल करावयाचे ? हें कार्य करणाऱ्या लोकांची समाजाला जरूरी आहे काय ? असल्यास त्यांचें स्थान काय ? त्यांनीं आपलें काम योग्य प्रकारें करावयाचें झाल्यास त्यांच्या सुखसोयी व त्या निर्माण करणारी परि-स्थिति कशा उत्पन्न करावयाच्या ? तेव्हां आज जरी असें कार्य करणारी एकादी जात आपण नष्ट केली, तिला संन्यास घ्यावयास लावला, तरी तें कार्य कर-णारा दुसरा वर्ग ( Intelligentsia ) उत्पन्न होणार नाहीं काय ? महाराष्ट्रांत मराठी वैश्य ( व्यापारी ) वर्ग नाहीं. तो मराठे, कुणबी, महार लोक उत्पन्न करूं शकले नाहींत, तो सर्व वर्ग आज प्रान्तीय—गुजराती व मारवाडी—आहे. मराठी वैश्य वर्ग नष्ट झाला तरी वैश्यांचें कार्य उरलें व त्याची उणीव पर-प्रांतीयांनीं भरून काढली. आज भारत–शासन–सत्तेचें कार्य उत्तम प्रकारें करणारे लोक दक्षिणेंतून येत आहेत. त्यांमध्यें महाराष्ट्रीयांना व इतरांना स्थान बेताचें मिळत आहे. राष्ट्राच्या वाढीला व समाजाच्या सुस्थितीला लागणारीं योग्य माणसें पाहिजेत. तीं जेथून मिळतील तेथून घेतलीं पाहिजेत. तीं अमक्या जातींचीं आहेत म्हणून त्याज्य समजणें हें धोक्याचें व संकुचित स्वार्थाचें द्योतक आहे. प्रत्येक मनुष्या-मध्यें -मग तो कोणत्याहि जातीचा असो--द्रव्य, मान, सत्ता व विद्या संपादन करून घेण्याची थोडीबहुत पात्रता असतेच. त्याला संधि देणें, हाच उत्तम मार्ग आहे.

आज आपणांपुढें केवळ सज्जनांचा समाज ( Society of the Elect ) स्थापण्याचेंच कार्य नाहीं; सामान्य जनांचा समाज समता व सहकार या तत्त्वांवर आपणांला उभा करावयाचा आहे. त्याला संघटना पाहिजे. त्याला व्यक्तीच्या स्वाभाविक गुणकर्मांच्या योग्यतेचा उपयोग करून घेतला पाहिजे. सगळे मानव शक्तीनें, गुणानें व कार्यक्षमतेनें सारखे आहेत असें मानववंशशास्त्र व मानवसमाजशास्त्र अजून निश्चितपणें सांगूं शकत नाहींत.

सर्व मागसलेल्या जातींना शिक्षणरूपानें, द्रव्याच्या साह्यानें, कार्याच्या अनुभवानें व जबाब-दारीच्या स्थानानें पुढें आणणें, त्यांच्यामध्यें खऱ्या नागरिकत्वाची, उत्तम शासन–कारभाराची व निर-पेक्ष समाजसेवेची जाणीव उत्पन्न करणें हेंच आपलें कर्तव्य आहे. त्यांचा विश्वास आपल्या अपूर्व स्वार्थ-त्यागानें व निरपेक्ष जनसेवेनें, आपला शासनाधिकार व धनलाभ सोडण्यानें आणि त्याबरोबरच विद्या व शास्त्रें यांच्या पठणानें, प्राप्त करून घेतला पाहिजे. त्यांना आपल्या संस्कृतीचें, इतिहासाचें व नीतीचें शिक्षण देऊन त्याबरोबरच समाजशास्त्र, राजनीति-शास्त्र, अर्थशास्त्र व मानववंशशास्त्र यांचेंहि शिक्षण दिलें पाहिजे. तसेंच त्यांना आधुनिक राष्ट्र व समाज यांच्या गहन गुंतागुंतीच्या प्रश्नांचें ज्ञान करून दिलें पाहिजे. म्हणजे त्यांना कोणताहि आधुनिक समाज कसा टिकतो याची जाणीव होईल. ती झाल्यावांचून








त्यांचा द्वेष कमी होणार नाहीं. त्यांच्यामधील कल-हाचे खोटे प्रचार बंद झाले पाहिजेत. प्रत्येक मनुष्याच्या अधिकाराची व जीवनाची पवित्रता त्यांना भासवून दिली पाहिजे. हें सर्व करून सुद्धां जातीयतेचा प्रश्न लवकर सुटेल व ब्राह्मण- द्वेषाचें बीज नष्ट होईल असें नाहीं. सध्यां प्रगतीचे दोन मार्ग सुधारकांनीं प्रतिपादिलेले आहेत. एक क्रांतीचा व दुसरा क्रमविकासाचा. एक जुन्याचा सर्वथैव नाश करण्याचा व दुसरा जुनें हळूहळू बदलण्याचा. आपण कोणता मार्ग पत्करणार? क्रांतीचा का क्रमविकासाचा? समता कोणत्या मार्गानें प्राप्त होईल? साममार्गानें का दंड व भेद यांच्या मार्गानें? हे नीतीचे, इतिहासाचे व समाजशास्त्राचे प्रश्न आहेत. ते केवळ nihilismच्या व anarchismच्या मार्गाचे नव्हेत.

## ब्राह्मणांविषयींचें खरें शल्य

कोणत्याहि व्यवहारामध्यें व कार्यामध्यें जाति-संस्था अथवा केवळ ब्राह्मण जात न मानण्यानें आणि त्यांची असलेली सुत्ता, संपत्ति, त्यांना मिळणारा मान व त्यांची विद्या हीं हरण करण्यानें आजची स्थिति सुधारण्यासारखी आहे काय? ब्राह्मण जात टिको वा न टिको, ती करीत असलेलें कार्य सामाजिक महत्त्वाचें आहे. नसतें तर त्यांच्याबद्दल द्वेष उत्पन्न झाला नसता, त्यांची अवहेलना झाली नसती व त्यांचे विरुद्ध अत्याचारहि झाले नसते. आज सत्ता, संपत्ति, विद्या व मान हीं सर्वांना मिळालीं पाहिजेत; पण त्यांच्या प्राप्तीवर निर्बंध आहेत काय? ब्राह्मणांनीं विनशर्त शरण (unconditional surrender) जावयाचें म्हणजे काय? त्यांनीं अधिकार-संन्यास व धनत्याग करावयाचा तो कोणाकरतां? राष्ट्राकरतां का कोण्या एका मागसलेल्या जाती-करतां? व तो कां म्हणून? "असे मार्ग सुचविणारे तुम्ही कोण शास्त्रज्ञ?" असा प्रश्न आहे. ब्राह्मणांनीं कीं भांडवलवाल्यांनीं व सैनिकांनीं आज सत्ता व्यापिली आहे? ब्राह्मणांच्या कीं वैश्यांच्या व क्षत्रियांच्या हातांत आज सत्ता आहे? ब्राह्मणांच्या हातांत, का लोकशाहीमुळें किसान व कामकरी या वर्गांचे संघ व त्यांचा विधिविधान मंडळांतील प्रभाव व त्यांचें मत यांमध्यें ती सत्ता आहे? सामान्य जनतेच्या मूर्खपणाचा अथवा अज्ञानाचा फायदा मात्र लोकांचे पुढारी व समाजवादी प्रचारक घेत आहेत व स्वतःचा फायदा करून घेत आहेत. मला या नव्या राज्यसंघटनेमध्यें व सामाजिक परिवर्तनामध्यें ब्राह्मणवर्गाचें म्हणून संघ व संघटना या रूपानें प्राबल्य दिसत नाहीं. त्यांचा मुख्य गुण अथवा दोष आज द्वेषास पात्र झाला आहे तो त्यांच्या विद्वत्तेचें अधिक प्रमाण आहे म्हणून व राष्ट्राला त्याची जरूरी आहे म्हणून. तेव्हां आपण जर विद्या-पान—निषेधाचा (prohibition of learningचा) मार्ग मद्यपाननिषेधाच्या मार्गासारखा पत्करला तर शिकणारे ब्राह्मण शिकूं शकणार नाहींत, त्यांना शाळा-कॉलेजामध्यें घ्यावयाची जरूरी पडणार नाहीं. आणि त्यांना घरींहि शिकतां येणार नाहीं. असा कांहींसा प्रकार मुसलमान कारकीर्दींत झाला होता. ब्राह्मण म्हणून आज ब्राह्मणांना कोणतेंच क्षेत्र खुलें नाहीं; त्यांना कायद्यानें कोणतेच विशेष अधिकार दिलेले नाहींत. त्यांच्यामध्यें धन, सत्ता, मान हीं कोणत्याच दृष्टीनें फाजील केंद्रित झालेलीं नाहींत. मात्र त्यांचा विद्येकडे मोठा ओढा आहे, तीमध्यें ते पुढें आहेत व तेंच खरें शल्य आहे. हा बुद्धिजीवी लोकांविरुद्ध Myth of the Common Manमुळें मागसलेल्या लोकांचा द्वेष वा विरोध आहे. विद्या ही जन्मपरत्वें वा जातित्वामुळें पिढीजाद येत नाहीं. ती स्वतः प्रयत्नानें व अभ्यासानें प्राप्त करून घ्यावयाची असते. तिच्याबद्दल प्रेम व ओढा असावा लागतो. त्यासाठीं आपल्या कुटुंबांत व जीवनांत बुद्धीचें व विद्येचें वातावरण उत्पन्न करावें लागतें. ज्यांचें सर्व लक्ष धनप्राप्ति व कामतृप्ति यांमध्येंच गुंतलेलें आहे, जे अर्थकामवृत्तीचे आहेत व ज्यांनीं आपला वेळ त्यांच्यांतच गमावला आहे, त्यांनीं विद्वानांच्या व त्यांना मिळणाऱ्या मानाचा द्वेष कां करावा? स्वतः कां विद्वान् होऊं नये? हा द्वेष चुकीच्या राक्षसी भावनांवर अधिष्ठित आहे. जोंपर्यंत सर्व जगांत विद्यांना व शास्त्रांना मान आहे व त्या विद्यांची व शास्त्रांची मानवाच्या सुस्थितीला व प्रगतीला आवश्यकता आहे, तोंपर्यंत जे लोक व जो वर्ग या विद्यांची व शास्त्रांची उपासना करतील त्यांची आवश्यकता व मान राहणार








आहेत. तेच ब्राम्हण अथवा Intellegentsia होणार आहेत. जे लोक केवळ सर्व ब्राह्मण जातीच्या लोकांना ब्राह्मण मानतात व त्यांना नष्ट करण्याचे अथवा शरणागतीचे उपाय सुचवितात, ते आमच्या समाजाचा व संस्कृतीचा द्रोह करीत आहेत. त्यांचा विरोध सुशिक्षित व विद्यावंत ब्राम्हणांना आहे कां ब्राम्हण म्हटलें जाणाऱ्या द्विपाद् माणसांना आहे? अशा नामधारी ब्राम्हणांजवळ कोणती सत्ता, संपत्ति, विद्या व कोणता मान पिढीजाद एकवटला आहे वा वारसाहक्कानें त्यांच्याकडे येत आहे? त्यांचे वृत्तींचे हक्क फारच थोडे राहिले आहेत व तेहि वैदिक लग्नपद्धति मोडल्यानें व पौराणिक पूजापद्धति सोड-ल्यानें जातील. ब्राह्मणेतरांना तसें करण्याचा आज अधिकार आहे. ते तसें कां करीत नाहींत?

## ब्राह्मणांच्या नागरिकहक्काचा प्रश्न

इतका द्वेष ब्राह्मणांविरुद्ध ब्राह्मणेतरांमध्यें जो दिग्दर्शित झाला आहे, तो चालू असतांना ब्राह्मण म्हणविणाऱ्यांनीं आपला बचाव कसा करावयाचा व विरोधकांशीं कसें सलोख्यानें राहावयाचें? हा प्रश्न खरोखरच नागरिकत्वाचा आहे. ब्राह्मण हे कांहीं परकीय लोक नाहींत. ते या देशाचे नागरिक आहेत. ते वैदिक कालापासून या देशाचे रहिवासी आहेत. त्यांचें रक्षण करणें हें शासन-सत्तेचें काम आहे. त्यांना नागरिकत्वाचे सर्व अधि-कार व नागरिकत्वाचीं कर्तव्येंहि आहेत. ते अरब, तुर्क, मोंगल, पठाण यांसारखे नवे, उपटसुंभ, विदेशी व विधर्मी लोक नाहींत. ते भारतीय संस्कृतीचे भागीदार, भक्त व जनक यांपैकीं आहेत. त्यांना स्वतःच्या रक्षणाचा, शिक्षणाचा व जीवनाचा अधि-कार आहे. तेव्हां त्यांच्या अधिकारसंन्यासाचा प्रश्न जातीय रीतीनें उद्भवत नाहीं. त्यांना विशेष अधि-कार आज नाहींत व नसावेहि; पण त्यांचे सामान्य अधिकार मात्र रक्षिलेच पाहिजेत. खरोखर पाहतां दुसऱ्या बहुसंख्याक जातीच कट्टर जातीयतेमध्यें, काळोखामध्यें मग्न झालेल्या आहेत. त्यांच्यामध्येंच जातीयता व इतर जातींचा द्वेष प्रखरतेनें आहेत. तो द्वेष त्यांच्या अमानुष कृत्यांनीं आज दृग्गोचर झाला आहे. ब्राह्मण जातीनें जात म्हणून इतर जातींविरुद्ध असे अत्याचार केलेले नाहींत. गोड-शांचा अत्याचार हा ब्राह्मण जातीचा नव्हे, हें आम्हांला छातीठोकपणानें सांगावेंसें वाटतें. कांहीं ब्राह्मणांमध्यें आज जी निराशेची व विफलतेची (Frustrationची) भावना आहे ती भित्रेपणाची आहे. ज्यांना एका व्यक्तीच्या गुन्ह्याची जबाबदारी त्या व्यक्तीच्या सर्व जातीवर लादावीशी वाटते, त्यांनीं असें उपदेश-पांडित्य ब्राह्मणांना करावयाची जरूरी नाहीं. ब्राह्मणेतरांना त्यांच्या दुष्कृत्याची जाणीव करून देणें, त्यांना शिक्षण देणें व खऱ्या नागरिकत्वाची कल्पना देणें हें शासनसत्तेचें प्रथम व प्रमुख कार्य आहे. त्याकरतां बिनशर्त शरणागतीचें तत्त्वज्ञान नको आमचें राष्ट्र लोकशाहीचें होणार आहे का? त्याचा खरा उद्देश प्रत्येक व्यक्तीच्या अधिकारांचें रक्षण व सर्वांना सामुदायिक सुख प्राप्त करून देणें हा आहे काय? त्यांमध्यें व्यक्तीच्या जीवाला, जीवनाला, मानाला व पालनपोषणाला वाव आहे काय? का तें वर्गजातिकलह प्रज्वलित करण्याचें एक साधन आहे? ब्राह्मणांमध्यें मोड-णाऱ्या माणसांना आज दुसऱ्यांची सत्ता, संपत्ति, स्थान वा मान अपहरण करण्याची इच्छा नाहीं. त्यांना जिवंत राहून आपल्या विद्येनें, शिक्षणानें व व कर्तव्यबुद्धीनें होईल तितकी जनसेवा व देशसेवा करावयाची आहे. अशा उद्देशानें प्रेरित झालेल्या लोकांना जातीय द्वेषाच्या विषानें भरलेल्या लोकांनीं तत्त्वज्ञानाचे, सामाजिक मूल्यांचे व समाज-रचनेचे धडे सांगावे हें धाष्ट्यचें व धोक्याचें आहे. त्यानें जाती तोडण्याचा प्रश्न सुटणार नाहीं.

जातीयता ही लग्नसंस्था मोडण्यानें व पौराणिक संस्कार व पूजा-पद्धति सोडण्यानेंच नष्ट होईल असें आम्हांस वाटतें. कारण, त्यांमध्येंच ब्राह्मण भटांभिक्षुकांचें, उच्चनीचतेचें, व रोटी-बेटी-व्यव-हारांचें प्राबल्य आहे.

समाजशास्त्र व मानववंशशास्त्र यांमध्यें Endogamy (सवर्ण-विवाह) व Exogamy (गोत्रान्तर-विवाह) यांविषयीं जे विचार आहेत त्यांच्या गुणदोषांचा विचार येथें आम्ही करीत नाहीं. मात्र सरीस अनियंत्रित संबंधांचे दुष्परिणाम काय होतात याचें शास्त्रीय विवेचन झालें पाहिजे.

# म. मंजीखाँसाहेब—एक अष्टपैलू गायक

एकलव्य

गायनकलेच्या इतिहासांत अकबर बादशहाच्या दरबारांत प्रसिद्ध नवरत्नांपैकीं **मियां तानसेन** ध्रुपदगायक या नात्यानें अजरामर आहेत. असें सांगतात कीं त्यांनीं बादशहाला आपल्या गुरूचें म्हणजे **स्वामी हरदासजी** यांचें गायन जंगलांत लपून ऐकविलें होतें. याच हरदासजींचे अस्सल वंशज म्हणजे **खाँसाहेब अल्लादियाखाँ** व **मरहूम मंजीखाँ**. हे मूळचे गौड ब्राह्मण व त्यांचें गोत्र शांडिल्य. मध्यंतरीं **निजामशाहींत** यांच्या पूर्वजांपैकीं एकानें आपल्या स्वामींचा जीव वांचविण्यासाठीं मुसलमानी धर्म स्वीकारला. औरंगजेब बादशहाच्या कारकीर्दींत या पूर्वजाच्या मालकाला जबरदस्तीनें 'मुसलमान हो' असें कळविलें गेलें. त्यानें तें नाकारतांच त्याला तावडतोब गिरफदार करून तुरुंगांत डांबण्यांत आलें. खाँसाहेबांच्या या पूर्वजांचा चेहरा आपल्या मालकाप्रमाणें होता. त्यानें तुरुंगांतील अधिकाऱ्यास वश करून घेऊन आपण स्वतः मालकाच्या जागीं बसून, त्यांना पळून जाण्यास व धर्मान्तर वांचविण्यास संधि दिली आणि स्वतः स्वामिभक्तीमुळें हिंदूचा मुसलमान झाला. तेव्हांपासून हें घराणें मुसलमानच आहे. ही सर्व हकीकत मंजीखाँनीं सांगितली असल्यामुळें त्यांच्या सांगण्याबरहुकूम देत आहे.

## 'अभीतक आपको पहचाना नहीं था'

मंजीखाँ नवीन मतांच्या सुधारलेल्या मुसलमानांपैकीं असल्यामुळें त्यांची राहणी कडव्या मुसलमानाप्रमाणें नव्हती. त्यांचे स्नेही मुसलमानांपेक्षां हिंदूच जास्त होते. ते मराठी उर्दूइतकेंच स्वच्छ व उत्तम बोलत असत. त्यांचे वडील **अल्लादियाखाँसाहेब** व त्यांचे चुलते **हैदरखाँ** प्रथम दक्षिणेंत पुण्यांत अस्सल रजपूत पोषाखांत आले. त्या वेळीं पुण्यास **किर्लोस्कर मंडळीचा** मुक्काम होता. कंपनींतील मूळचे पुण्यांतील प्रख्यात **नट** व बीनकार **बाळकोबा नाटेकर** म्हणजे चांगलेच नांवाजलेले गवई! त्यांनीं कंपनींत अल्लादियाखाँहेबांचें गाणें केलें. **भाऊराव कोल्हटकर** वगैरे मंडळी गाणें ऐकायला होतीच. त्या काळीं ग्वालेर दरबारच्या **हद्दूखाँचे चिरंजीव महंमदखाँ** यांच्या तयार गायकीची व **बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर** यांच्या त्याच घराण्यांतील सणसणीत गायकीची महाराष्ट्रावर बरीच छाप पडली होती. तेव्हां खाँसाहेबांची बिलंपत (?) त्यांच्या घराण्याइतकी तंतोतंत सुरेल व आकर्षक नसल्यामुळें, पहिला तास वरील रुक्ष विलंपतींत कसाबसा गेला. बाळकोबा वगैरे मंडळी हळूच आंत गेली आणि आपआपसांत कुजबुजूं लागली, "काय हो, येवढा नांवाजलेला गवई म्हणून सांगतात, पण अजून कांहीं पकड बसत नाहीं बुवा!" व असें म्हणून तेथेंच गप्पा ठोकीत बसली; तोंच खाँसाहेबांचा आवाज लागून त्यांनीं अवघड, तऱ्हेवार आलापांचे व फिरतींचें घनचक्र सुरू केलें. तानेचे फवारे उडूं लागले. तें तानेचे सट्टे घेतां घेतां हमखास अलगत ढंगदार समेवर येणें आंतील

मंडळीच्या कानीं पडूं लागतांच एकेकांचें लक्ष आपोआप तिकडे वळूं लागलें. पुढें ती चित्र-विचित्र 'तनाईत', ती सहज गमकयुक्त तान, दाणेदार स्वरांनीं युक्त अशी तऱ्हेतऱ्हेच्या लयीच्या अंगानें जाणारी फिरत ऐकतांना हे पळून आलेले श्रोते जागच्या जागीं डोलूं लागले. बाळकोबा जाणकार व मोकळ्या मनाचे असल्यामुळें चीज संपतांच गादीवरून येऊन खाँसाहेबांना अभिवादन करून म्हणाले, "अभीतक आपको पहचाना नहीं था." इतका त्यांच्या मनावर त्या गाण्याचा असर पडला. या अवघड पण चमत्कृतियुक्त गायकीनें त्या काळीं पुण्यांत खळबळ उडवून दिली असें लोक सांगतात. कै. भास्करबुवांनीं जेव्हां अल्लादियाखाँसाहेबांचें गाणें ऐकलें, त्या वेळींच त्यांचें शिष्यत्व पत्करलें. त्याअगोदर फैजमहंमदखाँ व नथ्थनखाँ यांच्याकडून त्यांना त्यांच्या घराण्याची विद्या मिळाली होती. तरीहि त्यांनीं खाँसाहेबांचें गाणें ऐकल्यावर आपल्यांत संगीतांत आणखी एका रंगाची उणीव आहे असें वाटून खाँसाहेबांची तालीम सुरू केली. त्या वेळीं खाँसाहेब कोल्हापुर-दरबारांत गायक म्हणून नौकर होते. अशा तानसेन यांच्या अधिकारयुक्त गुरु–घराण्यांत मंजीखाँ यांचा जन्म झाला.

मंजीखाँसाहेबांनीं ध्रुपदगायकीची तालीम आपले चुलते म. हैदरखाँ यांचेकडे घेतली होती. हैदरखाँचा आवाज जवारीदार बारीक असून फारच मधुर होता. हैदरखाँनींच मंजीखाँना पायाशुद्ध सुरीली तालीम दिली. नंतर वडिलांनीं त्यांना तालीम दिली. त्या काळीं म. रहिमतखाँचें गाणें मंजीखाँना बऱ्याच वेळां ऐकावयास मिळालें होतें. तें त्यांना फार आवडे. त्यांतील आपल्याला आवडलेल्या गायकीच्या तऱ्हा मंजीखाँनीं आपल्या गळयाला बसविल्या होत्या व ते त्या आवडीनें गात असत; परंतु यावरच रुष्ट होऊन त्यांचे सनातनी वृत्तीचे वडील त्यांच्यावर रागावले. बापलेकांमधील या मतभेदाचें पर्यवसान मंजीखाँनीं पुढें गाणें अजीबात सोडण्यांत झालें. त्यांनीं सात वर्षे गाण्याकरितां म्हणून 'आ' केला नाहीं व कोल्हापुरांतच फॉरेस्ट ऑफिसरची नौकरी पत्करली. सरतेशेवटीं कै. शाहूमहाराजांचे बंधु बापूसाहेब कागलकर यांनीं पुढाकार घेऊन मंजीखाँना ही विचित्र शपथ मोडावयास लाविली. त्यांनीं आपल्याच घरीं त्यांचें गाणें केलें. नंतर संस्थानची नौकरी सोडून ते मुंबईस येऊन राहिले. मुंबईत संगीत शिकविण्याचा व मैफलींत गाण्याचा व्यवसाय त्यांनीं सुरू केला.

## 'तबियतीचें' गाणें

खाँसाहेब स्वभावानें मोठे रसिक, दिलदार व मंडळींतले होते. अंगांत अप–टु–डेट सूट घातलेला, वर अस्सल संस्थानी तऱ्हेनें बांधलेला साफा, हातांत नक्षीदार मुठीची बारीक काठी, अशी नटलेली ही उंच व धीरोदात्त मूर्ति मलबार हिलवर आपल्या सुंदर लहान मुलीचा हात धरून फिरावयास आलेली वीस वर्षांपूर्वी वारंवार मुंबईकरांना दिसत असे. 'नमवी पहा भूमि' ह्या खाडिलकरांच्या प्रसिद्ध गाण्यांतील ओळींची त्यांना पाहून कोणालाहि सहज आठवण होत असेल. मुलीला मोकळें व स्वैर खेळावयास सोडून आपल्या चार गुलहौशी मित्रमंडळींत हिरव्यागार 'लॉन'वर बसल्यावर, आपल्या स्वयंस्फूर्त मधुर संगीतानें स्वाभाविकच असल्या रम्य व सुंदर वातावरणांत भर टाकतांना मीं वारंवार त्यांना ऐकलें आहे. त्या संगातामुळें कित्येक फिरावयास आलेल्या स्त्रीपुरुषांची गति थांबली आहे, तर कित्येक भिडस्तांची गति मंद झाली आहे; त्यानें कित्येकांना एकमेकांत समोरासमोर बोलण्याच्या मिषानें, पण वास्तविक गाणें ऐकण्यासाठीं म्हणून उभें केलें आहे, तर कित्येक बेछूट बडबड करणाऱ्या आजूबाजूच्या तरुणांच्या जिभांना लगाम घालून त्यांना आपल्याकडे खेंचलें आहे. अशीं हीं दृश्यें मीं अनेक वेळां पाहिलीं आहेत. वरील मित्रमंडळींत गात असतांनाच त्यांचा व माझा परिचय झाला व तो जास्तच दृढ होत गेला. मुंबईत सतत तीन वर्षे त्यांचें निरनिराळ्या मैफलींत जितकें गाणें मीं ऐकलें, त्याहिपेक्षां जास्त असें स्वयंस्फूर्त गाणें महालक्ष्मी बंदरीवर,










अनुक्रमणिका

मलबारहिलवर, नव्या चौपाटीवर ऐकलें. त्या प्रशांत संधिकालीं त्यांना 'गा' म्हणून मला कधीं सांगावें लागत नसे. कधीं जयतकल्याण, तर कधीं छायानट, कधीं मालश्री, कधीं नटबिहाग, कधीं खोकर तर कधीं केदार असे राग ते नेहमीं छेडीत असत. अशा वेळीं हातांतील काठीवरच ते स्वतः ठेका धरीत. एकाद्या वेळीं ते सूर्यास्ताची शोभा पाहण्यांत गुंग होत. अशा वेळीं आम्हींच बेडरपणें एकाद्या रागाची गुणगुण त्यांच्या भोंवतीं सुरू करावी, तोंच त्याच रागांतील एकादा सुंदर आलाप किंवा तान घेऊन तो राग छेडावयास ते सुरुवात करीत आणि मग काय! तास, दीड तास गेल्याचें कळतहि नसे. त्यांचें हें 'तबियतीचें' गाणें मला मनसोक्त ऐकावयास मिळालें. अशा गाण्यांत त्यांच्या कल्पनाविलासाला, त्यांच्या मधुर, लवचीक व सहज फिरणाऱ्या गळयाच्या विलासाची जोड मिळाली असल्यामुळें संगीताची ही आतषबाजी चालू असतांना वेळेची फिकीर कोणीं केली आहे? एकाद्या दिवशीं त्यांची माझी गांठ पडली नाहीं तर दुसऱ्या दिवशीं सकाळींच त्यांची मोटर माझ्या दारांत ठेवलेली! 'क्यों मियाँ, कल कहाँ गुल थे?' म्हणून चौकशी करीत करीत प्रास्ताविक प्रश्नोत्तरें झाल्यावर, एकादा सकाळचा राग आळवायला त्यांनीं सुरुवात करावयाची. अशा वेळीं हातांतील अभ्यासाचें पुस्तक बाजूला सारून, कोपऱ्यांतील डग्गा हातांत धरून त्यांच्या गाण्याला तालाची साथ केल्यावांचून मला राहवत नसे. त्यांच्या या खासगी मैफली त्यांच्या खास रंगलेल्या मैफली-पेक्षांहि माझ्या जास्त स्मरणांत आहेत. आयुष्यांत ज्या थोड्या गायकांनीं आपलें गाणें कुठलीहि अपेक्षा न ठेवतां मला मनसोक्त ऐकविलें, त्यांपैकीं मंजीखाँ हे प्रमुख होत. मंजीखाँ गेले, पण मला कायमचें ऋणबद्ध करून!

## बड्या बापाच्या कलेचाहि वारसदार

मैफलींत बसलें कीं त्यांची प्रसन्न वृत्ति, हंसरा चेहरा व भरदार देह पाहून श्रोत्यांवर त्यांची अधिक छाप पडे. विद्येचें व आत्मविश्वासाचें तेज, रसिकता आणि वृत्तीचा प्रेमळपणा कोणत्या श्रोत्यांस आपलेसे करणार नाहींत? अशा वृत्तीचा गायक व श्रोते यांचा एकजीव झाल्या-वर बैठक रंगलीच पाहिजे. खाँसाहेबांचें ख्यालांचें गाणें पुरेपूर समजण्यास अवघड असे; तरी तें मधुर, सुरेल व रंजक असल्यामुळें आणि वर दिग्दर्शित केलेल्या त्यांच्या वृत्तीमुळें तें श्रोत्यांना ताबडतोब त्यांच्याकडे खेंचून घेई. कोणाला रागाचें नांव सांगतां न येवो, कोणाला 'सरगम' करतां न येवो, पण मंडळी त्या मैफलींतील डौलदार गाण्यानें डुलत असतांना मीं पुष्कळदां पाहिली आहे. खाँसाहेब पैसे घेऊन गात, परंतु पैशासाठीं गात नसत. गातांना ते घड्याळाकडे पाहत नसत. "दो बजेतक गानेका" कायदा त्यांचा नसे. रंगलेल्या मैफलींत श्रोत्यांनीं आग्रह केला तर, "रातभर गानेको क्या हम तवायफ हैं?" असें म्हणून ते रसिकांचा अपमानहि करीत नसत. ठरलेल्या बिदागीपेक्षां जास्तच मोबदला देऊन ते तंबोरा खालीं ठेवीत असत. गुणाचें चीज रसिकांतच व्हावयाचें असतें, याची त्यांना जाणीव असे. मुंबईच्या समाजांतील एका विशिष्ट श्रीमंत वर्गाची मर्जी राखून, त्यांच्या आश्रयानें चिकटलेला मोठेपणा त्यांनीं नाकारला होता; त्यामुळें चिडून जाऊन त्यांतील कांहीं दुष्ट लोकांनीं पिता-पुत्रांमधील एके काळच्या भांडणाला भलतेंच स्वरूप देऊन "मंजीखाँ बडे बापका बेटा आहे झालें!" असा खोटा प्रवाद त्यांच्याबद्दल सबंध मुंबईभर पसरविला होता. परंतु मुंबई-म्यूझिक-सर्कलमध्यें त्यांचें पहिलें गाणें झालें, तेव्हां हा गुणी इसम बड्या बापाचा नुसता बेटाच नसून त्याच्या कलेचाहि वारसदार असा अस्सल कलावंतहि आहे असें निःपक्षपाती श्रोत्यांच्या नजरेला आलें आणि दुसऱ्याच दिवशीं या मैफलीची बातमी सर्व मुंबईभर पसरून त्या दुष्टांच्या तोंडाला आपोआप कुलूप बसलें.

मैफलींत गातांना खाँसाहेबांना पेटीची साथ मुळींच चालत नसे. सारंगी-वाल्यांत प्रख्यात मजीदखाँ सारंगीवाला












असला तरच त्यांना चाले. एरव्हीं दोन गंभीर तंबोरे वाजत आहेत, पेटीचा नुसता सूर लावला आहे, उत्तम तबलिया बाजूला ताल धरून आहे, अशा थाटांत त्यांचें गाणें चाले. त्यांच्याजवळ विद्या भरपूर असल्यामुळें त्यांना साथीच्या सूचनेची किंवा मदतीची गरज कधींच भासली नाहीं. निम्मा वेळ मागें तंबोरा घेतलेल्या शिष्यांना गायला लावून मध्येंच आपण एखादी तान मारून छाप पाडण्याची ( शेजारणींना कांडायला लावून मध्येंच आपल्या नाजूक हातानें दोन नाजूक घाव घालणाऱ्या श्रीमंतिणीप्रमाणें ) एखाद्या गवयाची ऐट मंजीखाँ आणीत नसत. 'अथ'पासून 'इति'पर्यंत मन लावून रसिकांना संतोष होईपर्यंत गायचें येवढीच त्यांची साधीसुधी ऐट होती. ते आवाज लागण्याकरितां कॉफी पीत नसत, किंवा पानतंबाखूचा वेळीं अवेळीं बार भरून भर श्रोत्यांत पिकदाणी भरून काढण्याचा ओंगळपणा व किळसवाणा प्रकारहि ते कधीं करीत नसत. कसलेंहि व्यसन त्यांना नव्हतें, ही त्यांतली नमूद करण्यासारखी गोष्ट आहे.

मंजीखाँचा आवाज सर्व प्रकारच्या गायकीला योग्य होता आणि हें ओळखूनच सर्व प्रकारच्या गायकीकडे त्याचा सढळ उपयोग ते करीत असत. ख्याल व ध्रुपदगायकीला लागणारा गळ्याचा भरदारपणा, दमदारपणा त्यांच्यांत होता; तर ललित गायनास आवश्यक असलेला गळ्याचा लवचीकपणा, सुरेलपणा व माधुर्यहि त्यांच्याजवळ भरपूर होतें. आवाजाला रुंदीप्रमाणें उंचीहि होती. फिरतहि स्वाभाविक असल्यामुळें त्यांची हरकत, ताना, मुरक्या स्वच्छ व सुरेल निघत. गळ्याला कोठेंहि रुकावट होऊं नये म्हणून त्यांनीं त्याला कसरतहि खूप दिली होती. ह्या कसरतीमुळें त्यांच्या स्वाभाविक गोडीला जिल्हई येऊन गातांना त्यांना कष्ट पडत नसत. स्वरांवर नाजूक कंप ठेवणें, त्यांना हेलकावे किंवा झोके देणें खाँसाहेबांना सहज साधे. वाटेल त्या स्वरांवर हक्कानें त्यांना वरील सर्व प्रकार करतां येत. यामुळें त्यांच्या आलापांत, तानेंत, हरकतींत, फिरतींत, गमकांत वैचित्र्यहि भरलेलें असे. भावनेला अनुसरून व पोषक अशा कंठाच्या सर्व क्रिया ते हुकुमी व सहजपणें करीत. तारसप्तकांतील गंधार, मध्यम, पंचम, धैवत यांवर आंदोलनें घेतांना त्यांचा आवाज इतका नाजूकपणें लवे कीं श्रोते उल्हसित होऊन त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहत. गिरीश कवींची ' किती करूं विनवणी तुज आतां ' ही कविता गातांना अंतऱ्यांत तार सप्तकांतील स्वरांना असेच हेलकावे देऊन किंवा नाजूक कंप देऊन करुण रसाचा परिपोष ते फारच सुंदर करीत. गळ्याच्या या अशा ठेवणीमुळें व मेहनतीच्या जिल्हईमुळें " कोकिळे ऐकिव तव मधु बोल " ( माधव ज्यूलियन् ) गातांना त्यांतील भावनांच्या सर्व छटांचा परिपोष ते फारच सफाईनें करीत असत.

## सांप्रदायिकपणाचा अभाव

ख्याल गातांना खाँसाहेब सुंदर चिजेची निवड करून धीम्या त्रितालांत किंवा तिलवाड्यांत अस्ताई सुरू करीत. त्यांचें सुरुवातीचें स्थायी गाणें निराळ्या प्रकारचें असल्यामुळें त्याला बिलंपत म्हणतां येणार नाहीं. ग्वाल्हेर गायकीच्या बिलंपतीशीं यांच्या गायकीचें मुळींच साम्य नाहीं. ग्वाल्हेरच्या बिलंपतीप्रमाणें तींत आपणांस मींड, घसीट, स्वरभरणा किंवा स्वरांचें आकुंचन दिसत नसे. तबल्याच्या लयीच्या दुपटीचौपटींत आलापीनें ते बढत करीत. दोन दोन, तीन तीन, चार चार, स्वरांची आलापी करून चिजेचें तोंड म्हणून समेवर येत. नन्तर **गमकालाप** सुरू करीत. गमकावर त्यांचा गळा चांगलाच झुलत असे. त्यांचीं गमकें रहिमतखाँसाहेबांसारखीं सुरेल व भरीव असत. " ही गमकाची गायकी आपण रहिमतखाँची ऐकून उचलली, " असें ते स्वतः सांगत. घराण्याचा सांप्रदायिकपणा त्यांच्यांत नसल्यामुळें दुसऱ्याच्या गायकींतील चांगुलपणा उचलण्यांत त्यांना केव्हांहि कमीपणा वाटला नाहीं. मधुर आलापीनें रागाचें छत उभारल्यावर मग त्याला तानेची झालर बांधायला ते सुरुवात करीत. येथूनच त्यांच्या घराण्याचें असें खास

रंगतदार गाणें सुरू होई. तान सुरेल असूनहि तींतील प्रत्येक स्वर बांधीव व दाणेदार असे. त्यांची तान म्हणजे निवडक, पाणीदार, टपोऱ्या मोत्यांचा गुंफलेला हारच! तान कधीं सरळ, सपाट, आरोहाअवरोहाची नसे; तर चार चार स्वरांचे झुबके करून मध्यें स्वर जोडून बनविलेली असे. त्यांतील स्वरांची विचित्र गुंतागुंत आरोहांत होई; तर अवरोहांत ती उलगडे. एकादे वेळीं मध्य सप्तकांत तान सुरू होऊन, तार सप्तकांत फिरून मध्य सप्तकांत येऊन पुनः वर चढे. अशी किती तरी आवर्तनें होत असत. प्रत्येक आवर्तन मोजमापाचें असल्यामुळें समेवर ते इतके सहज व अचूक येत कीं मौजेनें श्रोत्यानें "हां" म्हटलेंच पाहिजे. त्यांतील विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं कितीहि अवघड व लांबलचक फिरत करून आल्यावर चिजेचें तोंड म्हणत असतांना सम गांठण्याकरितां तिच्यांतील शब्दांचा डौल ते कायम ठेवीत, उच्चार शुद्ध करीत, शब्दांतील अक्षरांची ओढाताण किंवा हिसकाहिसक ते कधींहि करीत नसत. मेहनत करतांनाच ही विशिष्ट दृष्टि ठेवल्याशिवाय हा गुण साधणें शक्य नसतें. कित्येक वेळां दोन दोन स्वर हलवून तुडक्या गतीनें ते तानेचा संचार करीत. तान पूर्ण लयकारी असे. अशी तान जात असतांना विष्णुपंत शिरोडकरांसारख्या कुशल तबलजीचे पर्णाचे बोल तिच्या वळणावळणाशीं समान्तर जाऊन त्यांच्या लयकारीनें वाजत, तेव्हां ही साथ ऐकण्याची मौज असे. एकेका स्वराला अनुक्रमें खोलींतील खुंटाप्रमाणें कायम करून त्यांच्या भोंवतीं ते फिरत करीत. मधून मधून आलापांची व गमकांची पेरणी आलटून पालटून चालू असे. आलापांचें वैपुल्य व तऱ्हेवार तानेंची बरसात हीं त्यांच्या गायनाचीं खास अंगें होतीं.

## शास्त्रीय चमत्कार करूनहि रसनिर्मिति

रहिमतखाँप्रमाणें हुंकारयुक्त गमक घेत घेत तार सप्तकांतील रिषभ किंवा गंधार ते इतका नाजूक व सुरेल लावीत, कीं तो काळजालाच हात घाली. जसजशी लय वाढत जाई, तसतसे ते तानेचे फवारे, चक्रें, घनचक्रें फेंकीत असत. कितीहि चपल फिरत असली तरी सुराचा सुरेलपणा, गोडी आणि स्वच्छपणा तन्तोतन्त राखला जाई. त्यामुळें गाण्यांत तानबाजीचा चमत्कार दिसला तरी सुरेलपणानें व गोडव्यानें रसनिर्मिति होत असेच. त्यांच्या चिजा अर्थपूर्ण असल्यामुळें व खाँसाहेबांची वाणी स्वच्छ असल्यामुळें चिजेचा अर्थ ते गातां गातां स्पष्ट करीत. शब्दांचे उच्चार सार्थ करून, कित्येकदां त्यांना मुरड घालून खाँसाहेब करीत असल्यामुळें निर्माण झालेल्या रसाची श्रोतेहि लूट करीत. "बोलमें बात पैदा होनी चाहिये" हें गायनाचें महत्त्वाचें अंग त्यांना माहीत होतें. गायनाला शब्दांची जरूरी नाहीं असे एककल्ली विचार त्यांनीं गायनांत पाळले नाहींत. सर्वसाधारण श्रोत्यांना शास्त्रीय गायनाचीं अंगें, उपांगें माहीत नसल्यामुळें, पुष्कळदां रागांचीं नांवेंसुद्धां ठाऊक नसल्यामुळें, त्यांचें लक्ष गायनांतील माधुर्य, चिजेचा अर्थ, भावना व रस यांकडेच प्रामुख्यानें असतें; आणि यांपैकीं कशांतलीहि गोडी त्यांना चाखावयाला मिळाली नाहीं म्हणजे ते बिचारे आपल्यालाच कांहीं कळत नाहीं म्हणून 'शास्त्रीय गाणें आहे बुवा!' असे उद्गार काढीत खिन्नपणें बाहेर पडतात; परंतु मंजीखाँना अशा श्रोत्यांची कल्पना असल्यामुळें ख्याल गातांना सुरेलपणा, गोडी, सार्थ शब्दोच्चारांनीं होणारा भावनाविष्कार इत्यादींकडे त्यांचें लक्ष असे. आपल्या गायनांतील तानेच्या विलासानें श्रोत्यांचें लक्ष ओढून भावपूर्ण शब्दोच्चारांनीं व अनुकूल सुरेल स्वरालंकारांनीं रस निर्माण करून श्रोत्यांच्या अंतःकरणावरहि ते परिणाम करीत. येथेंच त्यांच्या व त्यांच्या गुरुभगिनीच्या (केसरबाई केरकर) गायनांत फरक असे. एक गायनांतील सर्व शास्त्रीय चमत्कार करूनहि रसनिर्मितीनें श्रोत्यांना आपलेंसें करी; तर दुसरी या सर्व चमत्कारांच्या अज्ञानामुळें समाधान मानून श्रोत्यांपासून अलिप्त राहते. एकाच घराण्यांतील दोन गायकांमधील हा फरक कलेच्या व माणुसकीच्या दृष्टीनें फारच महत्त्वाचा आहे.

यांच्या घराण्यांतील मुखबंदी तान श्रवणीय







असते; मात्र जवळूनच ती जास्त चांगली ऐकावयास येते, याचें कारण उघड आहे. तोंड बंद ठेवून नुसत्या गळयाच्या स्नायूंच्या मदतीनें (Laryngeal muscles) ही तान काढणें मेहनतीशिवाय कठिण आहे. या तानेची बांधणी व मांडणी अत्यंत बिकट व चमत्कृतिपूर्ण असते. तींत स्वरांचा भरीवपणा, वजनदारपणा असावा लागतोच; त्याशिवाय ती ऐकूं येणेंहि शक्य नसते. आणि याच्या मुळाशीं भरपूर दमश्वास असावा लागतो. नाहीं तर तान बाहेर पडण्याऐवजीं पंचप्राणच बाहेर पडावयाचे !

## एक संशोधनाचा विषय

शास्त्रदृष्ट्या यांच्या गायकीचीं चार अंगें मुख्य आहेत. (१) स्वरांची उपज. (२) बोल उपज. (३) बोलतान. (४) तान. यांच्या सुरुवातीच्या स्थायी गाण्यांत तबल्याच्या लयीच्या दुप्पटीचौपटींत लहान लहान मींडालाप घेऊनच अस्ताई–अंत्रा भरतात. घसीटीनें स्वर घेणें किंवा स्वरांची पीळदार खेंच करणें, स्वरांचा भरणा किंवा आकुंचन करणें, एकेका स्वरावर बराच वेळ मुक्काम करीत करीत गाण्याची या घराण्याची पद्धतीच नाहीं. ग्वाल्हेर–घराण्यांतील बऱ्याच चिजा या घराण्यांतील गायक गात असतात. या त्यांच्या गळयांतून ऐकतांना त्यांची बांधणी व रचना ग्वाल्हेरच्या विलंपत अंगाला धरूनच आहेत असें दिसून येतें. परंतु अस्ताईअंत्रा भरीत असतांना मात्र यांच्या गायकींत फरक दिसूं लागतो. विलंबित लयीच्या ठेक्याच्या दुप्पटी-चौपटीमध्यें अस्ताईअन्त्रा भरण्याची या घराण्याची रीत आहे. ही रीत पूर्वपरंपरागत ख्यालियांची आहे असें वाटत नाहीं; कारण हें घराणें ख्यालियांचें नसून (हरिदास स्वामींचे वंशज म्हणून) मूळचें ध्रुपद गाणारांचें ! अल्लादियाखाँना तीच ध्रुपदाची तालीम पोंचलेली आणि वर दिग्दर्शित केलेलीं चतुरंगें ध्रुपदगायकीचींच आहेत. परंतु अल्लादियाखाँसाहेबांनीं आपल्या बुद्धिचातुर्यानें जी ख्यालगायकी निर्माण केली तिची मूस परंपरागत ध्रुपदगायकीची आहे. बडे महंमदखाँचे चिरंजीव मुबारकअलीखाँ यांना अल्लादियाखाँ फार मानीत असत व त्यांचें गायन त्यांनीं फार ऐकलें होतें. ते ख्यालिये म्हणूनच प्रसिद्ध आहेत. त्यांच्या गायकीचा अल्लादियांच्या गायनावर परिणाम होणें अपरिहार्य आहे. बडे महंमदखाँ हे हद्दूहस्सूखाँचे गुरूच; पण असें असूनहि ग्वाल्हेरचें विलंपत अंग अल्लादियाखाँनीं कां घेतलें नाहीं हा आतां एक संशोधनाचाच विषय आहे. त्यांच्या हयातींत त्यांच्याशीं विचार-विनिमय करून हा प्रश्न त्यांच्या निकटवर्तीयांपैकीं किंवा चाहत्यांपैकीं कोणींहि सोडविलेला दिसत नाहीं. त्यांच्या हयातींत त्यांच्यावर झालेल्या लेखनांत त्यांच्या गायकीचा मुळापासूनचा इतिहास, तिचें वर्णन, तिच्या गुणावगुणांची, किंवा तिचें परिवर्तन वा वाढ याबद्दलची चर्चा फारच अल्प केलेली दिसून येते. बहुतेकांनीं त्यांच्या तथाकथित हिमालयासारख्या भासणाऱ्या उंच शरीरयष्टीचें व त्यांच्या कल्लयांचेंच जास्त वर्णन केलें आहे. त्यांना न ऐकलेल्यांनीं (संधि मिळणें शक्य असूनहि) तर आतां त्यांच्या अशाच अवांतर गोष्टींवर दिवाळीअंकांत लिहून संगीत सृष्टींत ‘मुझे भी गिन लो’ असा आव आणला आहे. असो. ‘बोल उपज’ म्हणजे चिजांचे शब्द तालाच्या संथ लयींत बरोबरीच्या, दुप्पट किंवा चौपट लयींत आलापांसह मांडून चिजेचें तोंड म्हणून अचूक समेवर येणें. बोलतान व तान श्रोत्यांच्या परिचयाच्या आहेतच. नथ्थनखाँ आग्रेवाल्यांच्या घराण्याप्रमाणें मंजीखाँच्या घराण्याची बोलतान फार तयार आहे. तींत वैचित्र्य व लयीचे प्रकार पुष्कळ आहेत. एकाच तानेंत हे सर्व प्रकार ते खुबीनें ओवीत. या घराण्यांतील गायक तबल्याची संथ लय कायम ठेवून दुप्पट किंवा चौपट लयींत, कधीं आड लयींत बोलउपज, बोलताना व ताना घेतात तर आग्रेवाले तबल्याची लय वाढवून बरोबरच्या दुप्पट किंवा चौपट लयींत बोलताना व ताना घेतात व चिजेचें तोंड तीन वेळां म्हणून समेवर येतात (तिय्या). ज्यांनीं मंजीखाँ, बिलायतखाँ, फैयाजखाँ, यांचीं गाणीं ऐकलीं

असतील त्यांना यांतील साम्य व फरक कळले असतील. फैयाजखाँचा आवाज जास्त ढाला व रुंद आहे. मंजीखाँचा जास्त उंच व मधुर होता. दोघेहि तयार व कसबी गायक! दोघांची तुलना करतांना श्रोत्यांना सरसनीरस ठरविणें जड जाई. फैयाजखाँ 'नोम्‌तोम्' करण्यांत, बिलंपत करून रागाची छाया पसरविण्यांत मंजीखाँपेक्षां आवाजाच्या ढाल्या भरदारपणामुळें व कसबामुळें जास्त प्रवीण, तर मंजीखाँची तान जास्त मधुर व तऱ्हतऱ्हेची. बोलतानेंत दोघेहि सारखेच वाकबगार तर मंजीखाँचे बोलतानेंतील व एकंदर शब्दोच्चार जास्त शुद्ध, डौलदार व सुसंस्कृत. फैयाज शृंगाराचा राजा, तर मंजीखाँ अनेक-रसप्रवीण! मैफल रंगांत आल्यावर चीज संपविण्याचें फैयाजखांचें धोरण अचूक, तर मंजीखाँ श्रोत्यांना 'आणखी किती तऱ्हा ऐकवून खुष करूं' या तयारींत डोळे झांकून बसलेले! ध्रुपद, ख्याल, दादरे, गझल, ठुमरी हे गायनांतील सर्व प्रकार गाण्यांत दोघेहि वाकबगार, तर मंजीखाँ मराठी बोलतां येत असल्यामुळें, भावगीतासारखा नवा प्रकार गाऊनहि त्यांत उच्च आदर्श निर्माण करण्यांत चतुर! फैयाजखांनीं उत्तमोत्तम रागांत ढंगदार चिजा बांधल्या, तर मंजीखाँनी स्वामिभक्तिपूर्ण व देशभक्तिपर कवनें रचलीं. ही तुलनात्मक चर्चा केल्यावर सरसनीरस ठरविण्याचें कार्य 'जिसकी उसकी पसंद' या न्यायावर सोंपवितों.

खाँसाहेबांच्या घराण्याचें गाणें ध्रुपदधुमार, ख्याल व होरीचें आहे. त्यांची डागोरीवानी आहे व हनुमंत मत आहे; त्यामुळेंच खाँसाहेबांचें गाणें ऐकतांना वृत्ति उल्हसित होऊन अंगांत तरतरी येई. याच्या उलट अब्दुल करीमखाँचें गाणें ऐकतांना होई. त्यांची गोहरणवानी करुणरसात्मक असल्यामुळें खाँसाहेबांचे गाणें ऐकतांना मनुष्य बेचैन होई. मंजीखाँच्या घराण्यांत ठुंबरी गात नाहींत; पण ते स्वतः मात्र फार रसीली ठुंबरी गात. तींत शब्दाचा सार्थ व स्पष्ट उच्चार, मुरकी, खटका, स्वरावरील कंप, आंदोलन वगैरे सर्व रसपरिपोषक मालमसाला असे. फक्त इतर ठुंबरीगायकांपेक्षां ठुंबरीचें ध्रुपद दुगणींतून गातांना तयार तानेची ते खूप तऱ्हेवार फिरत करीत. उल्हसित वृत्तीच्या ठुंबरीला ही तयार तान शोभे, परंतु करुणरसपूर्ण ठुंबरीला ती शोभत नसे. तान हा गायनांतील अलंकार उल्हसित वृत्तीचा किंवा वीरवृत्तीचा परिपोषक आहे असें विचार केल्यास आढळून येईल. करुण रसाला मींड, हलते स्वर, नाजूक कंप, स्वरभरणा व आकुंचन ( Modulation ) या साधनांचा खरा उपयोग होतो. जेथें भावना गतिमान् असेल तेथेंच तानांचा उपयोग सार्थ ठरतो. 'पियाके मिलनकी आस' गात असतांना तानेचा वर्षाव रसहानीच करील.

## खाँसाहेबांच्या घराण्यांतील कांहीं सुंदर चिजा

खाँसाहेबांच्या घराण्याची गायकी पेंचदार व अवघड आहे. मालश्री, जयतकल्याण, देसकार, हिंदोल, यांसारखे ओडव राग, वक्र स्वरांनीं युक्त असलेले जयजयवंती, नायकी कानडा, शहाणा, यांसारखे राग, बसंतबहार, बसंतकेदार, काफी कानडा, बागेश्री कानडा, हेमनट, हेमकल्याण, सावनीकल्याण, नटबिहाग, खट, नंद, यांसारखे मिश्र राग हे त्यांच्या घराण्यांतील खास हक्काचे राग होत. नंद, बिहागडा, खोकर, देशी, तिलककामोद, देस, गौरी, पूर्वी, पूर्वकल्याण, यांसारखे गोड व रंजक रागहि त्यांच्या घराण्यांत आहेत. यांमधील तिलककामोद व खोकर रागांतील त्यांच्या घराण्यांतील चिजा चालीच्या रूपानें मराठी रंगभूमीवर आल्या आहेत. 'नाथ हा माझा', 'मम सुताची ठेव देवा' (स्वयंवर), 'हा हिणवाल जरी फार' (द्रौपदी), हीं तीं तीन पदें होत. यांपैकीं पहिलीं दोन बालगंधर्वांनीं गाऊन अजरामर केलीं आहेत. वरील ओडव, वक्र व मिश्र राग गावयाला कुशाग्र बुद्धीची व गळ्याची जितकी तयारी पाहिजे, तितकाच त्या रागनियमांचें ज्ञान असलेला स्वरज्ञानी व ते नियम तंतोतंत पाळून त्यांचा विस्तार करून दाखविणारा विद्वान् रागी तालीम देण्यास असणें

आवश्यक आहे. एरव्हीं गळा खूप तयार असला, पण रागनियम पायदळीं तुडविले जात असले, तर ती घराण्याची अवघड व पेंचदार गायकी नव्हे आणि विद्वत्ता तर नव्हेच नव्हे. स्वरज्ञानाशिवाय व त्याच्या आधारानें केलेल्या मेहनतीशिवाय हे कठिण राग आळविणें व त्यांचा अवघड पण वैचित्र्यपूर्ण विस्तार करणें कसें साधणार ? या रागांतील या घराण्याच्या चिजांचे मुखडे सुंदर व आकर्षक आहेत. त्यांची रचना प्रासादिक आहे. त्यांची स्वररचना रागवाचक असून त्यांत रचनासौंदर्य व ढंग भरपूर दिसतो. रा. टेंबे यांनीं रेकॉर्ड्‌स्‌मध्यें वाजवून अजरामर केलेली यमनकल्याणांतील 'प्यारी जिन छुवा' ही चीज याच घराण्यांतील असून वर उल्लेखिलेल्या तीन चिजा यांच्या घराण्यांतील सुंदर चिजांचे नमुने म्हणून सादर केले आहेत. कांहीं चिजा यांच्याच पूर्वजांनीं रचल्या आहेत, तर कांहीं दुसरीकडून घेतल्या आहेत.

खाँसाहेबांनीं स्वतः कांहीं गीतें व गझल रचले आहेत. कोल्हापुरच्या कै. राजाराममहाराजांवर त्यांनीं मराठींत दोन कवनें केलीं आहेत. चरख्याच्या पराक्रमावर स्वतः रचलेलें एक सुंदर गीत त्यांनीं १९३० सालीं स्वदेशीच्या चळवळींत मुंबईला व्हॅव्हॅदरकी लॉजमध्यें स्वतः गाऊन दाखविलें होतें. 'चरखेक करामतसे लेंगे स्वराज्य लेंगे' हे त्या हिंदी गीताचे पहिले शब्द मला आठवतात. प्रभातफेरींतील मुलांमुलींना त्यांनीं स्वतः तें पद शिकविलें होतें; आणि त्यामुळें तें फारच लोकप्रिय झालें होतें.

## अद्वितीय भावगीतगायक

मंजीखाँ रसिक वृत्तीचे असल्यामुळें शास्त्रीय गायनाइतकीच ललितगायनाचीहि त्यांना आवड होती. संगीतांतील सर्व प्रकारच्या रंगांमध्यें ते स्वतः रंगून जात असल्यामुळें त्या त्या प्रकारच्या श्रोत्यांना ते रंगवून सोडीत. मराठींतील 'कोकिले ऐकव तव मधु बोल', 'कन्हय्या बजाव बजाव मुरली' यांसारख्या कांहीं नामांकित कविता ते फार रसाळ म्हणत असत. माधव ज्यूलियनची वरील पहिली कविता मुंबई—म्यूझिक—सर्कलमध्यें १९३० सालीं एक तासभर गाऊन त्यांनीं श्रोत्यांना स्थानबद्ध करून ठेवलें होतें. भावगीतगायनाकडे तुच्छतेनें पाहणारे त्या वेळचे सर्कलचे सेक्रेटरी रा. गोविंदराव मुळे या 'कोकिले'नें इतके मन्त्रमुग्ध झाले होते कीं स्वतःच्या घड्याळावरहि त्यांचा विश्वास बसेना. इतकें भावनापूर्ण व रसाळ काव्यगायन ऐकून गोविंदराव जोशांच्या जमान्यांत स्वतः जन्माला आल्याबद्दल दैवाला दोष देणारे माझ्या माहितीचे एक कॉलेजांतील तरुण मंजीखाँवर इतके बेहद्द खुष झाले कीं त्या उल्हासाच्या भरांत त्यांनीं आणखी एक कविता म्हणण्याची खाँसाहेबांना फर्माइश केली. तेव्हां खाँसाहेबांनीं गोविन्दाग्रजांची 'मुरली' सुरू केली; आणखी एक तास पाहतां पाहतां कसा गेला हेंहि श्रोत्यांस समजलें नाहीं. गवई असून ही दृष्टि व हें कसब खाँसाहेबांनीं कोठून पैदा केलें याचा त्या वेळीं सर्वांनाच अचंबा वाटला. मुसलमान गवई आणि मराठींत काव्यगायन ! अचंबा करण्यासारखी गोष्ट नव्हे तर काय ? पुण्यास **भारतगायन समाजाच्या** मदतीकरितां जलसा झाला, त्यावेळीं ही मुरली ऐकून श्रोत्यांच्या डोळ्यांतून अश्रू बाहेर पडले होते, असें सांगतात. खंबावतीमध्य या कवितेला अगदीं सोपी रसाळ चाल त्यांनीं लाविली होती. एके दिवशीं आम्ही मलबार हिलवर बसलों असतांना खाँसाहेबांनीं 'ही कविता कोणाची ?' असें विचारून एक नवीनच कविता म्हणून दाखविली. चाल अगदीं अन्तःकरणाला भिडणारी होती. ती अशीः—

'घेउनि अपुलीं चिमणीं बाळें.' चाल त्यांनीं स्वतःच लावली असल्यामुळें मला विशेष कौतुक वाटून त्या कवितेचा तलास आम्हीं सुरू केला आणि तो गिरीश कवि सांपडलाहि. "मासिक मनोरंजनाचा एक जुना अंक माझ्याजवळ पडला होता. पहिल्याच पानावर ही कविता होती. पण कवीच्या नांवाच्या जागींच कागद फाटल्यामुळें मला जिज्ञासा वाटली; कारण कविता मला फार आवडली. आणि म्हणूनच आज दोन दिवस







मी ती गातों आहें," असें ते म्हणाले. यानंतर दोन वर्षांनीं एका मैफलींत मीं त्यांना ती कविता म्हणावयाचा आग्रह केला. डेक्कन कॉलेजचें तें शेवटचें स्नेहसंमेलन होतें. कॉलेजच्या मुलें 'मुरली' ऐकून अगोदरच खुष झालीं होतीं. तिच्यावर, हें भावगीत अत्यंत करुण वाणीनें व स्वरांनीं म्हणून खाँसाहेबांनीं कळस चढविला. अजूनहि ती 'रात्र' आणि तीं 'चिमणीं बाळें' माझ्या अंतःकरणांत घर करून आहेत. या कवितेच्या गायनाचा मलबारहिलवर पहिला श्रोता मी होतों याबद्दल मला अभिमान वाटतो, तो या कारणामुळेंच! या कवितेचें पालुपद 'किती करूं विनवणी' ते इतके आळवून आणि पिळवटून म्हणत कीं दगडाच्या अंतःकरणालाहि पाझर फुटावा! खाँसाहेबांचे मराठी उच्चार किती शुद्ध व सार्थ असत याचा अनुभव हीं भावगीतें ऐकतांना मला नेहमीं येई. कित्येकदां आमच्याच लहानशा कंपूत त्यांनीं 'मानापमानां'-तलीं 'चंद्रिका ही जणूं', 'भालीं चंद्र असे' 'प्रेम सेवा', हीं गाणीं मुद्दाम म्हणून दाखवावीं. "मैफलींत मात्र म्हणण्याचा आग्रह करूं नका हं!" असें ते बजावत असत.

खाँसाहेबांचे आवडते राग म्हणजे देशी, खट, नंद, नटबिहाग, छायानट, खंबावती, मियाँकी तोडी इत्यादि होते. देशींतील आवडती चीज म्हणजे 'बेगी बड दे' ही होती. एकदां अबदुल करीमखाँ व मंजीखाँ यांचें आलटून पालटून गाणें झालें. त्या वेळीं म. रहिमतखाँ हजर होते. तेव्हां ते म्हणाले, "तुम छोटे हो, मगर बहोत बडा गाना गाते हो!"

खाँसाहेबांना 'तराणे' आवडत नसत. ते म्हणत, "हल्लींचे हे अर्थहीन तराणे फारसींतील तराण्यांचे अपभ्रंश आहेत; ते मला आवडत नाहींत. मला नटनारायण रागांतील एकच अर्थपूर्ण तराणा येतो व तेवढाच मी गातों. ग्रामोफोनमध्यें दिलेले तराणे म्हणजे अर्थहीन बडबड आहे." असें ते हंसून म्हणत.

कै. भास्करबुवा, रहिमतखाँ, वझेबुवा इत्यादीं-च्या गायनाबद्दल त्यांना फार आदर असे. "भास्करराव और वझेबुवा जैसे गवैय्ये बहोत कम हैं" असें ते म्हणत. "हमीर, बिहागां-सारखे प्रचलित रागच अतिशय ढंगानें व तऱ्ह-तऱ्हेनें गाणारे भास्करबुवांसारखे गवई म्हाताऱ्या जुन्या गवयांतहि सांपडावयाचे नाहींत," असें ते फार अभिमानानें व किंचित् सिरिकलपणें म्हणत, तर 'मल्हार ऐकावयाचे असतील तर वझेबुवांचेच ऐकावे' असें आदरानें म्हणत. भास्करबुवांनीं 'बडेमियां'ची केलेली सेवा पाहून तर खाँसाहेब आश्चर्यानें थक्कच झाले! एक नामांकित तयार हिंदु गवई आपल्या गुरूची इतकी सेवा करितो ही आश्चर्य वाटावयाला लाव-णारीच गोष्ट होती.

खाँसाहेबांचें काव्यगायन ऐकल्यावर काव्य व त्याचें गायन यांविरुद्ध घेतले जाणारे आक्षेप आपोआपच गळून पडत. काव्यगायनांतील वाईट नमुने वारंवार कानीं पडल्यामुळेंच हे आक्षेप निर्माण झाले होते. अर्थात् ते एकेरी व असमंजस-पणाचे होते. खऱ्या कलावंताला गायनांतील कोणतेंहि क्षेत्र अयोग्य किंवा कमीपणाचें वाटत नाहीं. त्या सर्वांत त्याची प्रतिभा मोकळेपणानें विलास करते, व त्यांतहि आपला दर्जा उच्च राखते. खाँसाहेब ख्यालाप्रमाणेंच ठुंबरी, भजनें, गझल, भावगीतें तितक्याच कलपकतेनें व भावपूर्ण म्हणत. ज्ञानेश्वरीमधील निवडक ओव्यांनाहि उत्तम चाली लावून मला त्यांनीं त्या म्हणून दाखविल्या होत्या.

गोविंदाग्रजांच्या 'मुरली'मधील 'प्रीति, भक्ति व मुक्ति' या तीन अवस्था रसिक वाच-कांना परिचित आहेतच. त्यांतील पहिल्या अवस्थे-मधील खाँसाहेबांचें गायन अत्यन्त समजून व रसपूर्ण होई; पण पुढील दोन परिणतावस्थांचें प्रकटीकरण त्यांना यथायोग्य साधत नसे, हा माझा त्यांच्या या कवितेच्या गायनावरील आक्षेप होता. त्यांची तयार व अतिरिक्त तानबाजी भक्ति व मुक्ति या कल्पनांना विघातक ठरे. यासंबंधीं मीं त्यांच्याशीं पुष्कळ चर्चा केली होती. माझें म्हणणेंहि त्यांना पूर्णपणें पटलें होतें व तदनुसार ते आपल्या गायनांत फरकहि करणार होते. परंतु

मला तें ऐकण्यापूर्वीच अन्य ठिकाणीं व्यवसाया-करितां जावें लागल्यामुळें तो लाभ झाला नाहीं.

### खाँसाहेबांवरील एका खोट्या प्रवादाचें निराकरण

खाँसाहेबांवरील माझा एक लेख १९३१ सालीं प्रसिद्ध झाला. त्या वेळीं त्यांच्या विरोधकां-मध्यें फारच खळबळ उडाली होती. त्यांतील एकानें अभावितपणें "खाँसाहेब घराण्याचें गाणें गात नाहींत; हें सर्व खोटें लिहिलें आहे" असें मला पटविण्याचा खूप प्रयत्न केला. त्याचें म्हणणें मीं निमुटपणें सर्व ऐकून घेतलें; परंतु हा प्रवाद खराखोटा ठरविण्याचा प्रसंग १९३५ सालीं एका सुप्रभातीं दैवानेंच आणून दिला. माझ्या एका स्नेह्यानें त्या दिवशीं खाँसाहेब अल्लादियाखाँचें गाणें लक्ष्मीबाग हॉलमध्यें केलें होतें. त्यांच्यामागें मंजीखाँ व खाँसाहेबांचे बंधु हैदरखाँ साथीला बसले होते. म्हातारपणामुळें बारा वाजेपर्यंत बऱ्या खाँसाहेबांचा आवाज लागेना; पण मंजीखाँ व हैदरखाँ फारच सुरेल गाऊन साथ देत होते. खाँसाहेबांनीं आपल्या गायनांत टाकलेल्या सवा-लांचे जबाब मंजीखाँ देत होतेच; पण स्वतःहि घराण्यांतील अस्सल पेंचदार फिरती आणि बोल-ताना सफाईनें घेऊन "आपण याच घराण्यांतील अस्सल गायक आहों" हें वेळोवेळीं सिद्ध करीत होते. ह्या मैफलींत वरील आक्षेप घेणारे गृहस्थ हजर असून शिरस्त्याप्रमाणें बडेमियाँसमोरच बसले होते. कॉफीपानाच्या वेळीं मीं मुद्दाम त्यांना हटकलें: "मंजीखाँ वडिलांचीच गायकी गात आहेत, कीं दुसऱ्या कोणाची, तें आज तपासून घ्या !" स्वारी थोबाडींत मारल्यासारखी चूप निघून गेली.

अशीच समजूत मुंबईतील अल्लादियाखाँ-साहेबांच्या एका शिष्यिणीची या लोकांनीं करून दिली होती. परन्तु एका रात्रीं ब्लॅव्हॅट्स्की लॉज-मध्यें कशाच्या तरी मदतीकरितां मंजीखाँचा जलसा होता. तेथें ही गायिका कुतूहलानें मुद्दाम त्यांचें गाणें ऐकावयास आली होती. त्या रात्रीं खाँसाहेबांचा बसन्त-केदार ('अत्तर-सुगंध') इतका सुंदर रंगला कीं ती हें गाणें ऐकून चकितच झाली. नन्तर दुसऱ्या दिवसापासून तिचें 'घरीं येऊन जाण्या'चें निमन्त्रण मंजीखाँना येऊं लागलें. मंजीखाँ जाईनात. शेवटीं एके दिवशीं, त्या गायिकेनें आपली गाडी पाठविली तेव्हां खाँसाहेबांना शिष्टाचाराकरितां जाणें भाग पडलें. गायिकेनें पुढें होऊन त्यांचें स्वागत केलें व तंबोरा त्यांच्या पायांपाशीं ठेवून, "आपल्या-पाशीं मला शिकावयाचें आहे, शिकवा," अशी विनंति केली. "मी तुमच्यासारख्या लोकांना शिकवीत नसतों. त्याशिवाय ज्या समुद्रांतून तुम्हांला आकंठ विद्या मिळाली आहे, त्यांतून आम्हांला फक्त चार थेंब मिळाले आहेत. तो समुद्र तुमच्याजवळच आहे; आम्ही त्यांच्यापेक्षां जास्त काय शिकविणार ?" असें स्पष्टपणें खरें उत्तर देऊन खाँसाहेब निघून आले. ही हकीकत त्यांनीं स्वतः मला सांगितली. वडिलांबद्दलचा राग या उद्गारांत ठासून भरला होता.

### खाँसाहेब हे मनाचे निष्कपटी

१९३० ते १९३५ पर्यंत खाँसाहेबांनीं आपल्या गाण्यानें मुंबई गाजविली. विठ्ठलदास शेठ यांनीं नानाशंकरशेठ-हॉलमध्यें त्यांचे ओळीनें सोळा जलसे केले. निरनिराळ्या वेळचे राग श्रोत्यांना ऐकावयास मिळावे म्हणून त्याप्रमाणें मैफलीच्या वेळा ठेवल्या होत्या. अपेक्षेच्या मानानें त्यांतील फारच थोड्या रंगल्या. याचें कारण येव-ढेंच कीं, या वेळीं ज्या जबाबदारीची जाणीव खाँसाहेबांना कटाक्षानें असावयास पाहिजे होती ती नव्हती. त्याशिवाय कलावंताला कीर्तीचा मद पचविणें कठिण पडतें असें म्हणतात तेंहि खरें अस-ल्याचा अनुभव आला. याबद्दल खाजगी संभाषणांत चर्चा चालू असतांना स्नेही या नात्यानें आम्हीं खाँसाहेबांची भीड न धरतां खूपच हजेरी घेतली. पहिल्यानें ते ताठरच होते; पण आम्हीं सर्वच एकमतानें त्यांना पुराव्यासकट पटविलें, तेव्हां त्यांना कबूल करणें भागच पडलें. या जलशापूर्वीं पुष्कळशा रागांची मेहनतपूर्वक उजळणी कराव-यास पाहिजे होती, ती त्यांनीं केली नव्हती. जे







राग सरावांत होते तेवढेच चांगले रंगत; परंतु जे सरावांत नव्हते त्या रागांच्या गायनांत दडपादडपी, हुकुमीपणाचा अभाव, रागाचें अशुद्ध स्वरूप इत्यादि त्यांच्या गायनांत सहसा दिसून न येणाऱ्या गोष्टी दिसूं लागल्या. जलशाआधीं अवश्य असणारी विश्रांति ते घेत नसत. मग अभ्यास कोठला ! आमच्या वरील टीकेचा परिणाम चांगलाच झाला. कारण, पुढें मद्रासच्या सफरींत व कोल्हापुरच्या सहा जलशांत ते फार चांगले गायले असें मला स्वतंत्रपणें तिऱ्हाइतानें सांगितलें होतें.

याच प्रसंगीं त्यांनीं गायिलेल्या एक दोन रागांचीं उदाहरणें देऊन 'तुम्हीं चिजांत व्यक्त होणारें रागाचें स्वरूप सोडून ते कसे चुकीनें गाइले' याची चर्चा आम्हीं सुरू केली. पहिल्याप्रथम ते फारच गरम झाले; कारण, मला वाटतें अशा तऱ्हेनें त्यांच्याविरुद्ध ह्या वेळपर्यंत असा आक्षेप कोणीं घेतला नसावा, किंवा अशा चर्चांची त्यांना संवय नसावी. आम्हीं त्याच चिजांचे अस्ताईअंत्रे म्हणून या गोष्टी अत्यंत शांतपणें पुराव्यासकट सिद्ध केल्यावर ते बरेच नरम आले व मग सरळ मनानें त्यांनीं आपल्या चुका कबूल करून त्या सुधारण्याचें वचनहि आम्हांला दिलें. "रागरागिणींचे नियम तुमच्याच पूर्वजांनीं ठरविले आहेत, आणि महत्वाची गोष्ट अशी कीं त्या चीजा रचतांना रागाचा आरोहावरोह, त्याचे वादीसंवादी व त्याचें एकंदर स्वरूप ज्यांत स्पष्ट होतील अशा ठेवणीनेंच त्यांनीं अस्ताईअंत्रे रचलेले असतांना, तुम्हीं, त्यांच्या वंशजांनींच ते अस्ताईअंत्रे गातांना तिकडे साफ डोळेझांक करावी व त्या नियमांचें स्वतः उल्लंघन करून रागस्वरूपें बिघडवून आपलीच परंपरा मोडावी, हें जबाबदारीचें, विद्वत्तेचें वा गवईपणाचें लक्षण आम्ही समजत नाहीं. सरळ जिवनपुरी गाऊन गांधारी म्हणून नांव सांगावयाचें, नायकी कानड्यामध्यें शुद्ध धैवताचा प्रयोग मनाला येईल तसा करावयाचा, काफीकानड्यामध्यें कानडाच नसावयाचा, बिभासामध्यें मध्य सप्तकांत कोमल रिषभ घ्यावयाचा आणि तारसप्तकांत आरोहावरोहांत तीव्र रिषभ लावावयाचा, हे सर्व प्रकार आम्हीं विद्वत्तापूर्ण शुद्ध गायकीचें लक्षण समजावयाचें कीं काय ? " अशा आशयाचें आमचें म्हणणें ऐकल्यावर त्यांना तें पूर्णपणें पटलें. मनानें निष्कपटी व सरळ असल्यामुळें स्नेह्याच्या हक्काच्या जोरावर आम्हीं हा वाद त्यांच्याशीं केला. पुढें व्यवसाय वेगळ्या ठिकाणीं पडल्यामुळें त्यांनीं आपल्या गायनांत काय सुधारणा केल्या हें ऐकावयास पहिल्यासारख्या त्यांच्या आमच्या गांठीभेटी होत नसत आणि—

एके दिवशीं अकस्मात् कळलें कीं खाँसाहेब एकाएकीं मेंदूत रक्तस्राव होऊन वारले. एक चांगला कलावन्त व स्नेही अंतरल्याचें आम्हांला भयंकर दुःख झालें. मरहूम अल्लादियाखाँनंतर या घराण्यांतील औरस संततींतील प्रथम श्रेणींतले रसीले गायक मंजीखाँ हे शेवटचेच म्हणावयाचे ! शेंकडों वर्षांची अखंड परंपरा खंडित झाली ! !

---

## चुकीची कबुली—

आपल्या चुकीची कबुली ही केर काढणाऱ्या केरसुणीसारखी आहे. तिच्या योगानें आपली मनोभूमिका पूर्वीपेक्षां अधिक शुद्धच होते.

— महात्मा गांधी








# ‘ सर्वोदय समाज ’—पार्श्वभूमि व वैशिष्ट्य

श्री. ह. कृ. मोहनी

महात्मा गांधीजींच्या अमानुष वधानंतर वर्धा येथें १३ मार्चला हिंदुस्थानांतील रचनात्मक कार्यकर्त्यांचें एक संमेलन भरविण्यांत आलें. ह्या संमेलनांत जे निर्णय घेण्यांत आले ते आतां ठरावांच्या रूपानें जनतेपुढें आलेले आहेत. ह्या ठरावांमध्यें ‘ सर्वोदय–समाज ’ बनविण्याबद्दल एक ठराव आहे. आणि तोच ठराव ह्या संमेलनाचा मुख्य निष्कर्ष आहे असें म्हणतां येईल.

हें संमेलन गांधीसेवासंघाच्या चिटणिसांकडून बोलावण्यांत आलें होतें. आणि म्हणून गांधीसेवासंघामध्यें जे पूर्वीचे सदस्य, सहयोगी व संबंधित म्हणून परिचित कार्यकर्ते होते, त्यांनाच चिटणिसांकडून संमेलनासाठीं निमंत्रण गेलें होतें. गांधीसेवासंघाशीं निगडित असे जे कार्यकर्ते हिंदुस्थानभर विखुरलेले आहेत, त्यांनीं एकत्र येऊन सध्यांच्या कठिण परिस्थितींत विचार-विनिमय करून वाटल्यास कांहीं निर्णय घ्यावे असा सध्यांच्या गांधीसेवासंघांतील अत्यंत थोड्या उर्वरित सभासदांचा इरादा होता. आणि म्हणून चिटणिसांकडून हें निमंत्रण कांहीं विशिष्ट हेतूनें देण्यांत आलें होतें. हिंदुस्थानांतील महत्त्वाच्या सर्वच गांधी–विचाराच्या लोकांस एकत्र आणावें व त्यांनीं जाहीर रीतीनें व औपचारिक पद्धतीनें सद्यःस्थितींत निर्णय घ्यावे असा संमेलन बोलावण्याचा उद्देश नव्हता आणि म्हणून ह्या संमेलनास औपचारिक व सार्वजनिक महत्त्व होतें असें म्हणतां येणार नाहीं. हें एक औपचारिक, खासगी, गांधीसेवासंघ ह्या संस्थेच्या दृष्टीनें कौटुंबिक स्वरूपाचें संमेलन होतें असें ह्या संमेलनाचें वर्णन करतां येईल. मर्यादित संख्येच्या चालकांच्या परिचयाच्या कांहीं निमंत्रित लोकांसाठींच हें संमेलन भरविलेलें होतें. आणि तीन दिवसांच्या विचारविनिमयानंतर ह्या संमेलनांत जे निर्णय घेण्यांत आले त्यांचें स्वरूप पाहतां ते एका तऱ्हेनें मुग्ध, अस्पष्ट व संदिग्ध आणि हिंदुस्थानांतील विचारी लोकांच्या दृष्टीनें पाहतां कांहींसे असमाधानकारक आहेत असेंहि अनेकांस वाटण्याचा संभव आहे.

## संमेलनाची पार्श्वभूमि

ह्या मार्चमध्यें भरलेल्या संमेलनाची पार्श्वभूमीहि लक्षांत ठेवणें जरुरीचें आहे. फेब्रुवारीच्या तीन तारखेस गांधीसेवासंघाच्या तर्फे कांहीं महत्त्वाच्या रचनात्मक कार्यकर्त्यांचें संमेलन सेवाग्रामला भरविण्याचें मुक्रर झालेलें होतें. ह्या संमेलनास महात्मा गांधी हजर राहतील असें संमेलनाचे चालक निश्चितपणानें धरून चालले होते. ह्या संमेलनांत गांधीसेवासंघाशीं संबंध असलेल्या महत्त्वाच्या कार्यकर्त्यांस सद्यःस्थितींत गांधीजींकडून प्रेरणा, दिग्दर्शन व पुढील कार्याची चालना मिळेल अशी अपेक्षा बाळगण्यांत आलेली होती. प्रस्तुत परिस्थितीमध्यें मध्यंतरीं स्थगित झालेल्या गांधीसेवासंघास गांधीजींच्या आदेशानुसार पुनरुज्जीवित करावें कीं काय असाहि विचार त्या वेळीं संमेलन बोलावणाऱ्या चालकांच्या मनांत घोळत होता. विशेषतः कॉंग्रेसचे सरचिटणीस श्री. शंकरराव








देव ह्यांना व गांधीसेवासंघाचे चिटणीस आणि कॉंग्रेसच्या ऑल इंडिया विधायक कार्यसमितीचे सेक्रेटरी श्री. रघुनाथराव धोत्रे यांना सद्यःस्थितींत खुद्द गांधीजींकडून त्यांस जरूर वाटत असलेला नवीन प्रकाश मिळेल अशी अपेक्षा त्यांनीं बाळगलेली होती आणि म्हणून कांहीं निवडक कार्यकर्त्यांचें फेब्रुवारीमध्यें असें संमेलन बोलावण्यांत त्यांनीं पुढाकार घेतलेला होता. गांधीजींनीं ह्या संमेलनास हजर राहण्याचें कबूलहि केलें होतें. परंतु गांधीजींच्या मृत्यूमुळें हें फेब्रुवारीमधील संमेलन भरविणें अर्थात्‌च शक्य झालें नाहीं.

फेब्रुवारीमध्यें निवडक कार्यकर्त्यांचें असें संमेलन भरविणें अनेक कारणांमुळें जरूर झालें होतें. गांधी–विचारसरणीचे, गांधींजींचा दृष्टिकोन पुढें ठेवून कार्य करणारे हिंदुस्थानभर जे अनेक निष्ठावंत कार्यकर्ते आहेत त्यांना सद्यःस्थितींत आपल्या विचाराची दिशा निश्चित करणें अत्यंत अगत्याचें झालेलें आहे. गांधीजींनीं गेलीं २५।३० वर्षें राजकारणामध्यें अहिंसेचें तत्त्व प्रस्थापित करून जी सत्याग्रहाची शिकवणूक राष्ट्रास दिली, त्या शिकवणुकीची दिशा स्वातंत्र्यप्राप्तीनतर कशी आंखावयाची; जें मध्यवर्ती स्वराज्य–सरकार हिंदुस्थानांत अहिंसात्मक चळवळीनंतर प्रस्थापित झालें आहे, त्या सरकारास अहिंसात्मक राजकारणाचें ध्येय मान्य असलें तरी अहिंसात्मक राजकारणास सद्यःस्थितींत कशी व कितपत मुरड घालावयाची; गांधी–विचाराच्या निष्ठावंत कार्यकर्त्यांनीं पाकिस्तानांत व हिंदुस्थानांत उत्पन्न झालेल्या हिंदुमुसलमानांच्या अत्यंत बिकट अशा अननुभूत समस्येबाबत कोणत भावी क्रियात्मक धोरण अवलंबावयाचें; गांधीजींच्या दृष्टिकोनाबरहुकूम आगामी काळांत आर्थिक नियोजनाचें तत्त्व कसें प्रस्थापित करावयाचें; गांधीजींच्या विचारसरणीस मनापुढें ठेवून लष्करी दृष्टीनें मध्यवर्ती व प्रांतिक सरकारांस कार्यक्षम कसें बनवायाचें अशासारखे अनेक मनाचा गोंधळ उडविणारे अत्यंत बिकट प्रश्न गांधी-विचारांच्या निष्ठावंत कार्यकर्त्यांपुढें गेल्या कांहीं महिन्यांत उभे राहिलेले आहेत.

देशव्यापी राजकारण करणाऱ्या कॉंग्रेस संस्थेचें स्वरूप स्वातंत्र्यप्राप्तीनंतर कसें राहावें, विधायक कार्यकर्त्यांनीं, विशेषतः गांधीजींच्या विचारांची कांस धरून कार्य करणारांनीं, कॉंग्रेस हा एक राजकारणी बलिष्ठ पक्ष बनल्यास, त्या पक्षांत राहून कार्य करणें योग्य आहे कीं त्यांनीं कोणत्याहि राजकीय पक्षाबाहेर राहून कार्य करणें देशास अधिक उपयुक्त ठरण्यासारखें आहे; गांधीमतानुसारी राष्ट्रसेवकांनीं कौन्सिलांतून कार्य करणाऱ्या कॉंग्रेसच्या पार्लमेंटरी सभासदांशीं संबंध कसे प्रस्थापित करावयाचे; त्यांनीं कायदेमंडळांतून कार्य करणें देशदृष्टीनें अधिक फायद्याचें आहे, किंवा कौन्सिलाबाहेरच राहून आपआपल्या विधायक प्रवृत्तींचें कार्य वाढविणें देशहितास पोषक ठरण्यासारखें आहे हे प्रश्न गेल्या दीड-दोन वर्षांत कार्यकर्त्यांचीं मनं अस्वस्थ करीत आहेत.

कॉंग्रेसची घटना बदलविण्याचा विचार गेले कांहीं महिने चालू आहे. गांधीजींनीं आपल्या मृत्यूपूर्वी लोकसेवक-संघांत कॉंग्रेसचें परिवर्तन करावें अशी योजना निश्चित केलेली होती; वर्किंग कमिटीनें त्या योजनेंत कांहीं फेरफार करून किंवा तिचें स्वरूप थोडेंफार बदलून ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभासदांपुढें ती कॉंग्रेसला इष्ट होईल अशा स्वरूपांत मांडलेली आहे. गांधीविचारसरणीच्या लोकांनीं आपलें धोरण ह्या कॉंग्रेसच्या लोकसेवासंघाबाबत कसें आंखावयाचें हाहि प्रश्न कार्यकर्त्यांपुढें निर्माण झालेला आहे.

फेब्रुवारीमध्यें भरविण्यांत येणाऱ्या संमेलनामध्यें ह्या अनेक प्रश्नांचा खल होऊन खुद्द गांधीजींकडूनच मार्गदर्शन मिळेल अशी गांधीसेवासंघाच्या चालकांची तीव्र अपेक्षा होती. ह्याच वेळीं गेल्या १५० वर्षांत इंग्रजांनीं किंवा पाश्चात्य संस्कृतीनें बनविलेल्या, आर्थिक केंद्रीकरणाच्या, सामान्य मनुष्याचें आर्थिक शोषण करणाऱ्या, अशा यंत्रप्रधान व भांडवलशाही नागर संस्कृतीस प्राधान्य न देतां, आर्थिक विकेंद्रीकरणावर आणि अहिंसात्मक ग्रामीण नवसंस्कृतीवर भर देऊन गांधीजींनीं गेल्या २५ वर्षांत जे रचनात्मक कार्य करणारे निरनिराळे संघ निर्माण केलेले आहेत








# 'सर्वोदय समाज'—पार्श्वभूमि व वैशिष्ट्य

त्यांचें एकीकरण करून त्यांचा एकजिनसी संमीलित संघ बनवावा असाहि निर्णय घेण्यांत आलेला होता. गांधीजींचें अहिंसात्मक शिक्षण देणारा तालिमी संघ, गांधीजींचें अर्थशास्त्र प्रसृत करणारा चरखासंघ, हिंदुस्थानांतील ग्रामीण जीवनास अहिंसात्मक संस्कृतीचें वळण लावणारा ग्रामोद्योगसंघ, एके काळीं अस्पृश्य समजले गेलेल्यांस हिंदु सवर्ण समाजांत अंतर्भूत करण्याची खटपट करणारा हरिजनसेवकसंघ, सेवाकार्यांत स्वाभिमान आणि आर्थिक स्वावलंबन निर्माण करणारा हिंदुस्थान-मजदूर-संघ, आणि कृषिशास्त्रांत नवचैतन्य पसरवूं पाहणारा गोसेवासंघ, अशा ह्या रचनात्मक कार्य करणाऱ्या अनेक संघांचा मिलाफ करण्याचें गांधीजींच्या आदेशानुसार ठरविण्यांत आलें होतें आणि असें एकीकरण करण्यानें कार्यकर्त्यांमध्यें नवीन हुरूप, जोम आणि एकविचार निर्माण होऊन सध्यांच्या राजकीय परिस्थितींत गांधीजींचें तत्त्वज्ञान पुढें ठेवून गेलीं २५ वर्षें समाजकारण करणाऱ्या लोकांस स्पष्ट दिशा मिळेल असें ह्या संघचालकांस वाटत होतें. सध्याच्या कॉंग्रेस-सेक्रेटरींच्या प्रयत्नांमुळें अखिलभारतीय विधायककार्यसमिति स्थापन होऊन त्यांनीं ह्या सांघिक एकत्रीकरणाची पूर्वतयारी गेल्या वर्षभरांत चालविलेलीहि होती. एकंदरींत राजकीय स्वराज्यप्राप्तीनंतर ह्या स्वराज्यास गांधीजीप्रणीत सांस्कृतिक धोरणाच्या रोखानें वळविण्याचें कार्य कसें करावें ही दिशा तीन फेब्रुवारीच्या संमेलनांत खुद्द गांधीजीच दाखवून देतील अशी आशा गांधीविचाराच्या प्रमुख कार्यकर्त्यांस वाटत होती.

मार्चमध्यें भरलेल्या गांधीविचाराच्या कार्यकर्त्यांच्या संमेलनाची ही अशी पार्श्वभूमि आहे. गांधीजींच्या अनपेक्षित व भयंकर मृत्यूमुळें गांधी-विचाराच्या कांहीं कार्यकर्त्यांनीं एकत्र येणें व सामुदायिक पद्धतीनें विचारविनिमय करणें अधिकच जरूर झालें. गांधीजींच्या हुतात्म्यास शोभणाऱ्या मृत्यूमुळें गांधीजींबद्दलची भक्ति अधिकच उफाळून देशभर उसळली आणि ह्या भक्तिभावनेमुळें गांधीविचाराचे प्रमुख लोक सद्यःस्थितींत कोणतें धोरण आंखतात, तें समजून घेण्याची उत्कंठा गांधी-विचाराच्या असंख्य लोकांच्या हृदयांत अनेक पटींनीं वाढणें साहजिकच होतें. आपणहि ह्या संमेलनाच्या कार्यास हातभार लावावा, आपणहि चर्चेंत व सल्लामसलतींत भाग घ्यावा असें हजारों कार्यकर्त्यांस वाटत होतें; आणि कांहीं मर्यादित लोकांस निमंत्रण देण्यांत यावयाचें ठरविल्यामुळें आणि गांधीजींच्या मृत्यूनंतर गांधीजींवर भक्ति ठेवणाऱ्या असंख्य लोकांच्या हृदयांत अनेकविध अपेक्षा निर्माण झाल्यामुळें, पुष्कळांची निराशाहि झाली. परंतु ही पार्श्वभूमि लक्षांत बाळगल्यास, गांधी-विचाराच्या देशभर पसरलेल्या कार्यकर्त्यांचें संमेलन बोलावण्याचा गांधी—सेवा—संघाच्या चालकांचा प्रथमपासूनच विचार नव्हता, हें ध्यानीं आणल्यास ही निराशा निष्कारण होती असें दिसून येईल.

## संमेलनप्रसंगीं पोलिसी बंदोबस्त

जातां जातां हेंहि नमूद केलें पाहिजे कीं, अहिंसात्मक कार्य करणाऱ्या लोकांच्या ह्या संमेलन-प्रसंगीं पोलिसी व लष्करी बंदोबस्त करणें गांधीजींच्या मृत्यूमुळें निर्माण झालेल्या प्रक्षुब्ध वातावरणामुळें आवश्यकच होतें. आणि महामंत्री पंडित जवाहिरलालजी हे संमेलनप्रसंगीं हजर राहणार असल्यामुळें हा कडक बंदोबस्त सद्यःस्थितींत अपरिहार्यच होता. विचार केल्यास गांधीवादी विचारसरणीच्या लोकांची ही तत्त्वच्युति होती असें वाटण्याचें कारण नाहीं. परिस्थितीचें सम्यक् ज्ञान आणि कार्यकर्त्यांना आपल्या अल्प अहिंसक शक्तीबद्दल वाटत असलेली जाणीवच ह्या बंदोबस्तामध्यें प्रतिबिंबित झाली होती असें म्हणतां येण्यासारखें आहे. शांतपणानें सध्यांच्या गंभीर परिस्थितीचा विचार केल्यास ही विसंगति वाटण्याचें कारण राहत नाहीं.

## विवशतेचें वातावरण

फेब्रुवारीचें संमेलन मार्चमध्यें झालें. गांधीजींच्या अभावीं हें संमेलन भरलें. संमेलन भरविणाऱ्यांवर असाधारण जबाबदारी पडली.








गांधीजींसारखा दिग्विजयी, अनन्यसाधारण, जागतिक संस्कृतींत महत्त्वाची भर टाकणारा युगपुरुष नष्ट झाल्यामुळें, त्यानें दिलेल्या प्रकाशामध्यें काम करणारे कार्यकर्ते कांहीं काळ तरी विवश बनले असल्यास त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पुढील मार्ग निश्चितपणानें, ठामपणानें व निडर वृत्तीनें ठरविणें हें कोणासहि अत्यंत कठिण आहे. आणि असा मार्ग सामुदायिक पद्धतीनें शोधून काढणें हा कालावधीनेंच ठरण्यासारखा प्रश्न आहे.

ह्या विवशतेचें कारण उघड आहे. गांधीजी हे अनन्यसाधारण, लोकविलक्षण, आसेतुहिमाचल पसरलेल्या ह्या अवाढव्य देशांतील जनतेचें समुत्थान घडवून आणणारे, अत्यंत प्रभावशाली असे नेते होते. कठिण प्रसंगांत त्यांचें अविचलित धैर्य, अद्वितीय धारणाशक्ति, असाधारण स्थितप्रज्ञता, आश्चर्यकारक प्रसंगावधान, हे गुण नवीन नवीन बौद्धिक व नैतिक मूल्यें निर्माण करण्यास समर्थ ठरलेले होते. त्यांची मोकळी पडलेली जागा घेणारा नेता हिंदुस्थानांत आज उपलब्ध नाहीं हें अगदीं सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट आहे. १५ वर्षांच्या परिश्रमानंतर सत्याग्रहाचें शस्त्र हें सध्यांच्या शास्त्रीय व यांत्रिक युगांतहि कार्यक्षम व सुपरिणामी आहे हें त्यांनीं सिद्ध केलें होतें. ह्या शस्त्राच्या बळावर अहिंसक समाज व नवीन आर्थिक क्रांति घडवून आणतां येण्यासारखी आहे, असा अपूर्व आत्मविश्वास त्यांना प्रतीत झाला होता. हिंदुस्थानास सत्याग्रहाच्या नवसंदेशाचा प्रकाश देणारा व हिंदुस्थानच्या सांस्कृतिक दीप्तीनें जगास उजळा देणारा हा सूर्य आतां अस्तंगत झाल्यामुळें, अनेक तेजस्वी ताऱ्यांनीं त्या सूर्यप्रकाशाचें कार्य होऊं शकत नाहीं. असामान्याची जागा अनेक सामान्य भरून काढूं शकत नाहींत. बुद्ध नाहींसा झाल्यानंतर संघास शरण जाण्यावांचून गत्यंतर राहत नाहीं हें खरें; परंतु गांधीजींसारख्या बुद्धाचा संघ त्यांच्या हयातींत देखील बनलेला नाहीं. असा संघ बनविण्याकडे त्यांची प्रवृत्तीहि नव्हती. अशा संघस्थापनेस त्यांना अनुकूल काल मिळालेला होता असेंहि म्हणतां येत नाहीं. गांधीजींचा मार्ग, दृष्टिकोन, त्यांचें सांस्कृतिक धोरण जरी त्यांना स्वतःला सुस्पष्ट असलें, तरी इतर शेंकडों व हजारों अनुयायांना ही मळलेली वाट आहे, असें बिनदिक्कत वाटण्याइतका आत्मप्रत्यय आलेला नाहीं. गांधीजींचे कित्येक सहकारी, अनेक वर्षें त्यांच्या बरोबर काम केलेले त्यांचे मित्र आणि त्यांच्या निकटचे अंतेवासी ह्यांस देखील गांधीजींनीं दाखवून दिलेल्या मार्गानें इतरांस अचूक मार्गदर्शन करण्याचें कार्य अत्यंत दुष्कर वाटत आहे.

## महत्त्वाच्या प्रश्नांवर अनौपचारिक ऊहापोह

काँग्रेसचे अध्यक्ष बाबू राजेंद्रप्रसाद, आचार्य कृपलानी, आचार्य काकासाहेब कालेलकर, तपस्वी विनोबा, डॉ. प्रफुल्लचंद्र घोष, कर्नाटकचे नेते श्री. दिवाकर, गांधीसेवासंघाचे अनेक वर्षांचे अध्यक्ष किशोरलालजी मश्रूवाला, श्री. शंकरराव देव, आचार्य जुगलकिशोर, गांधीविचाराचे अर्थशास्त्रज्ञ श्री. कुमाराप्पा, गांधीजींचे सेक्रेटरी प्यारेलालजी, श्री. जाजूजी, श्री. आर्यनायकम्, अशासारख्या अनेक गांधीजींना परिचित असलेल्या कार्यकर्त्यांनीं व तत्त्वविवेचक राजकारणी पुढाऱ्यांनीं अनेकविध रीतीनें दीर्घकाळ चर्चा केली. झकीर हुसेनसाहेब, देवदासजी गांधी, मौलाना अबुल कलाम आझाद, पंडित जवाहिरलालजी यांनीं देखील अनौपचारिक चर्चेमध्यें आपलें म्हणणें मांडलें. श्री. जयप्रकाश नारायण यांनींहि कांहीं भाग घेतला. आचार्य श्री. विनोबा ह्यांनीं आपली नेहमींची निवृत्तिप्रधान लोकविन्मुख मनोवृत्ति ह्या प्रसंगाचे महत्त्व जाणून कष्टानें बाजूस सारून ते चर्चेमध्यें पूर्णपणें सामील झाले. विनोबांनीं आपली गांधीविचाराबाबतची संशोधनात्मक व व्यक्तिगत तपस्येची भूमिका निराळी ठेवून आपल्या आचारांत सांधिक दृष्टीचें परिवर्तन घडवून आणण्यास आरंभ केला आहे असेंहि त्यांच्या चर्चेवरून वाटूं लागलें. श्री. विनोबांचा गांधी—तत्त्वज्ञान व तद्विषयक आचार ह्यांबाबत अधिकार








फार मोठा आहे, हें महाराष्ट्रीयांस तरी विशद करून सांगण्याची गरज नाहीं.

सद्य:स्थितींत सत्याग्रही शांतिसेना तयार केली पाहिजे आणि गांधीजींच्या सत्याग्रहशास्त्राचें संशोधन केलें पाहिजे; कठिण परिस्थितींत चिंतनात्मक निष्क्रिय शांत तपस्या हें देखील एक प्रकारचें कार्यच होऊं शकतें; आत्मचिंतनानें आपलें आयुष्य अहिंसात्मक दृष्टि ठेवून पुनः संशोधित केलें पाहिजे; अपरिग्रही व सत्त्वगुणी वृत्तीनें सामाजिक जीवनाची साधना करणाऱ्या लोकांचा संघ बनविण्यानेंच गांधीजींच्या कार्याची प्रगति होऊं शकते; ॲटमबाँबचा प्रतिकार करण्यास गांधीविचारसरणीचा आश्रय घेतल्या-शिवाय गत्यंतर नाहीं व त्या विचारसरणीनेंच फक्त अहिंसात्माक शोषणरहित समाज निर्माण होऊं शकेल; गांधीजींप्रमाणें आश्रयार्थी लोकांच्या प्रश्नामध्यें आणि हिंदु—मुसलमान—शीखांच्या एकीकरणाच्या समस्येमध्यें स्वतःची होळी करून घेण्याची तयारी केली पाहिजे; ह्याच सध्यांच्या महत्त्वाच्या प्रश्नामध्यें बलिदान केलें पाहिजे; गांधीजींच्या शिक्षणप्रणालीनुसार तरुण पिढीस शिक्षण देण्यानेंच हिंदुस्थानच्या लष्करी सामर्थ्याचा प्रश्न सुटण्यासारखा आहे;—हे मुद्दे काकासाहेब कालेलकर, विनोबा भावे, कुमाराप्पा, शंकरराव देव, प्रफुल्लचंद्र घोष, प्यारेलालजी, आर्यनायकम् यांनीं यथाक्रम पुढें केले आणि सद्य:स्थितीचें आपआपल्या स्वभावानुसार व अनुभवानुसार विवेचन केलें; गांधी-विचाराच्या लोकांस ज्या अडचणी व संदेह आहेत त्यांचा ऊहापोह तीन दिवस अनौपचारिक रीतीनें पुष्कळ झाला. बाबू राजेंद्रप्रसाद यांनीं आपल्या निराग्रही वृत्तीनें हें विशद केलें कीं जें स्वराज्य आपण कमावलें आहे तेंच सध्यांच्या आणी-बाणीच्या परिस्थितीमध्यें कायम ठेवणें ही कठिण गोष्ट झालेली आहे, लोकांचें चारित्र्य फार घसरलेलें आहे, पैशानें ज्यांना विकत घेतां येणार नाहीं असे लोक फार दुर्मिळ आहेत, अधिकार व पैसा ह्या बाबतींत ध्येयपरतेनें जे विन्मुख राहतील, अशा कार्यकर्त्यांची देशास अत्यंत जरूर आहे आणि म्हणून अशा लोकांचा एक संघ बनविणें ही आवश्यक अशी बाब आहे. जें मिळविलें आहे तें राखणें हें प्रथम कर्तव्य आहे.

## संघटना बंधनविरहित ठेवण्यावर भर

अपरिग्रही वृत्तीच्या गांधीवादी लोकांचा एक संघ बनवावा, ही धारणा जरी प्रथमदिनापासून अनेक कार्यकर्त्यांच्या मनांत घोळत असली, तरी सदस्यांस बंधनकारक असे नियम इतरांनीं बनवून सदस्यांकडून शिस्तीची अपेक्षा करणारा असा संघ बनविल्यास त्याचें अनुशासन कोणास तरी करावेंच लागणार, अनुशासनामुळें सांप्रदायिक-पणा व दलबंदी निर्माण होईल, अनुशासनाच्या कोणत्याहि पद्धतीमुळें हिंसावृत्ति जागृत होते आणि अधिकाराची अभिलाषा वाढत जाते, ह्या संघविषयक मूलभूत अडचणींमुळें आणि स्वतःच्या स्वभावाच्या मर्यादेमुळें विनोबा भावे हे कोणताहि शिस्तबाज जखडबंद असा संघ बनविण्यास अनुकूल झाले नाहींत. श्री. शंकरराव देव ह्यांनीं संघस्थापनेचा आग्रह धरला नसता आणि प्रफुल्लबाबू, श्री. दिवाकर, बाबू राजेंद्रप्रसाद यांनीं संघाच्या कल्पनेस पाठिंबा दिला नसता, तर 'सर्वोदय समाजा'चा हा ठराव देखील झाला असता कीं काय ह्याची शंका वाटते.

संघ बनविल्यास त्याचें पुढारीपण श्री. विनोबा ह्यांनीं घेतलें पाहिजे असा कल श्री. किशोरलालजी व श्री. जाजूजी यांनीं दाखविला; परंतु आचारात्मक कांहीं अटी पाळणारे असे सदस्य बनवून त्यांचें अनुशासन करावयास लागणाऱ्या वृत्तीचा अभाव आपल्या स्वभावांत कसा आहे हें श्री. विनोबांनीं स्पष्ट केल्यामुळें आणि अशा प्रकारच्या गांधीवादी विचाराच्या शिस्तबाज संघाचें स्थायी पुढारीपण व अनुशासन करण्यास ठराविक व्यक्ति पुढें न आल्यामुळें पूर्वीच्या गांधी—सेवा—संघासारख्या संघाची निर्मिति ह्या विधायक कार्यकर्त्यांच्या संमेलनांतून होऊं शकली नाहीं. श्री. विनोबांनीं कुंभमेळ्या-सारखा गांधीविचाराच्या लोकांचा मेळा भर-विण्याची योजना पुढें केली. हा मेळा स्वयंस्फूर्त








पद्धतीनें भरेल आणि त्यांत स्वेच्छेनें लोक समाविष्ट होऊं शकतील, गांधीविचाराचे लाखों लोक हिंदुस्थानांत पसरलेले आहेत, ते आपआपल्या इच्छेनें एकत्र आल्यास आणि त्यांनीं सामुदायिक शिस्त आपण होऊन निर्माण केल्यास त्यांतूनच अहिंसक समाजास पोषक असें खरें वातावरण निर्माण होऊन कार्य होऊं शकेल अशी विचारसरणि श्री. विनोबांनीं प्रसृत केली. विनोबांस बंधुभावना पाहिजे आहे, बंधभावना नको आहे. विनोबांस बाह्य प्रेरणा मानवत नाहीं, अंतःप्रेरणा मानवते. बाह्य, परिस्थितिप्राप्त (Objective) समतेपेक्षां आंतरिक मानसिक समता ( Subjective equality ) विनोबांना अधिक परवडते. एकंदरींत पाहतां विनोबांच्या वैशिष्टयपूर्ण व्यक्तित्वामुळें मेळयाची योजना पुढें आली; आणि प्रफुल्ल बाबू, शंकरराव, दिवाकर प्रभृति इतर नेत्यांच्या उपस्थितीमुळें संघाच्या कल्पनेस मूर्तता मिळाली, असें म्हणतां येण्यासारखें आहे. मौलानासाहेब व राजेंद्रप्रसाद यांनीं आपआपल्या स्वभावानुसार संघाच्या विचारास पाठिंबा दिला.

संघ असावा, कीं मंडल असावें, कीं समाज असावा ह्याचा देखील ऊहापोह झाला! नांव गांधीसंघ असावें, कीं सत्याग्रही मंडल असावें, कीं सर्वोदय–समाज असावें ह्या बाबतींतहि चर्चा झाली! नांवाच्या बाबतींतहि इतकी चिकित्साबुद्धि दाखविली गेली ह्याचें कारण हें आहे कीं सांप्रदायिकपणा आपल्या संघटनेमध्यें निर्माण न व्हावा अशी जागरूकता दाखविणारे प्रमुख लोक ह्या सेवाग्रामच्या संमेलनांत उपस्थित झालेले होते. संघाची गरज वाटणाऱ्या व्यक्ती आणि सांप्रदायिकतेचा व बाह्य शिस्तीचा निरास करणाऱ्या विनोबा, किशोरलालजी प्रभृति व्यक्ती यांच्या विचारांची तडजोड होऊन सर्वोदय समाजाचा हा ठराव झालेला आहे. आणि दर वर्षीं ३० जानेवारीस गांधीविचाराच्या लोकांचा एक मेळा भरवावयाचें ठरलें आहे.

सर्वोदय समाज हीं बंधनरहित अशी संघटना आहे. जे कोणी आपलीं नांवें सर्वोदय समाजाच्या यादींत समाविष्ट करितील ते त्या समाजाचे सभासद राहतील. आपल्या मनाची नैतिक प्रेरणा हेंच त्यांचें मार्गदर्शन करणारें बंधन त्यांना राहील. अनुशासनविरहित व स्वयंप्रेरित अशी ही संघटना आहे. सत्याच्या आणि अहिंसेच्या पायावर वर्गविहीन व शोषणरहित समाज बनविणें हा ह्या सर्वोदय–समाजाचा उद्देश आहे आणि गांधीजींच्या सर्व प्रकारच्या विधायक प्रवृत्तींस चेतना देणें ही ह्या समाजाची साधना आहे.

गांधीजींच्या व्यक्तित्वाचा व त्यांच्या विचाराचा परिणाम जगभर पसरलेला आहे. सर्वोदय-समाजाचें प्रस्तुत स्वरूप अत्यंत विरळ, स्वयंप्रेरित व मनःपूत असें असल्यामुळें असा समाज बनल्यास तो हिंदुस्थानपुरताच मर्यादित राहण्याची गरज नाहीं. ह्या समाजाची मांडणी यशस्वी झाली असें मानल्यास जागतिक क्षेत्रहि त्याच्यासाठीं खुलें आहे. ह्या समाजाचीं बीजें पसरविण्यास सर्व जग मोकळें आहे. दलबंदी, सांप्रदायिकता व बाह्य अनुशासन टाळल्यामुळें गांधीविचारामुळें उत्पन्न होणारा भ्रातृभाव सर्वत्र जगभर पसरलेला आहे असें भासूं शकतें. तथापि ह्या भ्रातृभावाच्या विस्ताराबरोबर कोणत्या तरी प्रकारची ध्येयपूर्ण घनता निर्माण करण्यांत अशा अनिर्बंध समाजाची यशस्विता अवलंबून आहे हेंहि समजण्यासारखें आहे.

### रचनात्मक कार्य करणाऱ्या अनेक संघांचा मिलाफ

सेवाग्रामच्या रचनात्मक कार्यकर्त्यांच्या ह्या संमेलनांत तालिमी संघ, चरखासंघ, हरिजन-सेवक संघ, हिंदुस्थानी मजदूरसंघ, ग्रामोद्योग-संघ, अशा इतर महत्वाच्या संघांचा मिलाफ करून त्यांचा एक प्रभावी संघ बनवावा असाहि ठराव झाला आहे. श्री. कुमाराप्पा यांनीं ग्रामसुधारणेची अहिंसकसंस्कृतिप्रधान अशी जी योजना बनविली आहे, तिला संमेलनांत मान्यता देण्यांत आली. निरनिराळया संघांचा हा संयोग करण्याचें पूर्वीच ठरलेलें असल्यामुळें ह्या बाबतींत कांहीं विशेष ऊहापोह करण्याची गरज पडली नाहीं.








# ‘ सर्वोदय-समाज ’— पार्श्वभूमि व वैशिष्ट्य

## अहिंसात्मक समाजरचनेचें पुसट रेखाचित्र

श्री. शंकरराव देव, आचार्य विनोबा, किशोरलालजी, श्री. कुमाराप्पा, श्री. कृष्णदासजी जाजू, आचार्य कृपलानी, संत तुकडोजी महाराज, यांनीं ठरावावर मुख्य व प्रभावी भाषणें केलीं. आचार्य कृपलानी यांनीं गांधीजी हे क्रांति करणारे महापुरुष असल्यामुळें विधायक कार्य करणाऱ्या लोकांनीं महात्माजींची क्रांतीची स्फूर्ति पुढें चालविणें कसें जरूर आहे हें क्रांतीचें तत्त्वज्ञान विशद करून श्रोत्यांस बजाविलें. गांधी हे नुसते परोपकारी(philanthropist) दयामय समाजसुधारक नसून समाज बदलविणारे, बलिदानास प्रतिक्षण तयार असलेले क्रांतिकारक हुतात्मे होते; त्यांच्यापासून बलिदानाची स्फूर्ति घेणाऱ्यांसच समाजोत्थानाचें कार्य घडवून आणतां येईल हें कृपलानी यांनीं आवेशानें प्रतिपादिलें. पंडित जवाहरलालजी यांनींहि प्रांजलपणानें व निर्व्याजतेनें असें सांगितलें कीं अशा समुदायाचे आपणहि एक अनुयायी ( Camp-follower ) होण्यास तयार आहों. मौलाना अबुल कलाम आझाद यांनीं ह्या कार्यास सुयश चिंतिलें.

ठरावाबद्दलची अनौपचारिक चर्चा ज्यांना ऐकावयास मिळाली आणि ठरावावरचीं भाषणें ज्यांनीं काळजीपूर्वक श्रवण केलीं त्यांना भावी काळांतील गांधीविचाराच्या कांहीं महत्त्वाच्या संघटनांचा हा पुसट असा आरंभ असावा असें वाटलें. कारण फार मोठमोठ्या संघटना देशांत घडून येत आहेत. देशाच्या राज्यकारभाराची घटना लवकरच पूर्ण होणार आहे. गांधीजींनीं बनविलेल्या लोकसेवकसंघाची योजना पुढें ठेवून काँग्रेसची घटना बदलविण्यांत यावयाची आहे. गांधीजींनीं २५ वर्षांत ज्या अनेक संघांस मूर्त स्वरूप दिलें त्यांचा मिलाफ करून एकजिनसी, प्रभावी, कणखर शिस्तीचा, दृढ असा संघ बनविण्याचें ठरलें आहे.

गांधीजींच्या मृत्यूमुळें त्यांचें देशव्यापी स्मारक विधायक कार्यकर्त्यांच्या रूपानें करण्याचें निश्चित झालें आहे. ह्या स्मारकसमितीचे अध्यक्षहि काँग्रेसचे अध्यक्ष हेच आहेत. समितीचे चिटणीस श्री. कुमाराप्पा व आचार्य कृपलानी ह्यांच्यासारखे गांधीतत्त्वज्ञानांत मुरलेले प्रभावी समाजसेवक आहेत. ह्या फंडासाठीं प्रत्येकानें दहा दिवसांची आपली कमाई द्यावी असें महामंत्री पंडित जवाहरलालजी यांनीं कळकळीनें सर्वांस आवाहन केलें आहे. देशांतील कोन्याकोपऱ्यांतून कोट्यवधि रुपये जमविण्याची खटपट चाललेली आहे.

ह्या महत्त्वाच्या घटनांचें सूक्ष्मपणानें निरीक्षण केल्यास असें दिसून येईल कीं एकीकडे कोणतीहि दृढता व काठिन्य ( rigidity ) नसलेला असा कार्यकर्त्यांचा सर्वोदयी समाज आणि दुसरीकडे गांधीविचाराच्या असंख्य लोकांचा देशव्यापी मेळावा ह्या दोन टोकांच्या बंधनरहित संघटनांमध्यें लोकसेवकसंघाच्या ध्येयानुसार कार्य करणाऱ्या काँग्रेस–कार्यकर्त्यांची आणि अनेकविध रचनात्मक कार्य करणाऱ्या सूत्रबद्ध अशा निरनिराळ्या संघांतील सेवकांची भर घातल्यास आणि अनुशासनपूर्ण असे गांधीविचारांच्या अनेक कार्यकर्त्यांचे संघ प्रांतानिहाय निर्माण झाल्यास ही एक गांधीविचाराच्या लोकांची देशभर पसरलेली मूर्तामूर्त संघटना तयार होऊं शकते. ह्या संघटनेतर्फे अहिंसात्मक समाजरचनेचा पाया घालण्याची सुरुवात करितां येण्यासारखी आहे असें दिसून येईल. सात्त्विक प्रवृत्तींचा विस्तार करण्याचें आणि अहिंसक समाजरचनेचें शांतिमय ध्येय पुढें ठेवून अशा अनेक संघटनांतर्फे देशाचें समुत्थान करील असें स्फूर्तिदायक आंदोलन ( Movement ) उभें करितां येण्यासारखें आहे. असें झाल्यास गांधीजींची शिकवणूक हिंदुस्थाननें अविलंबानें आत्मसात् केली असें सिद्ध होईल. सेवाग्रामच्या संमेलनानें शुद्ध साध्य व शुद्ध साधनें ह्यांचा एकजीव कल्पून अहिंसक समाजरचनेचें पुसट रेषामय चित्र निर्माण केलें आहे. त्यांत ध्येयप्रधान आणि स्फूर्तिदायक असा रंग भरला जातो कीं काय तें दाखविण्यास भविष्यकाळच समर्थ ठरणार आहे.

# संयुक्त राष्ट्रसंघटना : स्वरूप व कार्य

प्रा. स. वा. कोगेकर

जागतिक शांतता व सुरक्षितता राखण्यासाठीं जागतिक राज्यव्यवस्थेची आवश्यकता आहे हीं गोष्ट पहिल्या महायुद्धानंतरहि तीव्रतेनें पटूं लागली होती. त्या दिशेनें पहिलें पाऊल म्हणून राष्ट्रसंघाची स्थापनाहि करण्यांत आली. परंतु अशा संस्थेचें कार्य यशस्वी व्हावयाचें म्हणजे वैयक्तिक राष्ट्रांनीं आपल्या सार्वभौमत्वावर मर्यादा घालून घेण्यास तयार असलें पाहिजे. हीं जबाबदारी प्रत्यक्ष आचरणांत आणण्यास सर्वत्र विरोध झाल्यामुळें राष्ट्रसंघ यशस्वी होऊं शकला नाहीं. तसेंच राष्ट्रसंघांत प्रामुख्यानें भाग घेणाऱ्या इंग्लंड व फ्रान्स या देशांच्या साम्राज्य टिकविण्याच्या कारवायांमुळें त्या कारवायांस बळी पडणाऱ्या लहान व असमर्थ राष्ट्रांना राष्ट्रसंघाच्या शांततावादाबद्दल फारशी आत्मीयता अथवा विश्वास कधींच वाटला नाहीं. 'आहे ती विषमता आणि पिळवणूक बिनबोभाट चालू ठेवण्यास बड्या राष्ट्रांस मदत करणारी एक आंतरराष्ट्रीय संस्था' असा लौकिक मात्र राष्ट्रसंघास प्राप्त झाला. राष्ट्रसंघाची घटना देखील अप्रत्यक्षपणें या लौकिकांत भर टाकणारीच ठरली. कारण प्रत्येक महत्त्वाच्या प्रसंगीं आक्रमक राष्ट्राविरुद्ध करावयाच्या उपाययोजनेच्या मार्गांत अडचणी उत्पन्न होत आणि त्याचा फायदा अर्थात् आक्रमकांस भरपूर मिळे. आणि एकदां असा अनुभव आला कीं आक्रमकांस आपल्या हालचाली जोरानें पुढें चालविण्यास एक प्रकारें उत्तेजनच मिळाल्यासारखें होई. या कार्यक्रमाचें पर्यवसान शेवटीं दुसऱ्या महायुद्धांत झालें आणि त्याच्या सर्वभक्षक पसाऱ्यांत राष्ट्रसंघाचीहि आहुति पडली!

## संयुक्त राष्ट्रसंघटनेचा जन्म

पण ज्या कल्पनेनें राष्ट्रसंघाची स्थापना करण्यांत आली होती तिला दुसऱ्या महायुद्धांत चाललेल्या संहारानें अधिकच पुष्टि मिळाली आणि अशा प्रकारच्या संहाराची पुनरावृत्ति व्हावयाची नसल्यास जागतिक राज्यव्यवस्थेची निर्मिति करणें अपरिहार्य वाटूं लागलें. तेव्हां मिळालेल्या अनुभवाचा फायदा घेऊन पूर्वी नजरेस आलेल्या दोषांपासून मुक्त अशी योजना कशी करतां येईल याकडे युद्ध चालू असतांच लक्ष दिलें जाऊन त्याबाबत दोस्त राष्ट्रांत विचारविनिमय सुरू झाला. त्याची परिणति आक्टोबर १९४३-मध्यें मॉस्को येथें भरलेल्या रशिया, इंग्लंड व अमेरिका या देशांच्या परराष्ट्रमंत्रिपरिषदेंत होऊन एक अधिकृत घोषणा करण्यांत आली. त्या घोषणेला चीनचाहि पाठिंबा मिळून पूर्व व पश्चिम या दोन्ही गोलार्धांतील फॅसिस्ट–विरोधी लढ्यांत प्रामुख्यानें भाग घेणाऱ्या या चार राष्ट्रांतर्फे तिचा पुरस्कार करण्यांत आला. घोषणेंत एका सार्वराष्ट्रीय संस्थेच्या द्वारा जागतिक शांतता व सुरक्षितता राखण्याची आवश्यकता प्रतिपादण्यांत येऊन शांतताप्रेमी अशा सर्व लहानथोर राष्ट्रांच्या सहकार्यानें अशी संस्था शक्य तितक्या लवकर स्थापण्यांत यावी असें ठरविण्यांत आलें.

एकीकडे युद्ध चालू असतां त्याच वेळीं युद्धोत्तर शांततेसंबंधीं विचारविनिमय आणि योजना तयार करीत राहण्यांत दोन फायदे होते. एक म्हणजे युद्धांत नाना प्रकारच्या हालअपेष्टा सहन करणाऱ्या दोस्त राष्ट्रांतील नागरिकांस भावी परिस्थितीचें








आशादायक चित्र नजरेपुढें घेऊन युद्धांत विजयी होण्यासाठीं जास्तींत जास्त निकरानें प्रयत्न करणें आवश्यक वाटणार होतें. आणि दुसरा म्हणजे युद्धाच्या आपत्तींत एकत्र आलेल्या व परस्परांबद्दल विश्वास निर्माण झालेल्या राष्ट्रांची एकजूट व सहकार्य युद्धोत्तर कालींहि तसेंच चालू राहण्याची तजवीज करण्यांत येत होती. गतकालांतील परस्परांविषयींचा संशय युद्धाच्या निमित्तानें एकत्र कार्य करीत असतां नाहींसा होत होता आणि तीच वेळ भावी सहकार्याचा पाया घालण्यास अधिकांत अधिक अनुकूल वाटल्यास नवल नाहीं.

मॉस्को–परिषदेंतील निर्णयानुसार १९४४ सालीं ऑगस्ट–आक्टोबर महिन्यांत अमेरिकेंत डंबार्टन ओक्स परिषद् भरविण्यांत आली आणि वरील चारी राष्ट्रांच्या संमतीनें नव्या सार्वराष्ट्रीय संस्थेच्या घटनेचा एक मसुदा तयार करण्यांत आला. त्यांत बड्या राष्ट्रांचें सहकार्य गृहीत धरलें होतें व आक्रमकांविरुद्ध करावयाची उपाययोजना शक्य तितक्या त्वरेनें आणि शक्य तितकी परिणामकारक व्हावी यासाठीं एका आंतरराष्ट्रीय संरक्षक दलाची योजना सुचविण्यांत आली होती. बड्या राष्ट्रांवर या बाबतींत विशेष जबाबदारी टाकण्यांत येऊन ती पार पाडण्यास सोयीचें जावें यासाठीं त्यांच्या प्रतिनिधींचें मंडळ कायम अस्तित्वांत असावें अशीहि तजवीज सुचविण्यांत आली होती. निर्णायक मताधिक्याच्या प्रश्नावर मतभेद झाल्यामुळें तो प्रश्न अनिर्णीतच ठेवण्यांत आला होता. त्याचप्रमाणें मागसलेल्या प्रदेशांच्या व्यवस्थेसंबंधींहि एकमत झालेलें नव्हतें. तथापि नव्या संस्थेचें स्थूलमानानें चित्रण करण्याचें कार्य या परिषदेनें पार पाडलें. परिषदेंत भाग घेणारे सभासद मुख्यतः अनुभवी, अधिकारी व राज्यशास्त्रज्ञ असल्यामुळें त्यांच्या मसुद्यास राजकीय दृष्ट्या अधिकृत असें स्वरूप प्राप्त होणें शक्य नव्हतें, तें १९४५च्या फेब्रुवारींत याल्टा येथें भरलेल्या चर्चिल–रुझवेल्ट–स्टॅलिन–परिषदेनंतर प्राप्त झालें. या परिषदेंत डंबार्टन ओक्स मसुद्याला सर्वसाधारणपणें मान्यता देण्यांत येऊन मतदानाच्या प्रश्नावर निर्णायक सूचना करण्यांत आली. तसेंच २५ एप्रिल १९४५ला डंबार्टन ओक्स योजनेवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीनें एक सार्वराष्ट्रीय परिषद् बोलाविण्यांत यावी असेंहि तेथें ठरविण्यांत आलें आणि त्यास अनुसरून सॅन्फ्रॅन्सिस्को येथें ५० राष्ट्रांच्या प्रतिनिधींची एक परिषद् भरविण्यांत आली. दोन महिन्यांच्या चर्चेनंतर २६ जून १९४५ रोजीं संयुक्तराष्ट्रसंघटनेची सनद तयार झाली आणि अशा रीतीनें युद्धाचा शेवट होण्यापूर्वीच युद्धोत्तर पुनर्घटनेच्या एका महत्त्वाच्या अंगाविषयीं सार्वराष्ट्रीय सहकार्यानें एका योजनेचा जन्म झाला.

## आरंभींचें अत्यंत अनुकूल वातावरण

योजनेच्या स्वरूपाकडे वळण्यापूर्वीं दोन गोष्टींचा उल्लेख करणें आवश्यक आहे. पहिली अशी कीं, ही योजना अशा परिस्थितींत निर्माण झाली कीं ज्या वेळीं सार्वराष्ट्रीय (अर्थात् जर्मनी, जपान व त्यांचीं अंकित राष्ट्रें सोडून) सहकार्यानें उच्चांक गांठला होता. इतर केव्हांहि राष्ट्रांराष्ट्रांत इतकें ऐक्य दिसत नव्हतें. त्यामुळें संयुक्तराष्ट्रसंघटनेची योजना याहून अधिक परिणामकारक होणें शक्य नव्हतें. दुसरें असें कीं ही सनद तयार करीत असतांना जागतिक शांतता आणि सुरक्षितता टिकविणें, न्याय्य पद्धतीनें राष्ट्रांच्या संपत्तीचें संवर्धन करणें, सामोपचारानें परस्परांतील तंटे मिटविणें इत्यादि भावी कालांत सर्वांनाच इष्ट वाटणाऱ्या गोष्टी साध्य करणें हा एकच उद्देश सर्वांपुढें प्रामुख्यानें होता. जुन्या राष्ट्रसंघाच्या निर्मितीच्या वेळीं शत्रुराष्ट्रांच्या प्रदेशांची आणि वसाहतींची विजयी राष्ट्रांत वांटणी, त्यांवर लादण्यांत येणारी खंडणी इत्यादि परस्परांत हेवे–दावे निर्माण करणाऱ्या गोष्टींचीहि चर्चा चालू असल्यामुळें भावी कालांत वैयक्तिक राष्ट्रांचा स्वार्थ टिकविण्यावर विशेष जोर दिला जात होता. या सर्वांवर उदात्ततेचें आवरण घालणारा प्रश्न म्हणूनच केवळ राष्ट्रसंघाच्या योजनेकडे बऱ्याच मुत्सद्द्यांनीं लक्ष वळविलें होतें. ती परिस्थिति सॅन्फ्रॅन्सिस्को परिषदेच्या वेळीं अस्तित्वांत नसल्यामुळें, किंबहुना युद्धाचा शेवटहि झालेला नसल्यामुळें, संयुक्तराष्ट्रसंघटनेची योजना याहून अधिक निर्मळ वातावरणांत होणें शक्य नव्हतें. युद्धसमाप्तीनंतर आलेल्या आंतरराष्ट्रीय संबंधाच्या अनुभवामुळें या








दोन गोष्टींना पुष्टीच मिळते. त्यांचा अर्थ असा कीं, जागतिक राज्यव्यवस्था निर्माण करण्याचा हा प्रयोग म्हणजे मानवी प्रयत्नांची शिकस्त होय; त्यांत कमतरता असल्यास ती मानवी संस्कृतीच्या आजच्या अपूर्णतेची साक्ष आहे. याच जाणिवेमुळें संयुक्त राष्ट्रसंघटना यशस्वी करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. कारण हा प्रयोग फसला तर होणारी दुर्दशा इतकी भयंकर आहे कीं तिच्या नुसत्या कल्पनेनेंच मन सुन्न होतें. काश्मीर–प्रकरणीं संयुक्त-राष्ट्रसंघटनेवरील आपली निष्ठा व्यक्त करून हिंद सरकारनें हीच भावना प्रकट केली यांत शंका नाहीं. पण त्याविषयीं पुढें विचार करूं.

संयुक्तराष्ट्रसंघटनेची रचना वरवर तरी एकाद्या राष्ट्रीय राज्यशकटासारखी दिसते. कायदेमंडळाप्रमाणें असणारी सर्वसाधारण सभा, मंत्रिमंडळाप्रमाणें भासणारी सुरक्षितता–समिति, न्यायालय, आंतरराष्ट्रीय संरक्षक दल, कारभाराची कचेरी, आर्थिक व सामाजिक प्रश्नांचा विचार करणारें मंडळ व इतर अनेक समित्या आणि मंडळें यांचा समावेश तींत झालेला आहे. सारें जग तिच्या कक्षेंत येतें. पुढेंमागें अस्तित्वांत येणाऱ्या जागतिक राज्यघटनेंत यांतील कित्येक गोष्टी आढळून येतील. तरी सुद्धां आज 'जगाची राज्यघटना' असें तिचें स्वरूप नाहीं. कारण तिच्या कक्षेंत येणाऱ्या राष्ट्रांचें सार्वभौमत्व अबाधित राखून तिचें कार्य चालावयाचें आहे. जेथें त्या सार्वभौमत्वावर मर्यादा येईल तेथें संबंधी राष्ट्रांच्या संमतीनेंच ती मर्यादा येईल किंवा युद्धाचा आश्रय करून ती बसवावी लागेल. परंतु नित्यक्रम म्हणून अशी मर्यादा मान्य करण्याची जबाबदारी आज तरी तिच्यांत सामील झालेल्या राष्ट्रांनीं आपल्या अंगावर घेतलेली नाहीं. ज्या प्रमाणांत ती घेतली जाईल त्या प्रमाणांत तिचें रूपांतर जागतिक सरकारांत होत राहील. तसें होण्यापूर्वी राष्ट्रांराष्ट्रांतील संबंध परस्परसहकार्याच्या पायावर आधारले जाणें आवश्यक आहे. जोंपर्यंत त्या संबंधाच्या बुडाशीं तेढ, अविश्वास, स्पर्धा इत्यादि ऐक्यविघातक भावना आहेत तोंपर्यंत राष्ट्रसंघटनेकडे देखील साशंकतेनेंच पाहिलें जाणार हेंहि स्पष्ट आहे.

## व्हीटोच्या अधिकाराचा प्रश्न

संयुक्तराष्ट्रसंघटनेच्या रचनेंत अत्यंत महत्त्वाचें कार्य करणारी संस्था म्हणून तिच्या सुरक्षितता-समितीकडे बोट दाखविलें पाहिजे. जागतिक शांतता व सुरक्षितता टिकविण्याची जबाबदारी या संस्थेवर असून त्यासाठीं योजावयाचे सर्व उपाय तिच्या अधिकारांत येतात. अंतिम उपाय म्हणून शांतता-विरोधी राष्ट्राविरुद्ध युद्ध पुकारण्याचा मार्गहि तिला मोकळा असून त्यासाठीं लागणारें साहित्यहि तिच्या हवालीं केलें जाण्याची तरतूद घटनेंत करून ठेवण्यांत आली आहे. सुरक्षितता–समितींत एकंदर ११ सभासद–राष्ट्रें असून त्यांपैकीं रशिया, अमेरिका, फ्रान्स, चीन व ब्रिटन हीं पांच कायम सभासद आहेत. बाकीचीं ६ सार्वत्रिक सभेनें २/३ मताधिक्यानें निवडावयाचीं असून त्यांची मुदत दोन वर्षें ठरविण्यांत आलेली आहे. कामकाजाच्या पद्धतीशिवाय इतर सर्व विषयांवरील निर्णयांत सुरक्षितता–समितीच्या सर्व कायम सभासदांचें व बाकीच्यांपैकीं निदान दोन सभासदांचें अनुकूल मत आवश्यक ठरविण्यांत आलें आहे. हाच तो व्हीटो किंवा नकार. कारण कायम सभासदांपैकीं कोणाहि एका सभासदास आपल्या मताच्या जोरावर सुरक्षितता–समितीच्या निर्णयास आडकाठी करणें त्यामुळें शक्य होतें. या प्रश्नावर सुरुवातीपासून पुष्कळच उलट–सुलट चर्चा झाली असून अजूनहि सर्वांचें समाधान झालेलें नाहीं. सुरुवातीस बड्या पांचांखेरीज इतर राष्ट्रांनींच या तरतुदीवर हल्ला चढविला; पण पुढें पुढें बड्या पांचांतहि या बाबतींत मतभेद निर्माण झालेले दिसूं लागले. व्हीटोच्या अधिकारावर टीका करतांना पुढील मुद्दे प्रामुख्यानें पुढें मांडले जातात:—(१) हा अधिकार लोकशाहीशीं व राष्ट्रांच्या समान सार्वभौमत्वाच्या तत्त्वाशीं विसंगत आहे. (२) यामुळें बड्या राष्ट्रांवर सुरक्षितता–समितीस कांहींच इलाज करतां येणार नाहीं. (३) ज्या राष्ट्रांत बड्या राष्ट्रांचे हितसंबंध गुंतले आहेत अशा इतर राष्ट्रांच्या आक्रमणावर देखील इलाज करतां येणार नाहीं. (४) सुरक्षितता–मंडळासंबंधीं आवश्यक असणारा विश्वास त्यामुळें इतर राष्ट्रांना वाटणार नाहीं.










अनुक्रमणिका

या अधिकाराच्या समर्थनार्थ पुढील मुद्दे मांडले जातात:— (१) जुन्या राष्ट्रसंघांत हा अधिकार लहानमोठ्या सर्वच राष्ट्रांना देण्यांत आला होता; तो आतां फक्त बड्या राष्ट्रांपुरता मर्यादित करण्यांत आला आहे. कारण त्यांचेपाशीं असलेलें लष्करी बळ वापरण्याची जरुरी लागल्यास त्यांच्या मनाविरुद्ध तें वापरलें जाणें इष्ट व शक्यहि नाहीं. (२) बड्या राष्ट्रांतील सहकार्यावर सुरक्षितता–समितीची मदार असल्यामुळें त्यांत खंड पडेल असें कोणतेंहि कृत्य तिनें करणें इष्ट नाहीं. (३) बड्या राष्ट्रांविरुद्ध करण्याचे इलाज म्हणजे जागतिक युद्धच ! जें थांबविण्यासाठीं संयुक्तराष्ट्रसंघटनेची स्थापना झाली तेंच करण्याची तरतूद तिच्या घटनेंत कशी असणार ? (४) सुरक्षितता–समितीच्या या कार्यपद्धतीमुळेंच जागतिक युद्ध टाळण्याची शक्यता असल्यामुळें तिच्याबद्दल अविश्वास वाटण्याचें कारण नाहीं. उलट बड्या राष्ट्रांत तिजबद्दल अविश्वास वाटूं लागल्यास ती समितीशीं मनापासून सहकार्य करणार नाहीं.

जोंपर्यंत युद्धसाहित्याची विभागणी आजच्याप्रमाणें विषम असून तें कांहीं राष्ट्रांच्या हातींच केंद्रित झालें आहे तोंपर्यंत व्हीटोच्या अधिकारास मान्यता देण्याशिवाय गत्यंतर नाहीं. म्हणजेच जोंपर्यंत बड्या राष्ट्रांत परस्परविश्वास आणि सहकार्य नाहींत तोंपर्यंत जागतिक शांततेची आशा करणें व्यर्थ होय ! सुरक्षितता–समितीचा खरा उपयोग बड्या राष्ट्रांस एकत्र आणून जागतिक सुरक्षिततेची जबाबदारी त्यांच्यावर सोंपविणें व जागतिक लोकमताच्या दडपणानें त्यांस सहकार्य करावयास लावणें हाच आहे. इतर लहान व असमर्थ राष्ट्रें एर्वीतेर्वी बड्या राष्ट्रांवरच आपल्या शांततामय प्रगतीसाठीं अवलंबून आहेत हें दुसऱ्या महायुद्धानें चांगलेंच अनुभवास आलें आहे. त्यामुळें या अधिकाराच्या द्वारा त्यांच्यावर कांहीं विशेष अन्याय झाला असें म्हणतां येत नाहीं. उलट, गुप्त रीत्या परस्परांशीं केलेल्या वा करावयाच्या कराराऐवजीं उघड रीत्या आपली गाऱ्हाणीं जगाच्या चव्हाट्यावर मांडून योग्य बाजूला लोकमताचा पाठिंबा मिळविण्याची संधि त्यांना मिळत आहे. तेव्हां आजच्या परिस्थितींत व्हीटोच्या अधिकारावर आग पाखडण्यांत अर्थ दिसत नाहीं. जागतिक शांतता सर्व देशांतील बहुसंख्य जनतेला हवी असल्यामुळें जनतेच्या या हिताविरुद्ध व्हीटोचा उपयोग केला जाऊं नये यासाठीं करावयाच्या योजनांकडेच अधिक लक्ष पुरविलें जाणें योग्य होईल. तसेंच व्हीटोचा अधिकार कोणीं, किती वेळां वापरला हा प्रश्न महत्त्वाचा नसून तो जनतेच्या हिताविरुद्ध वापरला जातो कीं काय हा प्रश्न महत्त्वाचा आहे. फ्रेंच इंडोचायनामधील जनतेच्या स्वातंत्र्य–लढ्याला चेपण्यासाठीं फ्रान्सकडून जेव्हां व्हीटोचा उपयोग केला जातो तेव्हां तो जितका निषेधार्ह, तितकाच ग्रीसमध्यें तेथील जनतेवर परकीय दडपणानें लादलेल्या राजवटीविरुद्ध चाललेल्या स्वातंत्र्यलढ्याला खीळ घातली जाऊं नये यासाठीं रशियानें केलेला व्हीटोचा उपयोग स्वागतार्ह मानला पाहिजे. या दृष्टीनें व्हीटोच्या प्रश्नाकडे पाहण्याचा प्रयत्न केल्यास त्यावरील अभिप्राय हितसंबंध गुंतलेल्या वार्तासंस्थांनीं प्रसृत केलेल्या वृत्तपत्रीय अभिप्रायाहून वेगळा पडेल यांत शंका नाहीं.

## संयुक्तराष्ट्रसंघटनेच्या निरनिराळ्या समित्या व संस्था

सुरक्षितता–समितीचें कार्य दोन प्रकारचें आहे व तें करण्यास तिला पूर्ण अधिकार आहेत; त्यासाठीं तिला सर्वसाधारण सभेच्या संमतीची जरूरी नाहीं. पहिला प्रकार म्हणजे शांततेच्या, तडजोडीच्या मार्गानें राष्ट्राराष्ट्रांतील तंट्यांचा निकाल लावणें. यासाठीं योग्य वाटेल ती कार्यपद्धति ठरविण्याची तिला मुभा आहे. तंट्यांचें अस्तित्व त्यांत गुंतलेल्या पक्षांनीं अथवा इतर कोणींहि तिच्या नजरेस आणावें किंवा तिनें आपण होऊन त्याची दखल घ्यावी, असें ठरल्यामुळें एका जागतिक पोलीस–दलाची उपमा तिला देण्यांत आली आहे. तडजोडीनें काम न भागल्यास प्रत्यक्ष प्रतिकाराची योजनाहि तिला हातीं घेतां येईल. यासाठीं लागणारें लष्करी साहित्य व फौजा, आरमार, हवाई दल यांची तरतूद निरनिराळ्या सभासदराष्ट्रांनीं विशिष्ट प्रमाणांत करावयाची आहे. तसेंच अशा कार्याच्या योजनेसाठीं बड्या राष्ट्रांच्या संरक्षक–दल–प्रमुखांची एक उप–समितीहि सुरक्षि-








तता—समितीशीं सहकार्य करण्यासाठीं सज्ज राहाव-याची आहे. थोडक्यांत म्हणजे हें दुसऱ्या प्रकारचें कार्य प्रत्यक्ष युद्ध पुकारून आक्रमक व जागतिक शांततेस विघातक कृत्य करणाऱ्या राष्ट्राचें पारिपत्य करण्याचें आहे. अशा तऱ्हेची तरतूद जुन्या राष्ट्र-संघाच्या घटनेंत नव्हती, हा तिचा मोठा दोष म्हणून दाखविण्यांत येत असे.

जागतिक शांततेस धोका आणणाऱ्या परिस्थिती-वर उपाय करणें हें संयुक्तराष्ट्रसंघटनेचें नकारार्थी कार्य मानलें तर आर्थिक व सांस्कृतिक बाबतींत मागसलेल्या जनतेची आंतरराष्ट्रीय देखरेखीखालीं प्रगति घडवून आणणें हें तिचें विधायक कार्य सम-जलें पाहिजे. त्यासाठीं एक विश्वस्त—योजना तयार करण्यांत आली असून सभेच्या देखरेखीखालीं तिची अंमलबजावणी व्हावयाची आहे. मागासलेल्या प्रदे-शांचा कारभार पुढारलेल्या देशांकडे सोंपविण्यांत येणार असून अशा सर्व कारभारी देशांची व तित-क्याच इतर देशांची मिळून एक विश्वस्त—समिति स्थापण्यांत यावयाची आहे. या समितीस विश्वस्तते-खालील प्रदेशांची पाहणी करणें, त्यासंबंधीं सर्व तऱ्हेची माहिती मिळविणें, कारभारी देशांविरुद्ध आलेल्या तक्रारींची छाननी करून त्यांवर अभिप्राय देणें इत्यादि गोष्टींबाबत अधिकार राहणार आहेत. लष्करी दृष्ट्या महत्त्वाचा प्रदेश सोडून इतर सर्व मागसलेल्या प्रदेशांवर या समितीचा अधिकार चालणार आहे. जुन्या राष्ट्रसंघाखालीं निर्मिलेल्या मँडेट्सच्या पद्धतींतील दोष काढून टाकण्याचा प्रयत्न या विश्वस्त—योजनेंत करण्यांत आलेला आहे. ही योजना संयुक्तराष्ट्रसंघटनेच्या सभासद—राष्ट्रांना लाव-ण्यांत यावयाची नाहीं. त्यांचेसाठीं एक आर्थिक व सामाजिक समिति नेमण्यांत आली असून तिच्या मार्फत अशा प्रश्नांचा ऊहापोह करण्यांत येऊन योग्य त्या शिफारशी करण्यांत यावयाच्या आहेत. अर्थात् त्यांची अंमलबजावणी करण्याचें काम वैयक्तिक सरका-रांचें असल्यामुळें आजच्या आंतरराष्ट्रीय मजूरपरि-षदेप्रमाणें पण बऱ्याच व्यापक प्रमाणावर तिचें कार्य होत राहील. सुरक्षितता—समिति सोडून इतर सर्व समित्यांचे निर्णय मताधिक्यानें व्हावयाचे असून त्यांत बड्या पांचांना कोठलाहि विशेष अधिकार देण्यांत आलेला नाहीं.

सर्व सभासदांची एक सर्वसाधारण सभा नित्य-क्रमानें दर वर्षातून एकदां व जरूर पडेल तेव्हां अनेकदां भरविण्याची तरतूद करण्यांत आलेली असून संयुक्तराष्ट्रसंघटनेच्या कक्षेंत येणाऱ्या कोण-त्याहि विषयाचा विचार करणें व त्यासंबंधीं जरूर त्या शिफारशी करणें हें कार्य तिच्याकडे सोंपविण्यांत आलें आहे. निरनिराळ्या आंतरराष्ट्रीय प्रश्नांवर मत-प्रदर्शन करण्याची संधि या सभेच्या द्वारा संघटनेच्या सर्व सभासदांस सारखी देण्यांत आलेली आहे. विशे-षतः संघटनेच्या सनदेशीं विसंगत वर्तन करणाऱ्या कोठल्याहि सरकारवर निषेधाचें दडपण आणून त्या दडपणामागें जागतिक लोकमताचा पाठिंबा उभा करणें हें महत्त्वाचें कार्य सर्वसाधारण सभेस करतां येतें. संघटनेच्या अंदाजपत्रकावर व सभासद—राष्ट्रांकडून वसूल करावयाच्या वर्गणीबाबतचे अंतिम अधिकारहि सर्वसाधारण सभेस देण्यांत आले आहेत.

या सर्व सभा—समित्यांबरोबरच एका आन्तर-राष्ट्रीय न्यायालयाची योजना करण्यांत आलेली असून कायद्यानें अथवा तत्सम निर्बंधामुळें ठरलेल्या आंतरराष्ट्रीय संबंधांत तंटा किंवा दुमत निर्माण झाल्यास त्याचा निवाडा या न्यायालयांत करून घेण्यास सर्व सभासद बांधलेले आहेत. हें न्यायालय संयुक्तराष्ट्रसंघटनेच्या घटक संस्थांपैकीं एक असल्यामुळें त्याचा अधिकार मान्य करण्याची तयारी दर्शवि-ल्याशिवाय संघटनेचें सभासदत्व मिळवितां यावयाचें नाहीं.

वरील रूपरेषेवरून संयुक्तराष्ट्रसंघटनेची स्थूल-मानानें कल्पना करतां येईल. अशा प्रकारें बनविण्यांत आलेल्या संघटनेच्या द्वारा युद्धाचा धोका नष्ट करून जागतिक शांतता आणि सुरक्षितता टिकविणें, मूल-भूत मानवी हक्कांचें संरक्षण करणें आणि ते हक्क सर्व मानवांस सारखेच प्राप्त होतील अशी तजवीज करणें, आंतरराष्ट्रीय कायद्यांबद्दल आदर उत्पन्न करून त्यांची अंमलबजावणी करणें, सामाजिक व आर्थिक प्रगतींतून राहणीचें मान वाढविणें आणि या सर्वांसाठीं सहिष्णुता, सहकार्य आणि शेजारधर्म यांच्या अधिष्ठानावर मानवी समाजाची उभारणी करणें हीं उद्दिष्टें साध्य करावयाचीं आहेत.








## सं. रा. संघटनेच्या कार्यास ' जागतिक दृष्टिकोना 'ची जरूरी

हीं उद्दिष्टें कितीहि उदात्त असलीं आणि संयुक्त-राष्ट्रसंघटनेची रचना कितीहि परिपूर्ण असली तरी प्रत्यक्ष व्यवहारांत या उद्दिष्टांशीं समरस होऊन आपली सर्व शक्ति संयुक्तराष्ट्रसंघटनेचें कार्य यशस्वी करण्याकडे खर्च करण्याची तयारी सर्व सभासद–राष्ट्रांनीं दाखविल्याशिवाय त्यांचा कांहींच उपयोग होणार नाहीं. आतांपर्यंतच्या अनुभवावरून अशी तयारी सर्वांनीं केली आहे असें दिसत नाहीं. संयुक्तराष्ट्र-संघटनेच्या कार्यास अत्यंत आवश्यक असलेला 'जागतिक' दृष्टिकोनहि अद्याप निर्माण व्हावयाचा आहे. किंबहुना राष्ट्रीय सार्वभौमत्वावरच आजहि सभासद-राष्ट्रांची राज्यव्यवस्था आधारलेली असल्यामुळें अशा तऱ्हेच्या दृष्टिकोनाची अपेक्षा इतक्यांतच करणें बरोबर होणार नाहीं. पण राष्ट्रीय दृष्टिकोनांतून पाहिलें तरी केवळ स्वार्थासाठीं देखील जागतिक शांततेची आवश्यकता वाटत असल्यामुळें संयुक्त-राष्ट्रसंघटनेसारख्या जागतिक व्यवस्थेचें महत्त्व सहज पटण्यासारखें आहे. त्यांतच या संघटनेच्या द्वारा दलित जनतेच्या उन्नतीचा प्रश्न समाधानकारक रीत्या सुटण्याची शक्यता निर्माण झाल्यास तिला जगांतलि बहुसंख्य दलित जनतेचा पाठिंबा मिळाल्या-शिवाय राहणार नाहीं. उलट विशिष्ट हितसंबंधांचें संरक्षण करण्यासाठीं तिचा उपयोग केला गेल्यास तिच्याबद्दल मुळींच आत्मीयता निर्माण होणार नाहीं. आजच्या लोकशाहीच्या युगांत प्रत्येक गोष्ट जनतेच्या संघटित बळावरच यशस्वी होत असल्या-मुळें जागतिक जनतेचा पाठिंबा मिळविण्याच्या प्रत्येक प्रयत्नास संयुक्तराष्ट्रसंघटनेनें सक्रिय सहानु-भूति दाखविली पाहिजे. पण संयुक्तराष्ट्रसंघटनेच्या सभासदांवर त्या त्या राष्ट्रांतील आर्थिक व राजकीय व्यवस्थेची छाप पडत असल्यामुळें अशी विचार-सरणि नेहमींच प्रभावी ठरूं शकत नाहीं. उलट केवळ विशिष्ट हितसंबंधांच्या स्वार्थासाठीं जनतेच्या रास्त व न्याय्य हक्कांची पायमल्ली करण्याची प्रवृत्ति त्यांच्यांत दिसून येते व तिचा परिणाम संघटने-विषयीं साशंकता निर्माण होण्यांत होतो. उदाहर-णार्थ, दक्षिण आफ्रिकेंतील गोऱ्या सरकारनें अवलं-बिलेलें हिंद–विरोधी धोरण ज्या वेळीं संयुक्तराष्ट्र-संघटनेंत चर्चेला आलें, त्या वेळीं इंग्लंड, अमेरिका, यांसारखीं राष्ट्रें तटस्थ राहिलीं किंवा उघडपणें द. आफ्रिकेच्या बाजूनें बोलूं लागलीं. त्या देशांच्या अंतर्गत राजकारणांत प्रचलित व प्रभावी असणाऱ्या हितसंबंधांचें परावर्तन या वागण्यांत दिसून येतें. उलट रशिया, पोलंड, युक्रेन, झेकोस्लोव्हाकिया, या राष्ट्रांनीं हिंदुस्थानच्या बाजूनें म्हणजेच वर्ण-द्वेषाच्या विरुद्ध मतप्रदर्शन केलें व तेंहि त्या त्या राष्ट्रांतलि अंतर्गत प्रवृत्तींचें द्योतक होतें.

## सं. रा. संघटनेस डावलणें हें निंद्य

अल्बेनिया, ग्रीस, इंडोनेशिया, पॅलेस्टाईन इत्यादि प्रश्नांवरहि अशाच प्रकारचे मतभेद दृष्टीस पडले. याचा अर्थ संयुक्तराष्ट्रसंघटनेंत कांहीं दोष आहे असा नसून ती राबविणाऱ्या राष्ट्रांच्या विचारसरणींत व धोरणांत कांहीं मूलभूत फरक आहेत असा होतो. अशा तऱ्हेचे मतभेद उघडे पाडण्यासाठीं ज्याप्रमाणें संयुक्तराष्ट्रसंघटनेचा उपयोग होतो त्याचप्रमाणें एकत्र खल करून मतभेदांचें क्षेत्र संकुचित करण्यासाठीं देखील तिच्यामुळें एक संधि प्राप्त होते. ती संधि दवडल्यास मतभेद नाहींसे करण्याचें एकच भयंकर साधन शिल्लक उरतें आणि तें म्हणजे युद्ध ! आज संयुक्तराष्ट्रसंघटनेविरुद्ध आग पाखडणाऱ्या आणि तिच्या अंतिम अयशस्वितेबद्दल मोठ्या हिरीरीनें भविष्य वर्तविणाऱ्यांच्या लक्षांत हें येत नाहीं कीं ही संस्था आज नष्ट केली, तर युद्धाच्या आपत्तीस अडवण्याचा प्रयत्न करणारी म्हणून सुद्धां एकहि शक्ति शिल्लक राहणार नाहीं. दुसऱ्या महायुद्धाच्या खाईंत होरपळून निघणाऱ्या कोट्यवधि मानवांच्या आशा–आकांक्षांत तिचा पाया घातला गेला असून त्यावर उभारण्यांत येणाऱ्या जागतिक राज्यव्यवस्थेकडे जगांतील बहुसंख्य जनतेचे डोळे लागून राहिलेले आहेत, ही गोष्टहि नजरेआड करण्यांत अर्थ नाहीं. अशा स्थितींत मतभेद होतात अगर आहेत येवढ्याचसाठीं या संस्थेस डावलण्याचा अगर तींतून पळवाट काढण्याचा प्रयत्न करणें अग-दींच निंद्य समजलें पाहिजे.








संयुक्तराष्ट्रसंघटनेच्या सर्वसाधारण सभेच्या गेल्या अधिवेशनांत अमेरिकेकडून अशा तऱ्हेचा अश्लाघ्य प्रयत्न झाला व त्यास बऱ्याच सभासद-राष्ट्रांचा पाठिंबा मिळाला ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. 'छोटी ॲसेंब्ली' या नांवानें संयुक्तराष्ट्रसंघटनेच्या सर्व सभासदांची एक स्थायी समिति स्थापून तिच्याकडे जागतिक शांततेस विघातक होणाऱ्या गोष्टींची दखल घेऊन त्यांवर उपाययोजना सुचविण्याचें कार्य सुपूर्त करण्यांत यावें असा घाट अमेरिकेनें घातला. अशा तऱ्हेचे प्रश्न सुरक्षितता—समितीकडे जावयास पाहिजेत; पण तेथील कार्यपद्धतींत असलेला बड्या राष्ट्रांचा नकाराचा अधिकार वापरून सोव्हिएट रशिया आपल्या मार्गांत व्यत्यय आणील, या भीतीनें अमेरिकेनें ही क्लृप्ति काढली व तिला बहुसंख्य सभासदांचा पाठिंबाहि मिळाला ! या गोष्टीनें अमेरिकेनें काय साधलें याचा विचार करणें अगत्याचें आहे. सुरक्षितता—समितीच्या कार्यपद्धतींत मान्य झालेला अधिकार रशियानें वापरूं नये ही अमेरिकेची इच्छा; पण त्याचबरोबर आपल्या वर्चस्वाखालील राष्ट्रांच्या पाठिंब्यानें आपलें म्हणणें मान्य व्हावें हीहि अमेरिकेची इच्छा; म्हणजेच परिणामतः रशियाचा व्हीटो रद्द व्हावा पण आपला मात्र चालू राहावा असा अर्थ होतो ! पण असें करण्यांत 'बड्या राष्ट्रांतील ऐक्यावरच शांतता टिकणें शक्य आहे' या वस्तुस्थितिदर्शक गृहीत तत्त्वास अमेरिकेनें डावलण्याचा प्रयत्न करून एक प्रकारें संयुक्तराष्ट्रसंघटना कमजोर करण्यास हातभार लावला असें दिसतें.

## रशियाला व्हीटो कां वापरावा लागला ?

हिंदुस्थानसारख्या अद्यापि कोठल्याहि विशिष्ट गटांत सामील न झालेल्या देशांतील विचारी लोकांस रशियानें वापरलेल्या व्हीटोच्या अधिकाराचें कारण निर्विकार मनानें शोधून काढणें फारसें कठिण नाहीं. आजची जगांतील राष्ट्रांची विभागणी लक्षांत घेतल्यास अमेरिका व इंग्लंड यांसारख्या साम्राज्यवादी राष्ट्रांच्या आर्थिक व राजकीय वर्चस्वाखालील राष्ट्रांची संख्या इतकी मोठी आहे कीं त्यांच्या बाजूनें कोठल्याहि आंतरराष्ट्रीय परिषदेंत मताधिक्य मिळविणें अगदीं सहज शक्य होतें. प्रत्येक सभासद-राष्ट्रास एक मत असल्यामुळें लोकसंख्या किंवा लष्करी सामर्थ्य यांच्याशीं कोठल्याहि तऱ्हेनें निगडित न झालेली निर्णायक समता लहान लहान राष्ट्रांनाहि मिळते. त्यामुळें हें बहुमत त्यामागील लोकसंख्या अथवा लष्करी सामर्थ्य यांचें कोठल्याहि तऱ्हेनें प्रमाण व्यक्त करूं शकत नाहीं. उलट रशियाच्या समविचाराचीं वैयक्तिक राष्ट्रें इतकीं थोडीं आहेत कीं केवळ बहुमतावर महत्त्वाच्या प्रश्नांचा व विशेषतः ज्यांमुळें शांतता टिकविण्याची विशिष्ट जबाबदारी अंगावर येऊन पडणार आहे अशा प्रश्नांचा निर्णय लागल्यास तो बहुधा प्रत्येक वेळीं रशियाच्या विरुद्धच जाणार. या परिस्थितींतून मार्ग काढून शांतता टिकविण्याची जबाबदारी सर्व बड्या राष्ट्रांवर सारखीच आहे ही जाणीव करून देण्यासाठीं त्यांपैकीं प्रत्येकास नकाराचा अधिकार देण्यांत आला असला पाहिजे. आणि वरील परिस्थितींत तो इतरांपेक्षां रशियासच अधिक वेळां वापरावा लागला तर त्यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. कारण बाकीच्यांना आपल्या मताधिक्यामुळें व्हीटोचा अधिकार न वापरतांहि आपलें म्हणणें खरें करून दाखविणें शक्य असतें. या दृष्टीनें पाहतां व्हीटोचा अधिकार डावलण्याऐवजीं तो वापरणाराशीं तडजोड करून या अधिकाराची जरूरी लागणार नाहीं अशी परिस्थिति उत्पन्न केली पाहिजे हा विचार इंग्लंड—अमेरिका यांनीं करावयास हवा. पण अशा तऱ्हेनें तडजोड करण्यापेक्षां युद्ध परवडलें अशी मतप्रणाली त्या देशांत बरीच प्रभावी ठरूं लागल्यामुळें व गुप्ततेंत तयार होणाऱ्या ॲटम—बॉंबच्या अस्त्रानें तिच्या मार्गे जयाची आशा निर्माण केल्यामुळें तडजोडीऐवजीं तेढीलाच उत्तेजन मिळत असलेलें दिसतें. या सर्वांवर ताण म्हणजे सोव्हिएट रशियालाच शांतता नको असा उलटा कांगावा करण्यांत येत आहे. पण साधारण बुद्धीच्या माणसालाहि ही गोष्ट पटण्यासारखी नाहीं. कारण, दुसऱ्या महायुद्धांत रशियाची मनुष्य—हानि, नासधूस आणि नुकसान इतक्या प्रचंड प्रमाणावर झालेलीं आहेत कीं तसली आपत्ति स्वखुषीनें आपणावर ओढवून घेण्यास तेथील सरकार तयार होईल हें संभवनीय नाहीं.








उलट अमेरिकेच्या उद्योगपतींचें उखळ महायुद्धांत चांगलेंच पांढरें झालें, नासधूस मुळींच झाली नाहीं, उत्पादनशक्ति प्रचंड प्रमाणात वाढली आणि मनुष्यहानि झाली असली तरी तिचें गणित मांडवलदार वर्गास फारसें भेडसावीत नसल्यामुळें युद्धाकडे आशादायक वृत्तीनें पाहण्याची शक्यता तेथेंच अधिक आहे. असो.

## काश्मीर–प्रश्न

संयुक्तराष्ट्रसंघटनेंतील या परस्पर संशयाच्या वातावरणांत कोणत्याहि प्रश्नाचा विचार केवळ त्याच्या गुणावगुणावरच होईल अशी अपेक्षा करणें अवास्तव आहे. यामुळेंच काश्मीरचा प्रश्न सुरक्षितता–समितीकडे सोंपविण्याच्या हिंद–सरकारच्या निर्णयाबद्दल येथील कांहीं वास्तववादी विचारसरणीच्या मंडळींनीं नापसंती व्यक्त केली आहे. पण संयुक्तराष्ट्रसंघटनेचें एक सभासद–राष्ट्र या नात्यानें आपली जबाबदारी ओळखून कर्तव्यबुद्धीनें हा निर्णय घेतला गेला असल्यामुळें त्याबद्दल हिंद–सरकारला दोष देणें योग्य होणार नाहीं. काश्मीरमधील आक्रमक टोळीवाल्यांना मागें परतविण्याच्या कार्यांत अशी एक वेळ येऊन ठेपली कीं त्या वेळीं पाकिस्तानातील टोळीवाल्यांच्या केंद्रस्थानांवर हल्ला करणें आवश्यक झालें ! पण असें करणें म्हणजे संयुक्त–राष्ट्रसंघटनेच्या एका सभासद–राष्ट्रावर हल्ला करून त्या घटनेच्या सनदेशीं द्रोह करण्यासारखें होतें. तो आरोप टाळण्यासाठीं हिंद–सरकारनें या कामीं संयुक्तराष्ट्रसंघटनेचें साहाय्य मागितलें व टोळीवाल्यांस आपल्या प्रदेशांतून हुसकून लावणें व त्यांना कोणतीहि लष्करी मदत न देणें या दोन गोष्टी पाकिस्तानला करावयास लावाव्या अशी मागणी केली. तसें न करतां पाकिस्तानी मुलुखावर लष्करी हल्ला केला असता तर हिंदी सरकारबद्दल आक्रमण केल्याच्या आरोपावरून पाकिस्ताननें संयुक्तराष्ट्रसंघटनेकडे तक्रार गुदरली असती, ही गोष्ट अगदीं स्पष्ट आहे. त्यामुळें संयुक्तराष्ट्रसंघटनेकडे न जातां परस्पर कार्यभाग उरकतां आला असता अशी समजूत बरोबर ठरत नाहीं. तडजोडीच्या मार्गानें व आंतरराष्ट्रीय दडपणानें जर पाकिस्ताननें आपलें चालू धोरण बदललें तर ती गोष्ट केव्हांहि स्वागतार्हच आहे. तेव्हां त्या दृष्टीनें प्रयत्नहि न करणें योग्य ठरलें नसतें.

हा प्रश्न सुरक्षितता–समितींत पुढें आल्यावर त्याला फाटे फोडले गेले, हें खरें. पण तो दोष हिंदी सरकारवर कसा येतो तें समजत नाहीं. काश्मीर–प्रश्नाबरोबर इतर अनेक प्रश्न पुढें आणले गेले आणि अँग्लो–अमेरिकन पाठिंब्यामुळें प्रथम तरी त्यामुळें पाकिस्तानची बाजू बळकट झाली असें दिसलें. काश्मीरच्या सामीलनाम्याचा प्रश्न त्यांतल्या त्यांत प्रामुख्यानें पुढें येऊन त्या बाबतींत हिंदी सरकारनें आश्वासन दिलेल्या सार्वमतावर बराच भर देण्यांत आला. सार्वमत खुल्या वातावरणांत व्हावयाचें तर तेथें हिंदी फौजा व हिंदी सरकारनें पुरस्कारिलेलें सरकार राहणें योग्य नाहीं हा मुद्दा मोठ्या चतुराईनें पाकिस्तान व अमेरिका यांचे वतीनें पुढें मांडला गेला. परंतु सार्वमताचा प्रश्न सर्वस्वीं अंतःस्थ आहे, आंतरराष्ट्रीय कायद्याच्या दृष्टीनें त्यामुळें आजची काश्मीरची स्थिति बदलत नाहीं व तें हिंदी संघाचें एक घटक ठरतें, या मुद्द्यावर हिंदी प्रतिनिधींनीं या बाबतींत आपला विरोध जाहीर केला. पहिला प्रश्न टोळीवाल्यांस हांकलून लावण्याचा आहे; तें कार्य पाकिस्तानला करावयास लावावें हा मुद्दा सोडण्यास हिंदी सरकार राजी नव्हतें. शेवटीं चर्चा अनिर्णीत राहून हिंदी प्रतिनिधिमंडळ वाटाघाटी करण्यासाठीं स्वदेशीं परतलें, तें पुनः परत गेल्यानंतरहि, पॅलेस्टाइनचा प्रश्न बराच उग्र स्वरूप धारण करूं लागल्यामुळें व त्याकडे तांतडीनें लक्ष पुरविणें आवश्यक झाल्यामुळें, सुरक्षितता–समितींत काश्मीरच्या प्रश्नावर अद्याप निर्णायक चर्चा होऊं शकली नाहीं. समितीचे अध्यक्ष व दोन्ही देशांचे प्रतिनिधी यांच्यांत अनेक वेळा वाटाघाटी होऊन तडजोडीचे प्रयत्न झाले; पण ते यशस्वी होऊं शकले नाहींत. अलीकडे अमेरिकेनें आपला सूर थोडासा बदलला असून हिंदी सरकारच्या म्हणण्याकडे जास्त सहानुभूतीनें पाहण्याचें धोरण अवलंबिलेलें दिसतें.

मध्यंतरीं परिस्थितीचें प्रत्यक्ष निरीक्षण करून दोन्ही पक्षांत समझोता घडवून आणण्यासाठीं एका तीन सभासदांच्या समितीची स्थापना करण्याचा ठराव करण्यांत आला होता. पैकीं एकेक सभासद








प्रत्येकीं हिंद व पाकिस्तान यांनीं नेमावयाचा असून तिसरा सभासद या दोघांनीं नेमावयाचा होता. ही समिती सुरक्षितता--समितीच्या सभासदांतूनच निवडावयाचें बंधन नसल्यामुळें व तिचें सर्व कार्य सुरक्षितता–समितीच्या आदेशानुसार चालावयाचें नसल्यामुळें रशियानें या प्रश्नावर तटस्थ भूमिका स्वीकारली. यापूर्वी इंडोनेशियाच्या बाबतींत अशाच तऱ्हेनें नेमलेल्या समितीचा उपयोग सुरक्षितता–समितीच्या कक्षेतून तो प्रश्न काढून घेण्यासाठीं करण्यांत आला होता अशी रशियाची तक्रार होती व तीच गोष्ट पुनः घडण्याचा संभव असल्यामुळें रशियाला तटस्थता स्वीकारावी लागली असा खुलासा त्याच्या वतीनें करण्यांत आला आहे. परंतु समितीची योजना बहुमतानें मान्य झाल्यावरहि तिच्या नियुक्तीची कोठलीच हालचाल त्यानंतर झाली नाहीं यावरून तिच्या मध्यस्थीशिवायच या प्रश्नाचा निकाल लावावा असें ठरलेलें दिसतें.

इकडे सुरक्षितता–समितींत या वाटाघाटी चालू असतां काश्मीरला शत्रूच्या हातून सोडविण्याचें कार्यहि तसेंच पुढें चालू आहे. संयुक्तराष्ट्रसंघटनेच्या ५१व्या कलमान्वयें सुरक्षितता–समितीचा निर्णय ठरेपर्यंत संरक्षणार्थ कार्य करण्यासाठीं अशा रीतीनें योजावयाच्या कोणत्याहि उपायास बाध येत नाहीं. हा प्रश्न सुरक्षितता–समितीकडे नेला नसता तर एव्हांना टोळीवाल्यांची हकालपट्टी झाली असती असें म्हणण्यास मुळींच जागा नाहीं. कारण त्या परिस्थितींत पाकिस्तानवर केलेल्या हल्ल्याच्या प्रतिकारार्थ उघडपणें पाकिस्तानी फौजा पाठविणें त्या देशास आजच्याहूनहि अधिक सोपें झालें असतें. सुरक्षितता–समितीचा अंतिम निर्णय काय होईल व त्यामुळें काश्मीरच्या प्रश्नाला पुढें कसें वळण लागेल हें आज जरी सांगतां येत नसलें तरी संयुक्तराष्ट्रसंघटनेचा एक सभासद या नात्यानें हिंदी सरकारनें त्या संस्थेवरील आपली निष्ठा प्रत्यक्ष कृतीनें व्यक्त केलेली आहे व त्यामुळें त्याच्या शांतताप्रेमी आंतरराष्ट्रीय धोरणाबद्दल शंका घेण्याचें कारण राहिलेलें नाहीं येवढें मात्र खास. तसेंच आपले शत्रू कोण आणि मित्र कोण याचा उलगडा होण्यासहि यायोगें मदत होणार आहे यांत शंका नाहीं.

१०–४–४८

---

## ‘ सर्वोदय समाज ’—

‘ सर्वोदय ’ हें ‘ समाज ’ या शब्दाचें विशेषण, अशा स्वरूपांत ‘ सर्वोदय समाज ’ या संघटनाशून्य संस्थेचें नामकरण झालेलें आहे. सर्वांचा उदय व विकास घडवून आणूं शकेल असा समाज आकारास आणणें, असाच अर्थ ‘ सर्वोदय ’ या शब्दानें ध्वनित केला जातो. यावर किती तरी लिहितां येण्यासारखें आहे. पण तूर्त एवढेंच सांगतों की, प्लेटोचें ‘ रिपब्लिक,’ येशू ख्रिस्ताचें ‘ देवाचें राज्य ’ ( किंगडम ऑफ गॉड ), महमद पैगंबराचा मूर्तिभंजक समाज, गौतम बुद्धाचा ‘ निर्वाण–समाज,’ भगवद्गीतेचा ‘ निष्कामकर्मयोगी समाज ’, कार्ल मार्क्सचा ‘ वर्गावरहित समाज,’ इत्यादि आदर्श मानवी समाजांच्या सर्व कल्पनांहून अधिक मूलगामी, अधिक क्रांतिकारक व अधिक वास्तवतापूर्ण अशा समाजाची कल्पना ‘ सर्वोदय समाज ’ या या शब्दप्रयोगानें ध्वनित झालेली आहे. या समाजाचें दर्शन ज्यांना घडेल ते आपल्या वैयक्तिक जीवनांत तर क्रांति घडवून आणतीलच; पण व्यक्तीव्यक्तींची ही सजीव क्रांति अखिल मानवजातीला आपल्या चैतन्यानें थरारून सोडील.

श्री. पु. य. देशपांडे, ‘ भवितव्य ’ १९।३।१९४८



अनुक्रमणिका








# सेवाग्राम-संमेलन

श्री. राजेन्द्रप्रसाद

## मूळ कल्पना*

निरनिराळीं रचनात्मक कार्यें करणाऱ्या कार्यकर्त्यांना, आपलें एक संमेलन भरवून त्यांत आपापले विचार व अनुभव यांचा परस्परांशीं विनिमय करावयाची आणि नवीन परिस्थितींत तें तें रचनात्मक कार्य उत्तम तऱ्हेनें करणें कसें शक्य आहे हें ठरविण्याची अलीकडे बरेच दिवसांपासून आवश्यकता वाटत होतीच. तदनुसार गांधीजींच्या सल्ल्यानेंच हें संमेलन वर्ध्याला फेब्रुवारीच्या आरंभीं भरवावें असें ठरलें होतें. गांधीजी स्वतः त्या संमेलनाला हजर राहणार होते. सेवाग्रामला संमेलनाची सर्व तयारीहि झाली होती. परंतु सेवाग्रामला जाण्यास निघण्यापूर्वीं दोनतीन दिवस आधीं ती शोककारी घटना घडून आली आणि सेवाग्रामचें संमेलन पुढें ढकलावें लागलें.

## संमेलन

गांधीजींच्या निर्याणानंतर असें संमेलन भरविणें अधिकच अवश्य झालें आणि त्याप्रमाणें तें मार्च १३, १४, १५ या तारखांस भरलें. सर्व देशामधून सुमारें ५०० विधायक कार्यकर्ते संमेलनास उपस्थित झाले होते. याशिवाय मध्यवर्ती सरकारमधील पं. जवाहरलाल नेहरू, मा. अबुल कलम आझाद, श्रीमती राजकुमारी अमृत कौर व श्री. जयरामदास दौलतराम हे मंत्री, मध्यप्रांत आणि ओरिसा या प्रांताचे गव्हर्नर, मुंबई, मद्रास, ओरिसा या प्रांतांचे पंतप्रधान त्याचप्रमाणें इतर प्रांतांतील कांहीं मंत्री, यांशिवाय आचार्य कृपलानी, श्री. जयप्रकाश नारायण यांसारखे नेते इत्यादि प्रमुख मंडळी संमेलनास हजर होती.

## दोन प्रश्न

संमेलनासमोर दोन प्रश्न होते. आधीं दक्षिण आफ्रिकेंत व नंतर हिंदुस्थानांत गांधीजींनीं गेलीं ५० वर्षें आपलें कार्य अविश्रांतपणें चालविलें होतें. त्यांची कांहीं तत्त्वांवर आणि एका विशिष्ट जीवनपद्धतीवर जीवननिष्ठा होती. देशाच्या स्वातंत्र्यसंपादनार्थ केलेल्या संग्रामांत त्यांनीं राष्ट्रीय शक्ती संघटित केल्या होत्या. त्यांनीं जो संग्राम करून दाखविला त्याचा प्रकार आणि दर्जा जगाला अपरिचित असा होता. तो संग्राम एक महान् अद्वितीय प्रकारचा होता. एका मोठ्या राष्ट्राच्या पाशवी शक्तीविरुद्ध चालविलेला तो संग्राम सत्य आणि अहिंसा यांवर अधिष्ठित होता हें त्याचें वैशिष्ट्य होय.

गांधीजींची शिकवण ही गूढवादी धार्मिकाच्या किंवा जगापासून दूर राहणाऱ्या संन्याशाच्या शिकवणीसारखी नव्हती. ती अगदीं अतिशय व्यवहार्य असून जीवनांत प्रत्येकाला आचरतां येण्यासारखी अशी होती. वेळोवेळीं

* ४ एप्रिल १९४८च्या इंग्रजी हरिजनमध्यें आलेल्या लेखाचा हा अनुवाद आहे. —का. सं.








ते जें बोलले किंवा त्यांनीं जें लिहिलें त्यापैकीं बरेंचसें शिल्लक असून तें आपणांला आणि पुढील पिढ्यांना उपलब्ध आहे. आज आपल्या देशांत आणि दुसरीकडेहि असे पुष्कळ लोक विद्यमान आहेत कीं ज्यांनीं गांधीजींचा आदर्श पुढे ठेवून त्याप्रमाणें आपलें जीवन बनविण्याचा प्रयत्न केला आहे. गांधीजींनीं आपल्या मनश्चक्षूपुढें ज्या प्रकारच्या जीवनाचा व समाजाचा आदर्श ठेविला होता त्याला आवश्यक आणि पोषक असें समजलें जाणारें विविध प्रकारचें कार्य ते लोक करीत आहेत. म्हणून संमेलनासमोर पहिला प्रश्न असा होता कीं गांधीजींची विचारसरणि आणि आचारसरणि यांना पोषक होईल अशी संघटना स्थापन करणें अवश्य व शक्य आहे का आणि तसें असल्यास त्या संघटनेचें स्वरूप व काम कशा प्रकारचें असावें ? दुसरा प्रश्न असा होता कीं गांधीजींनीं आपल्या विधायक कार्यक्रमाची निरनिराळया बाजूंनीं अंमलबजावणी करण्याकरितां काढलेल्या भिन्न भिन्न कार्यांच्या संस्था, ज्यांचें कार्य हल्लीं चालू आहे त्या, यापुढें गांधीजींचें उद्दिष्ट साध्य होण्याच्या दृष्टीनें कशा प्रकारें चालवावयाच्या ?

## आधींची चर्चा

प्रत्यक्ष संमेलन १३ तारखेला सुरू झालें. त्यापूर्वीं गांधीजींशीं सहकार्य करीत असलेले असे अनेक प्रमुख कार्यकर्ते एके ठिकाणीं जमले व त्यांनीं या प्रश्नांचा निरनिराळया बाजूंनीं खल केला आणि संमेलनाच्या पुढें मांडण्याकरितां कार्यक्रम व ठरावांचे मसुदे तयार केले. या आधींच्या सभा व त्यांतून झालेल्या चर्चा अत्यंत महत्त्वाच्या अशा झाल्या. कारण त्यांच्या योगानें विचार सुस्पष्ट होण्यास आणि व्यवहार्य कार्यक्रमाचा आराखडा तयार करण्यास मदत झाली. वाटलें होतें त्याप्रमाणेंच चर्चा अत्यंत मनमोकळी आणि भरपूर झाली. त्या पूर्वसभांना जे उपस्थित होते त्यांनीं आपापले दृष्टिकोण दुसऱ्यांपुढें विचाराकरितां मांडले. गांधीजींच्या तत्त्वाचा अभ्यास होऊन तीं व्यवहारांत उतरण्यास कसें प्रोत्साहन द्यावयाचें हा पहिला प्रश्न होता. याकरितां एकादी संघटना असावी का ? अशी संघटना असायची तर ती कशी असावी ? ती अगदीं जखडबंद, शिस्तबद्ध आणि आपल्या सदस्यांना त्या संघटनेच्या कक्षेंतच काम करण्यास भाग पाडणारी अशी संस्था असावी काय ? का तिचें स्वरूप एकाद्या मेळाव्याप्रमाणें ठेवावें कीं ज्या मेळाव्यांतील स्त्रीपुरुषांची गांधीजींच्या तत्त्वावर निष्ठा असून ती आपल्या जीवनांत आणण्याचा ते प्रयत्न करीत आहेत ? अशा मेळाव्यांत समान निष्ठा आणि समान ध्येयें यांशिवाय दुसरें बंधन नसणार ! संघ बनविण्यांतहि अडचणी आणि धोके नाना प्रकारचे असतात त्यांना तोंड कसें द्यावयाचें ? त्यांचा परिहार कसा करावयाचा ? साधुसंतांच्या निर्याणानंतर त्यांच्या अनुयायांनीं आपल्या गुरुजींच्या तत्त्वप्रणालीचा संप्रदाय बनविल्याचीं व त्या संतांच्या वचनांना अपौरुषेय बनवून त्यांना अनुल्लंघनीय धर्माज्ञांचें स्वरूप दिल्याचीं उदाहरणें इतिहासांत भरपूर आहेत. कांहीं काळानंतर त्या धर्माज्ञांतील अर्थ निघून जातो आणि ते धर्मानुयायी केवळ तंत्रांत रममाण होऊन त्या साधूंच्या वचनांतील मंत्र किंवा प्राण गमावून बसतात, असें दिसून येतें.

## गांधीजींची जीवनदृष्टि

असा प्रसंग आपल्या संघटनेवर येऊं नये याबद्दल संमेलनाला जमलेल्या सर्व सभासदांचा कटाक्ष होता. आपल्या पुष्कळ वर्षांच्या सार्वजनिक जीवनांत गांधीजींनीं आपल्या लेखनभाषणांतून जीवनाचें विशाल क्षेत्र व्यापून टाकलें आहे. आज आपल्या जीवनांत उत्पन्न झालेला क्वचितच असा प्रश्न सांपडेल कीं ज्यावर गांधीजींनीं कमीअधिक प्रमाणांत उपाय शोधून काढलेला नाहीं. केवळ सार्वजनिक महत्त्वाचे प्रश्नच नव्हे तर वैयक्तिक जीवनांतील प्रश्न देखील गांधीजींपुढें ठेविले जात असत व त्यांत ते योग्य तें लक्ष घालीत असत. उ०, राष्ट्रीय कारभार व घडामोडी यांपासून तों स्वयंपाकघरांतील व्यवस्था व कामकाज, शौचकूपांची स्वच्छता वगैरेंसारख्या सांसारिक मनुष्याच्या जीवनांतील बारीकसारीक गोष्टींपर्यंत अनेक प्रश्नांमध्यें त्यांनीं लक्ष घालून

त्यांवर उपायहि सुचविले आहेत. गोष्ट कितीहि बारीक असो, तिचा त्यांना कधींहि कंटाळा नसे. त्यांना म्हणजे अमकी गोष्ट अत्यंत हीन आणि क्षुद्र किंवा तमकी गोष्ट अत्यंत महत्त्वाची आणि कठिण, असें कधींच वाटलें नाहीं. म्हणून स्वाभाविकपणेंच त्यांचें जीवन म्हणजे एक प्रयोगपरंपराच होती. त्यांनीं आपल्या आत्मचरित्राला दिलेलें ' सत्याचे प्रयोग ' हें नांव अगदीं यथार्थ आहे. अशा परिस्थितींत साहजिकच त्यांचें मन स्थितिप्रवण असें कधींच नव्हतें. तें गतिमान् असून जीवनांतील अनुभवांबरोबर तें विकसित होत होतें. त्यांच्यासंबंधीं आपणांला येवढेंच म्हणतां येईल कीं एकाद्या प्रश्नाविषयीं त्यांनीं एका वेळीं व्यक्त केलेलें मत म्हणजे त्यांचें त्या क्षणापर्यंत विचारपूर्वक असें बनविलेलें मत होय; त्याच प्रश्नासंबंधीं निराळ्या वेळीं, निराळ्या परिस्थितींत त्यांचा तोच निर्णय असेल असें नव्हे; किंबहुना त्यांनीं देखील आपणां स्वतःविषयीं असेंच म्हटलें असतें. मात्र जिला सामान्यतः विसंगति म्हणतात ती ही नव्हे; आपलीं विशिष्ट तत्त्वें ठरवून त्यांच्या कसोटीवर त्या त्या वेळीं उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांचा ज्यानें निर्णय केला आणि आपल्या तत्त्वांना बाध न आणतां निरनिराळ्या वेळीं निरनिराळीं मतें व्यक्त करावयास जो कचरला नाहीं, अशा श्रेष्ठ पुरुषाचें तें वैशिष्ट्य आहे. " आपण एक व्यापक स्वरूपाचा मार्गदर्शक असा शास्त्रग्रंथ लिहा; हल्लीं जे धार्मिक सामाजिक, राजकीय आणि आर्थिक असे नाना तऱ्हेचे प्रश्न आपल्या देशासमोर व जगासमोर ' आ ' वासून उभे आहेत त्यांना तोंड द्यायला, ते सोडवायला, आपली तत्त्वें कशीं लागू पडूं शकतील याची रूपरेषा आपण त्या ग्रंथामधून द्या " अशा तऱ्हेची विनंति त्यांना केली गेली होती. पण त्यांनीं " आपण तें करावयास असमर्थ आहों " असें उत्तर दिलें आणि सांगितलें कीं " माझीं आपलीं मूलभूत तत्त्वें आहेत; जसजसे प्रश्न उत्पन्न होतील तसतसे ते सोडविण्याला मी त्यांचा उपयोग करतों; सामान्य नीतिवचनांचा ग्रंथ वगैरे मी लिहूं शकणार नाहीं." म्हणून आपल्या जीवनदर्शनाचा धर्मग्रंथ बनवावयाचें, त्याला ठराविक धर्माज्ञा व सामान्य सिद्धांत यांच्या पोथीचें स्वरूप द्यावयाचें जें गांधीजींनीं आपल्या जिवंतपणीं नाकारलें किंवा टाळलें तें त्यांच्या मृत्यूनंतरहि होऊं नये अशाबद्दल खबरदारी घेणें सर्व सभासदांना अवश्य वाटलें. सर्वांत विशेष गोष्ट म्हणजे सर्वांना आपलें असें वाटून गेलें कीं कोणतीहि संस्था कांहीं काळानंतर संप्रदाय किंवा पंथ बनून अधोगतीला लागते, तसें मात्र ह्या बाबतींत कोणत्याहि पक्षीं होतां कामा नये.

## विधायक कार्यक्रम म्हणजे सत्याचा प्रयोगच

वर सांगितलेंच आहे कीं गांधीजी केवळ गूढवादी नव्हते, तर अत्यंत व्यवहारी होते. व्यक्तीचें आणि समाजाचें जीवन कसें असावें याचें त्यांनीं एक चित्र रेखाटलें होतें. आणि जीं तत्त्वें त्यांना खरीं आणि पवित्र वाटत तीं त्या ध्येयभूत जीवनामध्यें प्रत्यक्ष व्यवहारांत उतरलीं पाहिजेत ही त्यांची शिकवण होती. त्यांचीं मूलतत्त्वें जीं सत्य आणि अहिंसा, त्यांचाच प्रत्यक्ष व्यवहारांत प्रयोग म्हणजेच त्यांनीं अंगीकारलेला विधायक कार्यक्रम होय. जरा आणखी थोडें पृथक्करण केल्यावर गांधीजींना त्यांतहि पुनः अभेद दिसून आला, अहिंसाहि सत्यांतच विलीन झालेली दिसून आली. त्यांच्या दृष्टीनें सत्य हेंच एकमेवाद्वितीय असें मूलतत्त्व राहिलें आणि तेंच त्यांचा मूलाधार बनलें. केवळ नैतिक अर्थानेंच त्यांनीं सत्याचें पालन केलें असें नव्हे तर सत्य त्यांचा परमेश्वर बनलें. " अंतर्बहिश्च यत् सर्वं व्याप्य नारायणः स्थितः " या उक्तीप्रमाणें सत्यरूपी परमेश्वरानें त्यांचें जीवन ओतप्रोत भरून टाकलें. म्हणूनच या मूलभूत तत्त्वाविरहित आचरलेला विधायक कार्यक्रम हा अर्थशून्य होय. सत्यावर अधिष्ठित झालेला समाज निर्माण करण्यास विधायक कार्यक्रमाचें साहाय्य जर होत नसेल, तर तो विफलच होय. विधायक कार्यक्रमाची निरनिराळीं अंगं म्हणजे त्या महान् शिखराच्या दिशेनें, त्या शिखराकडे, नेणाऱ्या पायऱ्याच अशा त्यांनीं

कल्पिल्या होत्या; त्या पायऱ्यांच्या योगानें व्यक्ती आणि समाज यांनीं तें शिखर चढून जायचें. ज्याप्रमाणें एकाच शिखराकडे जाणारे अनेक मार्ग निरनिराळ्या दिशांकडून येत असले तरी एकाच ठिकाणीं येऊन मिळतात, त्याचप्रमाणें विधायक कार्यक्रमाच्या निरनिराळ्या अंगांचा हेतु त्या एकाच उच्चपदाकडे न्यायचें हा आहे. मनन आणि निदिध्यास यांच्या योगानें परतत्त्वाचें बुद्धीनें ग्रहण करणें किंवा तत्त्वचिंतनांतच आनंद मानणें हाच केवळ गांधीजींचा हेतु नव्हता. ज्या कार्याच्या योगें व्यक्तींच्या व समाजाच्या जीवनाला आणि चारित्र्याला प्रत्यक्षाप्रत्यक्षपणें चांगलें वळण लागेल अशा कार्यांत प्रत्यक्ष पडणें हेंच त्यांचें उद्दिष्ट होतें आणि तें त्यांना विधायक कार्यक्रमाच्या द्वारें साधावयाचें होतें. म्हणून त्यांचीं तत्त्वें व्यवहारांत प्रत्यक्ष कशीं उतरावयाचीं याचा संमेलनानें विचार करणें प्राप्तच होतें.

## बंधनरहित संघटना

गांधीजींचा बाह्य पसंती—नापसंतीवर फारसा विश्वास नव्हता. माणसाच्या वागणुकीचें नियमन करणारी अशी जी हृदयस्थ नियामक शक्ति किंवा जिला सामान्यतः सदसद्विवेकबुद्धि म्हणतात तिच्यावरच त्यांचा अधिक भर होता. म्हणून त्यांचीं तत्त्वें ग्रहण करायचें व त्या तत्त्वांचें पालन करायचें व्रीद ज्यांनीं घेतलें आहे त्यांनीं एक संघटना स्थापून तिचें बाह्य बंधन अंगीकारायचें म्हटल्यास त्या तत्त्वांचा आरंभींच त्याग केल्यासारखें होणार. बरें उलट पक्षीं, ज्या अनुयायांनीं गांधीजींच्या हयातींत त्यांच्या तत्त्वांचें पालन करण्याचा प्रयत्न केला आणि ज्या सर्वांना गांधीजींनीं आपल्या हयातींत आपण जणूं सूत्ररूप बनून एके ठिकाणीं गोंवून ठेविलें, त्या सर्व अनुयायांची कांहीं संघटनाच ठेवायची नाहीं असें म्हटलें तर आज गांधीजींचा देह भस्मसात् झाल्यावर त्या सर्व अनुयायांना ( एके ठिकाणीं आणणारी ) एका सूत्रांत गोंवणारी शक्तीच नाहींशी झाल्यामुळें ते सर्व लोक इतस्ततः पांगून विखुरले जातील; ( या शृंगापत्तींत सांपडल्यामुळें ) संमेलनाला मध्यम मार्ग पत्करावा लागून एक बंधनरहित शिथिल अशी संघटना बनवावयाचें त्यांत ठरलें. अशा संघटनेंतील घटकांना बांधून ठेवणारें समान सूत्र (Nexus) म्हणजे गांधीजींच्या तत्त्वांवरील समान श्रद्धा, साधारणतः समान अशी त्यांनींच सांगितलेली जीवनपद्धति. ती प्रत्येक जण आपापल्या क्षेत्रांत आचरण्याचा प्रयत्न करील.

## सदस्यांपासून अपेक्षा

ज्या एका प्रश्नावर थोडी चर्चा झाली तो म्हणजे या संघटनेला सदस्य असे असावे काय ? सदस्य असे ठेवावयाचे असतील तर त्या सदस्यत्वाचे नियम काय असावे, सदस्य कसें होतां येईल वगैरे. कांहींचें मत असें दिसलें कीं, सदस्यांची यादी अशी असूंच नये. कारण सदस्यांची नोंद करावयाचें ठरलें कीं, एकादा उमेदवार सभासद व्हावयास योग्य आहे कीं नाहीं किंवा कांहीं कारणामुळें एकाद्या सभासदाचें त्याच्या एकाद्या कृतीवरून सदस्यत्व रद्द करणें योग्य आहे किंवा नाहीं हें कोणींतरी ठरवायला पाहिजे. उलट पक्षीं, कांहींनीं आपली अशी भावना व्यक्त केली कीं, एका विशिष्ट प्रकारचें का म्हणा ना पण सदस्यत्व हें असावें, मग सदस्यत्वाचे नियम कितीहि कमी असले तरी चालतील. शेवटीं अखेरीस असें ठरलें कीं, ज्या ज्या माणसाची गांधीजींच्या तत्त्वांवर व व ध्येयावर श्रद्धा आहे, विधायक कार्य करणाऱ्या हल्लींच्या किंवा पुढें अस्तित्वांत येणाऱ्या विविध संस्था ज्या स्वरूपाचें कार्य करीत आहेत त्या स्वरूपाचें कार्य करून जो जो म्हणून मनुष्य गांधीजींचीं तत्त्वें आणि ध्येयें आचरणांत आणण्याचा प्रयत्न करीत आहे, त्याला त्याला या संघटनेचा—भ्रातृमंडळाचा सदस्य व्हायची मोकळीक असावी. अर्थात् इतर संघांतून वा मंडळांतून सामान्यतः जसें सदस्यत्व असतें तसें हें सदस्यत्व नव्हे. एका अर्थी अशा प्रकारच्या सदस्यत्वामुळें घटकांतील संबंध अतिशय शिथिल वाटतो हें खरें; पण दुसऱ्या अर्थानें, गांधीजींच्या तत्त्वांचें, केवळ श्रद्धेनेंच नव्हे तर प्रत्यक्ष आचरण करून, कडक रीतीनें पालन करणें यावरच अशा सदस्यत्वाचा












विशेष कटाक्ष आहे. हें पालन होत आहे कीं नाहीं याचा निर्णय कोणी बाहेरची नियामक संस्था देणार नसून तो निर्णय स्वतःचा स्वतःच आपल्या सदसद्विवेकबुद्धीनेंच द्यावयाचा आहे. तेव्हां ज्याच्या मनोदेवतेला वाटेल कीं आपण लायक आहों त्यानें आपलें नांव व पत्ता कळवावा. त्याची नोंद अधिकृत व्यक्तीकडून केली जाईल. सभासद किंवा सदस्य हा शब्द वापरावयाचें मुद्दाम कटाक्षानेंच टाळण्यांत आलें. त्याऐवजीं 'सेवक' हा शब्द योजावयाचें ठरलें.

## नांव

त्याचप्रमाणें संघटनेला नांव देतांना 'संघ' हें नांव मुद्दाम वगळण्यांत आलें. कारण 'संघ' या शब्दांत संघटनेचें बंधनकारित्व अधिक प्रतीत होतें. 'समाज' हें नांव द्यावयाचें ठरलें. कारण 'समाज' या शब्दांत कमी बंधनकारित्व असून 'संघा'पेक्षां स्नेही-किंवा-भ्रातृ-संमेलनाला तो अधिक जवळ आहे. 'समाजा'च्या नांवाबद्दलहि चर्चा झाली व शेवटीं 'सर्वोदय-समाज' हें नांव सर्वसंमत झालें. आपलें जीवनदर्शन एका शब्दांत करून देण्याकरितां गांधीजींनीं हा 'सर्वोदय' शब्द वापरला होता येवढ्याच एका कारणाकरितां 'सर्वोदय' हें नांव निवडलें असें नव्हे, तर तें निवडण्याचें आणखी एक कारण म्हणजे त्या योगानें गांधीजींच्या तत्त्वांची व्यवहारोपयोगी बाजू सेवकांच्या पुढें सदैव राहावयास मदत होईल. अशा रीतीनें ठरावांत म्हटल्याप्रमाणें 'सर्वोदय समाजा'ची स्थापना सत्य आणि अहिंसा यांच्या-वर अधिष्ठित असलेला समाज निर्माण करण्याचा प्रयत्न करण्याकरितां झालेली आहे. त्या निर्माण करावयाच्या समाजांत जाति किंवा धर्म यांच्या भेदाला, पिळवणुकीला थारा मिळणार नाहीं व व्यष्टि आणि समष्टि यांना प्रगतीला संपूर्ण वाव मिळेल. हें ध्येय साध्य करण्याकरितां जीं साधनें अवलंबायचीं तीं म्हणजे विधायक कार्यक्रमाच्या विविध बाजू होत. त्यांचा निर्देश ठरावांत केलाच आहे. ठरावाप्रमाणें, जो जो कोणी तत्त्वांचें पालन करून ती आपल्या जीवनांत आणण्याचा प्रयत्न करील, तो तो मनुष्य 'समाजा'चा घटक व्हावयास पात्र आहे.

## वार्षिक मेळावा

सेवकांमध्यें संबंध राहावा याकरितां दर वर्षी जानेवारी ३०ला ठरलेल्या ठिकाणीं एक मेळा भरवावयाचें ठरलें. या मेळ्याचें स्वरूप हल्लींच्या इतर सभा-अधिवेशनांहून वेगळें राहील. इतर सभा-संमेलनांतून स्वागतसमितीला प्रतिनिधींच्या निवासाची व भोजनाची तरतूद करण्याकरितां बराच खर्च व मोठी तयारी करावी लागते. हा मेळा मात्र ठराविक दिवशीं ठराविक ठिकाणीं भरेल. जे या मेळ्यास हजर राहणार असतील ज्यांना जत्रेला जाणाऱ्या यात्रेकरूंप्रमाणें स्वतःची व्यवस्था स्वतःलाच करावी लागेल, अर्थात् त्यांच्याकरितां एकच व्यवस्था करावी लागेल, ती म्हणजे स्वच्छतेविषयीं. कारण ती व्यक्तींना ठेवितां येणें शक्य नाहीं. अशा मेळ्यांतून सेवक एके ठिकाणीं जमून विचारविनिमय करतील, आपापले अनुभव परस्परांना सांगतील आणि स्फूर्ति घेऊन आपापल्या कामाच्या क्षेत्राकडे पुनः परततील. यासंबंधीं वाङ्मयहि प्रसिद्ध होईल. या वाङ्मयाच्या द्वारा सेवकांस आपापल्या विचारांचा व अनुभवाचा फायदा इतरांस देतां येईल.

## समिति आणि तिचें कार्य

या ठरावाची अंमलबजावणी करण्याकरितां म्हणून अध्यक्ष आणि श्री. किशोरलाल मश्रूवाला यांना एक समिति नेमायचा अधिकार देण्यांत आला. या समितीनें काय करूं नये याचा कटाक्षानें निर्देश करण्यांत आला. गांधीजींच्या शिकवणुकीचा अधिकृत अर्थ सांगण्याचा अधिकार या समितीनें आपणांकडे घेऊं नये किंवा गांधीजींच्या वचनांच्या अर्थासंबंधीं उत्पन्न झालेल्या वादांत निर्णय द्यायचें न्यायमंडळाचेंहि काम करूं नये, तसेंच 'समाजा'चें राजकीय वा इतर पक्षांत किंवा धर्मपंथांत रूपान्तर होईल असें कांहींहि समितीनें करूं नये. या समितीनें किंवा 'समाजा'नें देखील अशा प्रकारचें कांहींहि करूं नये असें सर्वानुमतें ठरलें. समितीचें कार्य म्हणजे








सेवकांची नोंद ठेवणें, वार्षिक मेळा भरवावयास आवश्यक त्या गोष्टी करणें आणि इतस्ततः दूरवर पसरलेल्या सेवकांमध्यें स्नेहसंबंध राखायचें काम करणें हें होय. या समितीवरील सभासद निवडतांना संपूर्ण खबरदारी घेतली आहे. हे सभासद या ना त्या रचनात्मक कार्यामधील कार्यकर्ते असून आपण जी जीवनपद्धति स्वीकारावी असें गांधीजींना वाटत होतें, त्या प्रकारची जीवनपद्धति यांनीं अंगीकारलेली आहे. हे बुद्धिपुरःस्सर मागें राहिले असून, अजूनपर्यंत ते प्रसिद्धीच्या प्रकाशांत आलेले नाहींत. त्यांना कोणत्याहि आगंतुक कारणामुळें महत्त्व आलेलें नाहीं. जोंपर्यंत त्यांनीं केलेली सेवा 'सेवकां'च्या हृदयाला पटेल, तोंपर्यंतच ते हवेसे वाटतील.

## 'सर्वोदय समाज'

'सर्वोदय समाज' हा संघ म्हणून कांहीं काम करणार नाहीं. स्वतःच्या जबाबदारीवर कोणतेंहि कार्य वा कार्यक्रम तो पतकरणार नाहीं. सर्व सेवकांनीं आपल्या रचनात्मक कार्याच्या प्रसारार्थ कांहीं तरी काम करीत राहिलें पाहिजे अशी अपेक्षा आहे. प्रत्येक सेवकास आपापणाला अनुरूप—अर्थात् गांधीजींच्या तत्त्वांशीं सुसंगत—असें काम करण्याची संपूर्ण मुभा आहे; मात्र त्यानें कांहींहि 'समाजा'च्या नांवानें वा वतीनें करतां कामा नये. अशी उमेद आहे कीं, श्रद्धावंत आणि दृढनिश्चयी असे स्त्री-पुरुष 'समाजा'स येऊन मिळतील आणि संपूर्ण स्वेच्छेनें, राजीखुशीनें व कोणाच्याहि निग्रहानुग्रहाची पर्वा न करितां गांधीजींचीं तत्त्वें आपल्या जीवनांत उतरवितील. जगभर अशा लोकांची संख्या खचितच मोठी आहे. अशा सेवकांच्या द्वारा समाज आपली ज्योत सतत प्रज्वलित ठेवूं शकेल येवढेंच नव्हे, तर त्या ज्योतीचा प्रकाश अधिकाधिक दूरवर पसरत राहील.

## विधायक संस्थांचें समकेंद्रीकरण

विचाराकरितां जो दुसरा मुद्दा आला तो म्हणजे अखिलभारतीय चर्खासंघ, ग्रामोद्योग-संघ, हिंदुस्तानी तालिमी संघ, गोसेवासंघ, हिंदुस्तानीप्रचार-सभा अशांसारख्या ज्या संस्था रचनात्मक कार्यें करीत आहेत, त्यांच्या समकेंद्रीकरणाचा. हे निरनिराळे संघ गांधीजींनीं कॉंग्रेसच्या छत्राखालीं आणि आशीर्वादानें निरनिराळ्या वेळीं सुरू केले असून त्या त्या कार्यावर प्रत्येक संघानें आपलें लक्ष केंद्रित केलेलें होतें. असे अनेक कार्यकर्ते आहेत कीं ज्यांचा संबंध या संस्थांपैकीं एकीपेक्षां जास्तींशीं आहे. त्या सर्वांना परस्परांशीं अधिक जोडून निगडित करावें आणि त्यांच्या कार्यांचा, तीं परस्परांना उपकारक होतील अशा रीतीनें, समन्वय करावा असें गांधीजींनाहि वाटत होतें. गांधीजी कांहीं संस्थांचे अध्यक्ष होते आणि इतरांचे अध्यक्ष नसले तरी प्रत्येकीचे मार्गदर्शक आणि संचालक होते. गांधीजींची जागा घेऊन त्या संस्थांचें मार्गदर्शन आणि संचालन करणारी संस्था स्थापणें किंवा तें करणाऱ्या कांहीं व्यक्ती नेमणें आणि त्या सर्व संस्थांच्या कार्यांचा समन्वय करणें गांधीजींच्या पश्चात् अधिकच आवश्यक झालें आहे. ह्या संघांपैकीं प्रत्येक संघ ही एक स्वायत्त संस्था आहे. म्हणून त्यांना बंधनकारक होईल असा निर्णय संमेलनाला घेतां येणें शक्य नव्हतें; त्या संघांचे जे प्रतिनिधी उपस्थित होते—अर्थात् ते रीतसर प्रतिनिधी नसले तरी कार्यदृष्ट्या तसे होतेच—त्या सर्वांना, अशा प्रकारें समन्वय करणारी संस्था असावी, असें उत्कटत्वानें वाटत होतें. म्हणून तें करण्याच्या दृष्टीनें त्या संघाच्या सल्ल्यानें जरूर त्या गोष्टी करण्याचें काम श्री. जे. सी. कुमाराप्पा यांचेकडे सोंपविलें गेलें.

विधायक कार्यक्रम हा सदैव विकसनशील, वर्धिष्णु असा कार्यक्रम आहे. त्याकरितां लागणाऱ्या संस्थांच्या संख्येला मर्यादाच नाहीं. म्हणून जें मंडळ या सर्व संघांचें समकेंद्रीकरण करण्याकरितां नेमलें जाईल त्यानें फक्त आहेत तेवढे संघच विचारांत घेऊन चालणार नाहीं, तर यापुढें अस्तित्वांत येणाऱ्या संघांचीहि तरतूद करणें त्याला लक्षांत घ्यावें लागेल.

## जातीय सलोखा—एकमेव कार्य

उपरिनिर्दिष्ट दोन गोष्टींनीं संमेलनाचा बराच








वेळ घेतला हें खरें. परंतु चर्चा चालू असतांना आणि इतर वेळीं देखील सभासद येथें होते तोंपर्यंत त्यांच्या मनांत एकच विचार जर सारखा घोळत असेल तर तो, जातीय शांतता प्रस्थापित करणें किती अत्यंत निकडीचें आहे, याविषयीं. गांधीजींनीं अखेरीस जवळजवळ केवळ याच एकमेव कार्याकरितां स्वतःला वाहून घेतलें होतें आणि त्याप्रीत्यर्थ आपल्या प्राणांचें बलिदान केलें. जातीय प्रश्न हा दीर्घ काळापासून ' आ ' वासून उभा आहे. गांधीजींनीं आपल्या जीवनामधून त्याला एक अत्यंत प्रमुख स्थान दिलें होतें. परंतु दुर्दैवानें त्यांनीं प्रयत्न करूनहि तो प्रश्न अधिकच गुंतागुंतीचा झाला आहे. गांधीजींच्या कार्याबद्दल आणि हेतूबद्दलहि या ना त्या गटाकडून शंका घेतली गेलेली आहे. ज्या हिंदुमुसलमान–तेढीमुळें देशाची फाळणी होऊन दोन राष्ट्रें स्थापन झालीं, ती तेढ अलीकडे कांहीं महिन्यांत विशेष तीव्रतर झाली आहे. अर्थात् त्या तेढीचा इतिहास तपासून पाहण्याची आवश्यकता नाहीं.

## फाळणीचे परिणाम

फाळणीच्या थोड्या आधींपासून आणि नंतर केवढा हाहाकार उसळला आहे ! हजारों स्त्रीपुरुष आणि मुलें प्राणांना मुकलीं असून कोट्यवधि रुपयांच्या चीजवस्तूंचा अपहारानें व जाळपोळीनें नाश झाला आहे. एकीकडून लक्षावधि हिंदू आणि शीख हे पूर्व पंजाबांत आणि हिंदुस्थानांत इतरत्र आणि दुसरीकडून लक्षावधि मुसलमान पाकिस्तानमध्यें आपापल्या मूळ घरादारांचा त्याग करून गेले आहेत. हें स्थलांतर करतांना त्यांना काय भयंकर यातना आणि दुःख अनुभवावें लागलें आहे ! अजूनहि हें स्थलांतर थांबलें नसून कित्येक लक्ष हिंदू आणि शीख पश्चिम पंजाबमध्यें अडकून पडले असून हिंदुस्थानांत यायची वाट पाहत आहेत. पश्चिम पाकिस्तानांतून हिंदुस्थानांत ५० लक्ष लोक आले असून तितकेच हिंदुस्थानांतून पाकिस्तानांत गेले आहेत. त्याचप्रमाणें पूर्व पाकिस्तानमधून पश्चिम बंगालमध्यें ७।८ लाख लोकांनीं देशांतर केलें असावें असें म्हणतात. येवढ्या प्रचंड संख्येनें लोकांचें आपल्या जन्मभूमीपासून झालेलें उन्मूलन आणि शेंकडों मैलांवर दूर ठिकाणीं त्यांचें स्थलांतर या घटनांमुळें किती हाहाकार झाला असेल याची कल्पनाच केलेली बरी. अशा लोकांचीं अंतःकरणें त्वेषानें आणि द्वेषानें जळफळत असतील तर त्यांत अस्वाभाविक कांहीं नाहीं. आपल्या स्वधर्मीयांच्या दुःखद कहाण्यांनीं तेथले मुसलमान आणि मुसलमानेतर यांचीं अंतःकरणें द्वेषभावनेनें भरून गेलीं आहेत. म्हणून देशाच्या फाळणीनें, या घडून आलेल्या घटनांमुळें, जातीय प्रश्न सुटलाच नाहीं; उलट त्याला निराळें वळण लागून तो कांहीं बाबतींत तर अधिकच चिघळला आहे.

## गांधीजींची कार्यपद्धति

या द्वेषभावनेविरुद्ध गांधीजींनीं आपल्या थोर विभूतिमत्त्वाची सर्व शक्ति पणाला लाविली. आणि त्यांच्या अखेरीच्या कांहीं महिन्यांतील प्रत्येक क्षण नि क्षण त्यांनीं हिंदुमुसलमानांमध्यें बंधुभावना प्रस्थापित करण्याकरितां वेंचला. आपल्या अहिंसेच्या अमोघ आणि अतुल तत्त्वाच्या प्रयोगानें एक अत्यंत गुंतागुंतीची अशी सामाजिक आणि मानसिक समस्या सोडविण्याचा ते प्रयत्न करीत होते. अभंग आणि अविचल अशा निष्ठेनें प्रेरित होऊन ते उच्च कंठरवानें सांगत होते कीं जर हिंदुस्थानांतील हिंदू, शीख आणि इतर लोक मुसलमानांना सुरक्षिततेची हमी देऊन त्यांच्यामध्यें तसा विश्वास उत्पन्न करतील, तर पाकिस्तानांतील मुसलमान त्यांच्या बाजूनें या सद्भावनेस प्रतिसाद द्यावयास चुकणार नाहींत; किंबहुना तसा प्रतिसाद देण्याशिवाय त्यांना गत्यंतरच राहणार नाहीं. म्हणूनच ते सारखा टाहो फोडून सांगत कीं तिकडे कांहीं का करीनात, आपण मात्र इकडे मुसलमानांना न्यायानें भावाप्रमाणें वागवावयास पाहिजे.

एका दुष्कृत्यानें दुसऱ्या दुष्कृत्याचें समर्थन होऊं शकत नाहीं. सत्कृत्य हें स्वयंप्रमाण, निष्काम असतें; त्याला प्रतिसत्कृत्याची वा प्रत्युपकाराची आवश्यकता नसते. गांधीजींनीं हेंच निष्ठापूर्वक प्रतिपादन केलें, त्यामुळें त्यांच्या-









वर कांहीं लोक बिथरले आणि तज्जन्य द्वेष आणि अविश्वास यांनीं वातावरण भरून गेलें. त्यामुळेंच एकाच्या मनांत त्यांचा खून करायचा विचार येणें आणि त्यांचा खून करणें शक्य झालें.

### विष काढून टाका

तेव्हां संमेलनाला वाटलें कीं आज जर अत्यंत आणीबाणीचा कोणता प्रश्न आपणांसमोर उभा ठाकला असेल तर तो हें विष आपल्या सामाजिक जीवनांतून कसें काढून टाकावें हा. श्रद्धा आणि दृढनिश्चय यांनीं प्रेरित होऊन स्त्रीपुरुषांनीं आपापल्या हयातींत आपापल्या क्षेत्रांमध्यें या कार्याला जर वाहून घेतलें तर तें साध्य होऊं शकेल. म्हणून ज्यांचा ज्यांचा गांधीजींच्या तत्त्वांवर विश्वास असून ती तत्त्वें आचरणांत आणण्याचें व्रत ज्यांनीं ज्यांनीं घेतलें आहे, त्या सर्वांनीं हें कार्य निकडीचें मानून या कार्याला वाहून घ्यावें, असें संमेलनांत अगत्यपूर्वक सांगितलें गेलें.

### शरणार्थींच्या पुनर्वसतीचा प्रश्न

ज्यांच्या अंतःकरणांत अवर्णनीय अशा अमानुष अत्याचारांच्या आणि भोगिलेल्या असह्य यातनांच्या भयंकर आठवणी शल्यासारख्या सलत आहेत, असे लक्षावधि स्त्रीपुरुष आपल्यासमोर असून त्यांच्या घरादारांची व चरितार्थाची समाधानकारक सोय लावल्याखेरीज जातींजातींमधील परस्परसंबंधांत पुनः समंजसपणा प्रस्थापित करणें किती कठिण आहे, याची संमेलनाला जाणीव होती. म्हणून शरणार्थी आणि दुःखी यांची जातधर्माचा विचार न करितां सेवा करणें अत्यंत आवश्यक झालें आहे, असें सर्वांनाच वाटलें. शरणार्थी व दुःखी यांना मदत करणें, त्यांना पुनः वसविणें हें कार्य इतकें जगड्व्याळ आणि अचाट आहे कीं बिनसरकारी संघटनेला हा प्रश्न हाताळणें कठिण आहे. सरकारची येवढी मोठी चिकाटी आणि येवढी विशाल साधनसामग्री! पण त्याला देखील हें कार्य कठिण जात आहे. त्याकरितां सरकार पराकाष्ठा करीत असून आपलें सगळें बळ त्याकरितां वेंचीत आहे. तरी सुद्धां बिनसरकारी संस्थांना आणि व्यक्तींनाहि सरकारला मदत करतां येणें, त्याचप्रमाणें स्वतंत्रपणें दुःखी लोकांची सेवा करणें शक्य आहे. म्हणून संमेलनास हजर असणाऱ्या कार्यकर्त्यांस शरणार्थी लोकांच्या सेवेचें कार्य करण्याबद्दल विनंति केली गेली. आनंदाची गोष्ट ही कीं, या विनंतीला अनुसरून श्री. विनोबा भावे आपल्या अनुभवी आणि खंद्या कार्यकर्त्यांसह या प्रश्नाचें बारकाईनें निरीक्षण करून रचनात्मक कार्यकर्ते कोणती विधायक सेवा करूं शकतील हें पाहणार आहेत.

### शांतिदलें

जनतेमध्यें शांतता प्रस्थापित करण्याच्या कार्याला जे स्वतःला संपूर्णपणें वाहून घेतील अशा सेवकांचें एक पथक तयार करणें कितपत इष्ट आणि व्यवहार्य होईल याचा गांधीजी पुष्कळ काळापासून विचार करीत होते. त्यांनीं अनेक प्रसंगीं एक शांतिसेना उभारावी असें सुचविलें होतें. पण या ना त्या कारणामुळें त्यांच्या हयातींत तें होऊं शकलें नाहीं. जातीय तेढीचें जर निर्मूलन करावयाचें असेल तर अशा प्रकारच्या संघटनेची अत्यंत मदत होईल. म्हणून 'शांति-सेवा-दलें' उभारण्याचे प्रयत्न करावे असें संमेलनानें ठरविलें. 'शांति सेवादल म्हणजे पोलिसांची किंवा इतर स्वयंसेवकांची तुकडी नव्हे हें स्पष्टपणें लक्षांत ठेवलें पाहिजे. पोलिसांच्या किंवा स्वयंसेवकांच्या तुकडीचें काम दंगे आणि शांतताभंग मोडून काढणें हें होय. 'शांति सेवा-दला'चें काम म्हणजे प्रत्यक्ष जनतेमध्यें सतत कार्य करीत राहून शांतीचें आणि सदिच्छेचें वातावरण निर्माण करणें हें होय. त्यामुळें जातीय दंगे किंवा शांतताभंग कधींहि होणारच नाहींत; परंतु समजा दुर्दैवानें तसे ते झाले, तर शांति सेवादलानें दोघां लढणाऱ्या पक्षांमध्यें स्वतः पडून ते शमविले पाहिजेत किंवा त्या भांडणांतील तीव्रता तरी कमी केली पाहिजे. शांतिसेवादल हें निःशस्त्र आणि संपूर्णपणें अहिंसक राहणार असल्यामुळें त्याला हें साधणें शक्य होईल.








# सार—संकलन

## १ सेवाग्राम संमेलनांतील दोन ठराव

सेवाग्राम येथें रचनात्मक कार्यकर्त्यांचें संमेलन डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या अध्यक्षतेखालीं १९४८ मार्चच्या १३, १४, १५ या तारखांस भरलें होतें. त्या संमेलनांत पास झालेल्या ठरावांपैकीं दोन ठरावांचा अनुवाद खालीं दिला आहे.

### गांधीजींचें निधन

३० जानेवारी १९४८ ला दिल्ली येथें गांधीजींच्या निधनानें रचनात्मक कार्य करणाऱ्या विविध संघांची किती अपरिमित हानि झाली आहे त्याची कल्पना करणें अशक्य आहे. या सर्व संघाचे गांधीजी हे प्राणच होते. ज्या माणसानें त्यांचा जीव घ्यायचें अधम कृत्य केलें त्यानें आणि त्याच्या पाठीमागें असलेल्यांनीं केवळ आपल्या देशाचेंच नव्हे तर सर्व मानवजातीचें जें भयंकर नुकसान केलें आहे त्याचें कोणीही मोजमाप करूं शकणार नाहीं. त्यांनीं हिंदु धर्माचें आणि हिंदु समाजाचें नांव कलंकित केलें आहे. हा एक महान् पुरुष—किंबहुना, जगांतील उदात्ततम, विशुद्धतम पुरुष, सर्व मानवजातीचा सुहृद्, आपल्या लोकांचा वत्सल पिता, सर्वत्र निर्भयपणें आणि विश्वासानें संचार करणारा—अशा या महापुरुषाच्या वधाला जी तामसी रानटी मनोवृत्ति कारणीभूत झाली ती कशाचा परिपाक आहे हें सर्व विचारवंतांनीं गंभीरपणें समजून घेतलें पाहिजे. माणसा-माणसांमध्यें वितुष्ट आणि विषमता वाढवणारें जें चुकीचें शिक्षण आणि ज्या संकुचित जातीयवादी कल्पना त्यांचा ही मनोवृत्ति हा परिपाक होय.

मानवजातीला लागलेला हा कलंक पुसून टाकणें, झालेली हानि भरून काढणें, किंवा गांधीजींच्या कुटुंबियांसारख्या असलेल्या लोकांचा दुःखभार हलका करणें—या गोष्टी कोणत्याही प्रस्तावानें होणें शक्य नाहीं. त्याकरितां एकच उपाय तो म्हणजे गांधीजींचीं तत्त्वें आणि विचारसरणि प्रत्यक्षांत उतरविण्याकरितां लोकांना शिक्षण देणें, त्यांच्या रचनात्मक कार्यक्रमाचा लोकांमध्यें प्रसार करणें, भिन्न भिन्न राष्ट्रें, धर्म आणि समाज यांच्यामध्यें स्नेहभाव आणि सहकार्य वाढविणें, युद्ध, जुलूमजबरदस्ती आणि हिंसा यांसारख्या अत्याचारी मार्गांची हकालपट्टी करण्याचा प्रयत्न करणें,—हा होय.

म्हणून ज्यांना गांधीजींबद्दल आदरभाव असून जे राजकीय, सामाजिक आणि आर्थिक क्षेत्रांमधून गांधीजींच्या तत्त्वानुसार कार्य करीत आहेत त्यांना या संमेलनाची अशी आग्रहाची विनंति आहे कीं, त्यांनीं या दुःखद प्रसंगीं एकत्र विचारविनिमय करावा आणि गांधीजींनीं सुरू केलेलें कार्य पुढें कसें चालू ठेवावयाचें आणि त्यांच्या जीवितकार्याची परिपूर्ति कशी करावयाची तें ठरवावें.

### सर्वोदय समाज

ज्यांची गांधीजींच्या तत्त्वांवर श्रद्धा आहे, त्यांनीं एक भ्रातृसमाज (Brotherhood) स्थापन








करावयाचें ठरविलें आहे. हा भ्रातृसमाज विशाल अशी संघटना राहील.

नांव— ही संघटना 'सर्वोदय समाज' या नांवानें संबोधिली जाईल.

उद्देश— ज्या समाजांत जातीचा व धर्माचा भेद नाहीं, जेथें एकानें दुसऱ्याचें शोषण करायला संधि नाहीं, जेथें व्यष्टि त्याचप्रमाणें समष्टि यांना आपापली प्रगति करून घेण्यास संपूर्ण वाव आहे अशा सत्य आणि अहिंसा यांवर अधिष्ठित असलेल्या समाजाच्या स्थापनेकरितां प्रयत्न करणें.

साधनें— वरील उद्दिष्ट साध्य करून घेण्याकरितां पुढील साधनांचा उपयोग करण्यांत येईल. ( १ ) जातीय ऐक्य ( निरनिराळ्या धर्मांच्या अनुयायांमध्यें आणि जमातींमध्यें स्नेहभाव ), ( २ ) अस्पृश्यतेचें उच्चाटन, ( ३ ) जातिभेदांचें निर्मूलन, ( ४ ) दारूबंदी, ( ५ ) खादी आणि इतर ग्रामोद्योग, ( ६ ) ग्रामसफाई, ( ७ ) नई तालीम, ( ८ ) स्त्रीपुरुषांना समान हक्क व समान दर्जा, ( ९ ) आरोग्य व स्वच्छता, ( १० ) देशी भाषांचा विकास, ( ११ ) संकुचित प्रांतीयतेचें निराकरण, ( १२ ) राष्ट्रभाषा म्हणून हिंदुस्तानीचा प्रचार, ( १३ ) आर्थिक समता, ( १४ ) शेतीची सुधारणा, ( १५ ) कामगारांचें संघटन, ( १६ ) आदिवासींची उन्नति, ( १७ ) विद्यार्थ्यांचें संघटन, ( १८ ) महारोग्यांची शुश्रूषा, ( १९ ) आपद्ग्रस्त आणि अनाथ यांना मदत, ( २० ) गोसेवा, ( २१ ) निसर्गोपचार, ( २२ ) यांसारखीं इतर कार्यें.

जो जो कोणी उपरिनिर्दिष्ट तत्त्वांशीं एकनिष्ठ राहून तीं प्रत्यक्ष जीवनांत आणण्याचा प्रयत्न करील, त्याला त्याला 'सर्वोदय समाजा'चे सभासद होता येईल. सभासद होऊं इच्छिणाऱ्यांनीं समाजाच्या कार्यवाहांना 'आपणांस हीं तत्त्वें व साधनें मान्य आहेत' असें कळवून आपलीं नांवें व पत्तेही कळवावेत— त्याप्रमाणें तीं नोंदलीं जातील. सभासदांचा परस्परांशीं संबंध येण्याला संधि मिळावी म्हणून दर वर्षी ३० जानेवारीला एका ठराविक ठिकाणीं मेळावा भरविण्यांत येईल.

हा समाज सल्लागार मंडळाच्या स्वरूपाचा असून, कार्यकारी संघाचें ( Executive organization ) स्वरूप याला रहाणार नाहीं.

हें संमेलन श्री. अध्यक्ष आणि श्री. किशोरलाल मश्रुवाला यांना 'सर्वोदय समाजा'च्या कार्याचा प्रसार करण्याकरितां एक कार्यकारिणी नेमण्याचा अधिकार देत आहे. त्या कार्यकारिणींत सभासद किती असावेत हें त्या दोघांनींच ठरवावें.

टीपः— तदनुसार अध्यक्ष श्री. राजेन्द्रप्रसाद आणि श्री. किशोरलाल मश्रुवाला यांनीं पुढील सद्‌गृहस्थ कार्यकारिणीवर नियुक्त केले आहेत :

श्री. आर. एस. धोत्रे ( निमंत्रक )
,, सुशीलाबेन पै
,, धीरेन्द्र मुजुमदार
,, एम्. सत्यनारायण
,, रामदेव ठाकूर
,, ए. वेदरत्नम् पिल्ले
,, मनमोहन चौधरी
,, तिम्माप्पा नायक
,, बाबलभाई मेहता
,, महेशदत्त मिश्र
,, काशीनाथ त्रिवेदी
,, श्रीमन्नारायण आगरवाल

या कार्यकारिणीला आणखी पांचपर्यंत सभासद करून घ्यायचा (Co-opt) अधिकार आहे.

या कार्यकारिणीचें कार्य पुढीलप्रमाणें आहेः— 'समाजा'च्या सेवकांची एक यादी ठेवणें; त्या मेळ्याला आवश्यक अशी व्यवस्था करणें, 'समाज' आणि त्याचे 'सेवक' यांच्यामध्यें सामान्यपणें संबंध राखणें; याशिवाय सर्वोदय समाजाच्या स्थापनेसंबंधींचा संमेलनाचा ठराव अमलांत आणणें, कार्यकारिणीवर कांहीं जागा रिकाम्या झाल्यास त्या भरण्याचा, त्याचप्रमाणें जरूर वाटल्यास कोणतेही पदाधिकारी ( office bearers ) नेमावयाचा या कार्यकारिणीला अधिकार राहील.



अनुक्रमणिका

## २ अहिंसेनेंच नराचा नारायण बनेल

' आज आपण वर्तमानपत्रें उघडून पाहिलीं तर आपणांस काय आढळून येतें ? जगांत जिकडे तिकडे पाप, दुःख, यातना यांचा हाहाकार पसरलेला आहे. गेल्या युद्धाचे परिणाम अजूनहि भोंवत आहेत. आणि वर्तमानपत्रें सांगतात, कीं पुढील युद्धाची व्यूहरचना जें तें राष्ट्र करीत आहे ! आपण अजूनहि जुन्या अशा जीवनपद्धतीलाच चिकटून आहोंत ! ती जीवनपद्धति आपलें हाडवैर साधणार, आपला नाश करणार, ती स्वतः खचत जाऊन आपणांसहि खचवणार हें धडधडीत दिसत असतांनाहि आपण ती सोडीत नाहीं ! आपणांस नवीन समाज निर्माण करावयाचा असेल तर आपण आपला स्वार्थ सोडला पाहिजे, आपली सध्यांची रहाणी बदललीच पाहिजे.

असें सांगणारे कांहीं लोक आहेत कीं, असत् किंवा दुष्ट प्रवृत्ति ही बाह्य आगंतुक असून तिचा आपण निसर्गविज्ञान आणि समाजशास्त्र यांच्या साहाय्यानें निःपात करूं. परंतु खिस्तधर्माच्या शिकवणीप्रमाणें " परमेश्वराचें राज्य आपल्या आंत, हृदयांत आहे. " ज्या दुष्ट दुर्जन असुरांचा नाश करावयाचा आहे ते असुर, दैत्य मनुष्याच्या आंत, अंतःकरणांत आहेत. म्हणून मानवाची जी अंतःसृष्टि, जें अंतःकरण त्याचें आमूलाग्र परिवर्तन केल्याशिवाय खरी प्रगति होणें शक्य नाहीं.

विज्ञानानें आश्चर्यकारक प्रगति करून विज्ञानानें आपणांस सामर्थ्यशाली केलें आहे खरें; परंतु तें वापरावयाचें कसें याची ध्येयदृष्टि विज्ञानानें दिली नाहीं. म्हणून अशा निसर्गविज्ञानाचा आणि समाजशास्त्राचा आपणांस काय उपयोग ? माणसांना आपल्या नियंत्रणाखालीं कसें आणावें, माणसें वापरावीं कशीं, हें मात्र समाजशास्त्र आपणांस सांगतें. सर्वाधिकारी अरेरावांनीं माणसांच्या मनांवर ताबा मिळवून त्यांना कसें भलतेंच वळण दिलें, हें आपणांस माहीत का नाहीं ? तरुण, लवचिक, सत्प्रवृत्त आणि अपरिपक्व कोमल अंतःकरणें आपल्या पकडींत घेऊन तीं त्यांनीं राष्ट्रीय आणि वांशिक दुरभिमानाच्या खाईत लोटलीं ! समाजशास्त्राचा शेवटीं असा उपयोग झाला !

म्हणून शास्त्रापेक्षां आपणांला निराळयाच अशा गोष्टीची जरूर आहे, कीं जिच्या योगानें माणसाचीं अंतःकरणें आपणांस बदलतां येतील. जेव्हां आपण धर्मापासून मिळणाऱ्या स्फूर्तिप्रद प्रेरणेवर भर देतो तेव्हां धर्मजन्य स्फूर्तिच जीवनांत क्रांति घडवून आणूं शकेल, हें आपणांस अभिप्रेत असतें.

धार्मिक मनुष्य, खरा धार्मिक मनुष्य, हा क्रांतिकारक असतो. समाजांतील रूढींचा तो गुलाम न होतां, तो समाजच बदलून टाकतो. समाज डबक्यासारखा प्रवाहशून्य, गतिशून्य बनणें त्याला पसंत नसतें. तशा समाजाकडे पाहून त्याला किळस येतें. गति खुंटलेला समाज बदलून टाकून त्यांत चांगलें स्थित्यंतर घडवून आणावें, हाच त्याला ध्यास लागलेला असतो. सर्व धर्मसंस्थापकांची अशीच उज्ज्वल परंपरा आहे. त्यांची दृष्टि असामान्य, अलौकिक अशी असते. प्रवाहपतिताप्रमाणें वहात न जातां समाजांत तें मुळापासून परिवर्तन घडवून आणीत असतात. आपला हिंदु समाज फार पुरातन आहे. इतक्या दीर्घ कालाच्या अवधींत हिंदु समाजाच्या शरीरांतील आरोग्य दूषित करून टाकणारे असे अनेक अंतःस्राव उत्पन्न झाले आहेत, विवेकबुध्दीला न पटणारे असें अनैतिक दोष निर्माण झाले आहेत. गांधीजींनीं आपल्या समाजांत थोर क्रान्ति केली, आपणांस सारखी टोंचणी लावून आपल्या समाजांतील अन्यायांची व विषमतेची आपणांस जाणीव करून दिली आणि आपलें जीवन हिंदु धर्मांतील उच्च तत्त्वें व ध्येयें आचरणांत जाणून सुसंपन्न केलें.

जीवनांतील ही सुसंपन्नता त्यांना सत्यपालनामुळें आली. सत्यानेंच त्यांच्या आत्म्याचें पोषण झालें, त्याच्याच आधारावर त्यांनीं अनेक त्याग करून दाखविले. सत्य आणि अहिंसा हीं धर्माचरणांतील प्रमुख तत्त्वें होत असें जेव्हां ते सांगत, तेव्हां धर्मविचाराच्या दृष्टीनें आपल्याला त्यांत अपरिचित असें काय आहे ?

प्रत्यक्ष जीवनाच्या ज्ञानानेंच सत्याचें दर्शन होऊं शकेल. आपल्या प्राचीन महर्षींप्रमाणें गांधीजींनीं आपणांला सांगितलें कीं, " मनुष्याच्या अंतःसृष्टीकडे आपली नजर कळवा, त्यांतील निरनिराळे








घटक शोधून काढा आणि ज्या योगानें सत्यदर्शनाचें व्रत सुटणार नाहीं अशा रीतीनें आपलें धर्मपालन करा.'' बुद्ध धार्मिक अंतःप्रेरणेनें प्रेरित होऊन सत्याचा शोध करीत असतांना त्यांना एक आजारी, एक म्हातारा, एक मेलेला आणि एक भिकारी अशीं माणसें दिसलीं. जगांतील हें घोर दुःख पाहून बुद्धांनीं म्हटलें, "या गोष्टी कां बरें असाव्यांत?'' मनुष्याला जेव्हां स्वतःची जाणीव होते, पशु आणि मनुष्य यांतील फरक जेव्हां त्याला कळूं लागतो, तेव्हांच त्याच्यापुढें असा प्रश्न उभा राहतो!

सर्व तत्त्वज्ञांनीं सांगितलें, "मृत्यूविषयीं विचार करा." प्लेटोनें तेंच सांगितलें. हे प्रश्न विचारा— 'मनुष्याच्या नशीबीं शेवटीं नाशच ठेविला आहे काय? ऐहिक जीवन हीच कां माणसाची इतिकर्तव्यता आहे? मानवाच्या सर्व भव्य कृती शेवटीं धुळीसच मिळणार का? तर मग केवढी ही दारुण विफलता! केवढें हें भयंकर नैराश्य! हें असें का व्हावें?' तसाच हल्लीं पण आपणांपुढें प्रश्न उभा आहे. "हा नैतिक बदसूर, ही आध्यात्मिक बजबजपुरी आमच्यांत कां माजावी? विश्वाशीं मानव ज्या ऐक्यभावनेनें बद्ध झाला आहे, ती ऐक्यभावना कां बरें आम्ही भंगून टाकली? ही अशी फूट कां बरें पडावी? 'सर्व विश्वाचें केंद्र मी, माझे लाड सर्व जगानें पुरविले पाहिजेत, अशी बेफाट बदसूर वासना आमच्या ठिकाणीं कां उत्पन्न व्हावी? मी इतका पतित कां? माझें जीवन इतकें बदसूर कां व्हावें?''

मनुष्य म्हणजे परस्परविरुद्ध गोष्टींचें एक कोडें आहे. त्याचें ध्येय उच्च असतें, पण प्रत्यक्ष कृतींत तें उतरत नाहीं. त्याच्या अंतःकरणांत परस्परविरुद्ध प्रवृत्तींचें थैमान सुरू असतें. त्याच्या हृदयांतील विवेकी नैतिक प्रवृत्ति म्हणत असते "हें जग बाह्य आणि आंतरिक अशा 'असद्' नें भरलेलें आहे. मानवाचें अंतःकरणही त्याला अपवाद नाहीं". म्हणून आपली नेहमीं प्रार्थना असते कीं 'तमसो मा ज्योतिर्गमय, मृत्योर्मा अमृतं गमय, असतो मा सत् गमय,'. असें ज्योतिर्मय, अमृत मन् अशा प्रकारचें जीवनविश्व आहे कां?

मनुष्याचें ध्येय हें संवेदनाशून्यता, अनुभवशून्यता हीं नसून ज्यांत ज्ञानाचा आणि सावुल्याचा साक्षात्कार येत आहे असें जीवन जगणें हें आहे. या दोन ध्येयांमध्यें जमीन-अस्मानाचें अंतर आहे. आपल्यांपैकीं बहुतेकांचें जीवन अनुभवशून्य, अज्ञानी असून तें सुखी समजलें जातें. यापेक्षां निराळें ज्ञानमय, प्रबोधपूर्ण, आनंदमय असें जीवन आहे. तें प्राप्त करून घेण्याकरितां मनुष्यानें आपली समुन्नति करून घेतली पाहिजे.

जेव्हां मोह पाडण्यासारखी परिस्थिति उत्पन्न होईल, तेव्हां त्याला तोंड देण्याकरितां गांधीजी आणि त्यांचा सत्याग्रह यांचा आपण आश्रय केला पाहिजे; म्हणजे एखाद्या काल्पनिक वा ठोकळेबाज सिद्धान्ताच्या आड न लपतां, प्रत्यक्ष सत्यपरिस्थितीचें संशोधन करून 'ती तशी कां' याचें कारण आपण शोधून काढलें पाहिजे. येथेंच धर्माचा प्रश्न उत्पन्न होतो. धर्म म्हणजे बुध्दिशून्य कल्पना नव्हे. धर्म म्हणजे सत्यसंशोधन, आत्मसंशोधन होय. मनुष्यानें, जर तो मनुष्य असेल तर, हें आत्मसंशोधन केलें पाहिजे. नाहींतर त्याच्या जीवनांत बदसूर आणि द्वंद्वें माजून तें व्याकुळ होईल.

नराचाच नारायण बनतो. आपलीं हीं बाह्य कवचें भेदून आपण जर त्या अंतर्गत 'सत्याशीं' एकजीव होऊं शकलों, सर्वभूतैक्यभावाचें जर आपणांस दर्शन होऊं शकलें, त्या परात्पर अशा 'सत्'चा जर आपणांस साक्षात्कार होऊं शकला, तरच मानव म्हणून आपलें सार्थक होईल. नाहींतर आपलीं नेहमींचीं आयुष्यें—जन्माला येणें, जगणें, संतत्युत्पादन करणें आणि मरणें— ! प्राण्यांचीच जरा मोठ्या प्रमाणावर सुधारून वाढवलेलीं—एवढाच फरक! जीवनांत कांहीं उच्च पुरुषार्थ आहे, विश्व कांहीं धर्मानें—नियमानें—बध्द आहे, त्या नियमांचा हेतु मनुष्यानें आपली उन्नति करून घेतली पाहिजे असा आहे, याची आपणांस जाणीवही नसते. म्हणून माणसाचा गुणोत्कर्ष झाला पाहिजे, माणसानें उच्च पदवी गांठली पाहिजे. पुरुषाचा पुरुषोत्तम व्हावयाचा असेल तर तें अहिंसेच्या द्वारेंच होईल.







## सार-संकलन

हल्लीं संक्रमणाचा काळ आहे. जग क्रान्तीकरितां उत्सुक आहे. हिंदुस्थानही क्रान्तीची प्रतीक्षा करीत आहे. अशा वेळीं आपण हें सदैव लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, सत्याचें उत्कृष्ट विकसित स्वरूप म्हणजेच अहिंसा, सहिष्णुता आणि गुणग्राकता हीं होत. जी क्रांति करावयाची ती नैतिक साधनांनी आपणांस करावयाची नसेल तर आपला नाश हा ठेवलेलाच आहे. जें नैतिक दृष्ट्या बरोबर नाहीं, तें राजकीय दृष्ट्या देखील बरोबर नसलेंच पाहिजे. वाईट साधनांनीं चांगलें साध्य होणार नाहीं. तात्कालिक यश मिळाल्यासारखें वाटलें, तरी अंतीं वैफल्य हें पदरीं येणार हें नक्की.

आपली हृदयें तमोगुणानें पछाडलीं गेल्यामुळें आम्हीं माणुसकीची हत्या केली आहे. याच तमोगुणामुळें, असहिष्णुतेचा बरपगडा होऊन, संस्कृतीचा अधःपात झाला आहे. जर जगांत आपणांस पुन्हां विवेकाचें साम्राज्य प्रस्थापित करावयाचें असेल तर आपण मूलभूत गोष्टींचा मूलतः प्रथमपासूनच निष्ठापूर्वक आग्रह धरला पाहिजे. त्या मूलभूत गोष्टी म्हणजे सत्य आणि अहिंसा या होत !

**—डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन्**

[ लंडन येथील हिंदु असोशिएशन ऑफ यूरोप समोर मार्चमध्यें झालेल्या व्याख्यानाचा स्वैर अनुवाद]

### २ नवी विज्ञानदृष्टि—

मला वाटतें कीं आपल्या जुन्या शास्त्रांचा विचार करणारी मंडळी नव्या विज्ञानदृष्टिचा नीट अर्थ समजूत घेत नाहींत. जानेवारीच्या ' नवभारतांत ' जो मानसशास्त्राविषयक लेख आला आहे त्यांतहि हें दिसून येतें——एरव्हीं तो लेख चांगला आहे. तेव्हा शास्त्रानें चेतनवाद कां सोडला आहे आणि शास्त्रालाहि ध्येयवाद असतो हें दाखविणारे हे दोन उतारे खालीं दिले आहेत——

### चेतनवाद आणि विज्ञानदृष्टि

"आपल्या समकालीन चेतनतत्त्ववादानें (vitalism) म्हणजेच आत्मतत्त्ववादानें ( animism ) निसर्गविज्ञानी ( naturalist ) व तत्त्वज्ञानी यांच्या भिन्न दृष्टिबिंदूंची गल्लत केली आहे ही गोष्ट स्पष्ट नाहीं का ? पहिल्याचे आश्चर्यकारक विजय हे वस्तुलक्षी घटनांचें संशोधन व त्यांची तुलना यांवर उभारलेले असतात आणि त्यानें तत्त्व म्हणूनच रहस्य ( essence ) व अंतिम कारणें ( final causes ) यांना दूर ठेवलेलें असतें. तत्त्वज्ञानी मात्र असा आहे कीं, जरी आजपर्यंतचे त्याचे संकलनाचे प्रयत्न चमत्कारिक तऱ्हेचे ( fantastic ) असले तरीहि तो स्वतः संकलनाच्या या सर्वश्रेष्ठ मानवी आकांक्षेचें मूर्त स्वरूपच असतो, आणि अशा त्या तत्त्वमीमांसकानें वस्तुलक्षी व अंतर्लक्षी अशा दोन्ही घटनांवरून संपूर्णतेचें चित्र निर्माण करायचें असतें. निसर्गशास्त्रज्ञाचें सर्वस्व त्यांच्या पद्धतींत आणि सरळ व शाश्वत सत्यवस्तु समजून घेण्याच्या संभवांत सामावलेलें असतें, आणि त्यांच्या या अनिवार्य दृष्टिकोनामुळें आत्म्याची कल्पना ही एक निसर्गात्मक तत्त्व म्हणून त्याला अनावश्यक असते, एवढेंच नव्हे तर त्याच्या कार्याला ती हानिकारकहि होते; कारण त्यामुळें त्यांच्या धैर्याला व विश्लेषणाच्या सखोलपणाला व्यर्थ मर्यादा घातल्या जातात. "

**—प्रो. इव्हान पी. पाव्लोव्ह,**

(Lectures on Conditioned Reflexes पृष्ठ ६०)

### विज्ञानालाहि ध्येयदृष्टि असते.

" आतां मला गंभीरपणानें व निश्चितपणें असें वाटतें कीं या ( वस्तुनिष्ठपणें तथाकथित 'मानसिक' क्रियांचें शरीरशास्त्राच्या मार्गे संशोधन करणाऱ्या ) मार्गानेंच मानवी मनाला आपल्या महत्तम व सर्वश्रेष्ठ समस्येवर—मानवस्वभावाच्या (human nature) यंत्ररचनेचें (mechanism) आणि नियमांचें सम्यक् ज्ञान कसें मिळवावें या समस्येवर—अखेरचा विजय मिळवितां येईल. केवळ या रीतीनेंच संपूर्ण, सत्यपूर्ण व शाश्वत सुखाची प्राप्ति होणार आहे. सभोंवतालच्या सृष्टीवर विजयामागून विजय मिळवीत मनाला उन्नत होऊं द्या; मानवी जीवित व कार्यप्रवृत्ति यांस्तव पृथ्वीच्या पृष्ठभागावरच केवळ नव्हे तर सागरांच्या अगाध तळापासून तों वातावरणाच्या बाह्य सीमेपर्यंत जें जें आढळतें तें तें सर्व त्याला जिंकूं द्या, आपल्या उपयोगार्थ जगाच्या एका भागापासून दुसऱ्या भागापर्यंत पसरविण्यासाठीं

विपुल भौतिक शक्तींवर त्याला प्रभुत्व गाजवूं द्या; आपल्या विचाराचें वाहन व्हावें म्हणून त्याला स्थल-कल्पनेचें अस्तित्वच पुसून टाकूं द्या;—तरीपण तोच मानवी प्राणी, अदृश्य कृष्णशक्तींच्या योगें युद्धें, क्रांत्या व तज्जन्य भीषण विपत्ति यांजकडे खेंचला जाऊन आपल्याच पदरांत अमाप भौतिक तोटे व अवर्णनीय कष्ट टाकीत आहे आणि पाशवी अवस्थेकडे परत तोंड फिरवीत आहे. फक्त विज्ञान, मानवी कार्यप्रवृत्तींबद्दलचें (activities) सम्यक् विज्ञान आणि सर्वशक्तिमान् अशा शास्त्रीय पद्धतीच्या साह्यानें त्याकडे जाण्याची प्रामाणिक वृत्ति यांच्या द्वारेंच मानवाला सांप्रतच्या अवदशेपासून मुक्ति मिळेल, व माणसांमधलि परस्पर संबंधांत उत्पन्न झालेल्या सध्यांच्या लाजिरवाण्या स्थितीमधून त्याला शुद्ध होता येईल. ''

—प्रो. इव्हान पी. पाव्लोव्ह

उपरिनिर्दिष्ट ग्रंथ—प्रस्तावना, पृ. ४१

प्रेषक— श्री. ना. ग. जोशी, बडोदें

———

## बापूंचा वारसा

हें सम्मेलन बापूंच्या मृत्यूनंतर त्यांनीं राष्ट्राला दिलेला अमूल्य वारसा कसा रक्षितां येईल याचा विचार करण्याकरितां भरलें होतं. बापूंचें वैशिष्टय म्हणजे त्यांच्या चेल्यांची जमात नव्हे. त्यांच्या संस्थाहि नव्हेत. त्यांनीं साबरमती आश्रम मोडून टाकला. सेवाग्राम सोडून दिलें. गांधी-सेवा-संघ उधळून टाकला. राज्याप्रमाणेंच संस्थेचाहि मोह कधीं धरला नाहीं. सांप्रदायिकतेचा विरोध हा त्यांचा एक वारसा.

बापूंचा दुसरा वारसा राष्ट्रव्यापी कौटुंबिकतेचा. मालिकान्याला त्यांनीं धोत्र्यांना विचारलें, ' तुमच्या पटावर किती सभासद आहेत ?' धोत्रे म्हणाले, 'सुमारें अडीचशें' तेव्हां बापू म्हणाले, 'तुमचें रजिस्टर फसवें आहे. या देशांत माझीं तत्त्वें मानणारीं अडीचशेंच माणसें आहेत असें तुम्हांला म्हणावयाचें आहे काय ? ' इतकें म्हणून त्यांनीं समोर उभ्या असलेल्या प्रचंड जमावाकडे बोट दाखवून म्हटलें, ' तें पाहा माझें रजिस्टर. तुमचें रजिस्टर खोटें आहे ' ही बापूंची संघटनेची कल्पना. त्यांच्या संघटनेला आवार किंवा कुंपण सहन होत नसे. हा त्यांचा दुसरा वारसा.

हे दोन वारसे सदैव जतन करून, सांप्रदायिकता, औपचारिकता आणि तांत्रिकता यांच्या चाकोरींतून बाहेर काढून राष्ट्रीय चळवळींचा गाडा साधनशुद्धीच्या व पक्षभेदनिरपेक्ष सहकार्याच्या प्रशस्त लोकमार्गावर आणून ठेवण्याचा अत्यंत शुभकारक प्रयत्न सेवाग्रामच्या सम्मेलनानें केलेला आहे. हीच त्याला फलश्रुति आहे. ''

—आचार्य दादा धर्माधिकारी

' भवितव्य ' १९-३-४८








वर्ष पहिलें
अंक आठवा

# नवभारत

मे
१९४८

## या अंकांतील जाहिराती व जाहिरातदार

सु. रा. ग्रंथमाला | जे. ॲन्ड. एस्. को. | डॉ. पुरोहित फार्मसी

# औद्योगिक-वृत्त विशेष

( पॅरामाऊंट पब्लिसिटी सिंडिकेट लि. मार्फत )

नवभारतच्या एप्रिल महिन्याच्या अंकांत महाराष्ट्र बँकेच्या जाहिरातींत खेळतें भांडवल दोन लक्षांवर असें चुकून छापलें गेलें आहे. त्या ऐवजीं एकूण खेळतें भांडवल दोन कोटींवर असें वाचावें.

पुणें येथें भरलेल्या **महाराष्ट्रीय कारखानदारांच्या परिषदेनें** भांडवलावर सहा टक्के करमाफ, व्याज सुटल्यानंतर उरलेल्या नफ्यांची कारखानदार व कामगार यांत निम्मेनिम्म वांटणी करण्याची सिद्धता दाखविली हें समयोचित असल्यानें परिषदेच्या या नेतृत्वाबद्दल समाधान व्यक्त करण्यांत येत आहे.

**किर्लोस्कर ऑईल इंजिन्स् लि.** पुणें २— यांनीं खडकी येथें घेतलेल्या ५० एकर जागेंत प्रचंड कारखान्याची उभारणी चालू असून आवश्यक मशिनरी आली आहे. सुमारें तीन महिन्यांत कारखाना चालू होईल असा अंदाज आहे.

ग्लुकोज व स्टार्च यांचें उत्पादन करण्यासाठीं **"ग्लुकोज ॲन्ड फूडस् लि."** ९, आग्रा, रोड, कुर्ला, नांवाची १५ लक्ष रुपये भांडवलाची कंपनी स्थापन झाली आहे. मेसर्स करंदीकर, नाखरे ॲन्ड सन्स हे कंपनीचे मॅनेजिंग एजन्टस् आहेत.

**रत्नाकर इंडस्ट्रीज् लि. कोल्हापूर** यांच्या वनस्पति तुपाच्या कारखान्याची बहुतेक मशिनरी आली आहे व वनस्पतीचें उत्पादन लवकरच चालू होईल. सध्यां शेंगदाण्याचें तेल कंपनी काढीत आहे.

**सूर्यकिरण फार्मसी लि.**, तळेगांव, यांनीं नित्याच्या रोगांवर शीघ्र परिणामकारक अशीं दहा प्रकारचीं औषधें प्रत्येकीं एक आणा पाकिटांतून बाजारांत आणलीं असून त्यामुळें या औषधांचा चांगला प्रसार होईल.

साखरेवरील नियंत्रण उठल्यामुळें महाराष्ट्रांतील चौदाही साखर–कारखान्यांना तेजी आली. या साखर कारखान्यांत सालीना सुमारें एक लाख टन (म्हणजे १० लाख पोतीं) साखर तयार होते. पाऊण लाख एकर जमीन साखरेच्या उत्पादनास वापरली जात असून या उद्योगांत ५०,००० कामगार गुंतले आहेत.

**श्री गणेश ॲग्रिकल्चरल इंडस्ट्रीज लि. चळें**, पंढरपूर–ही कंपनी गूळ, साखर वगैरे शेती मालाचें उत्पादन करण्यासाठीं स्थापन झाली असून कंपनीचें आतांपर्यंत रु. १,७५,००० भांडवल खपलें आहे. गूळ तयार करण्याची यंत्रसामग्री आली आहे; तसेंच ताब्यांत आलेल्या २०० एकर जमिनींत लवकरच उसाची लागवड होणार आहे.

**सुंदर सिरॅमिक्स लि., बेळगांव**–यांच्या लोंढा येथील कारखान्याचें उद्घाटन उद्योगमंत्री ना. तपासे यांच्या हस्तें झालें.

हिंदुस्थान स्पन् पाइप्स् लि. पुणें २–यांच्या अहमदनगर स्टेशनजवळील अरणगांव येथील फॅक्टरीस ना. ल. मा. पाटील यांनीं भेट दिली.

एन्च. फूलिंजर आणि कंपनीचे श्री. मराठे हे मशिनरीच्या साहाय्यानें सिंथेटिक रेझीन मोठ्या प्रमाणावर तयार करणारा कारखाना उभारीत आहेत.

चितळे ॲग्रिकल्चरल प्रॉडक्ट्स् लि., वेस्टर्न इंडिया हाऊस, मुंबई १–हे अद्यावत् सामुग्रीच्या










सहाय्यानें खंडसारी साखर करणार आहेत. उंसांचें क्षेत्रही कंपनी वाढवीत आहे.

वृत्तपत्रीय कागदाची किंमत या दहा वर्षांत चौपटीनें चढल्यामुळें इंग्लंडमधील वृत्तपत्रांचें अर्थकारणांत क्रांति झाली आहे. युद्धापूर्वी तिकडील वृत्तपत्रांचें उत्पन्नांत जाहिरातींचा भाग ५६ टक्के व खपाचा भाग ४४ टक्के सरासरीनें असे, तें प्रमाण आतां बरोबर उलटें झालें आहे.

स्वतंत्र भारतांत देशी भाषांचें स्थान लक्षांत घेऊन वर्धा येथील कॉमर्स कॉलेज हिंदी व मराठी लघुलेखनाचे तसेंच टंक लेखनाचे वर्ग जुलै १९४८-पासून चालू करणार आहे.





अनुक्रमणिका

व्यापार वाढविण्यासाठीं कारखाने सर्क्युलर्स पाठवतात तीं टंकलिखित असण्यापेक्षां वळणदार हस्ताक्षरांत सायक्लोस्टाइल केल्यास त्यांची छाप चांगली पडते इकडे लक्ष देऊन अनिल टाइपरायटिंग व सायक्लोस्टाइल ब्यूरो, ४५३, शनवार, पुणें २, यांनीं तशा कामाची व्यवस्था केली आहे. टपालानेंहि काम पोंचविण्याची या योजनेंत तरतूद आहे.

किरात प्रेस, वेंगुर्लें, ही संस्था मुद्रण व तत्संबंधी इतर विषय यांचें शिक्षण देण्यासाठीं लवकरच मुद्रण-विद्यालय चालू करणार आहे.

" महाद्वार ", कोल्हापूर या मासिकाचे संपादक श्री. व्यं. न. कुलकर्णी हे " नंदनवन " नांवाचें प्रकाशन मुंबईस चालू करणार असून महाराष्ट्रांतील सांस्कृतिक, औद्योगिक वगैरे प्रश्नांचें त्यांत सांगोपांग विवेचन येणार आहे.

अमेरिकेंत कारखानदार व उद्योगपती बाजारांत येणाऱ्या मालासंबंधीं जनतेची आवडनिवड कळावी म्हणून संशोधन करतात. त्या देशांत ७४ मार्केट-सर्च-एजन्सीज काम करीत आहेत.

दि डेक्कन सिमेंट प्रॉडक्टस् कंपनीची सांगली-मारब्लो-टाइल्सची नवीन शाखा सुरू करण्यांत आली आहे.

विजय इंडस्ट्रीज लि., कोल्हापूर, यांच्या कारखान्याचें उद्‌घाटन झालें असून कारखान्यांत सायकल स्पोक्स्, तीन चाकी सायकली, वगैरे मालाचें उत्पादन होणार आहे.

वृंदा पिक्चर्स लि., पुणें २. या कंपनीचें भांडवल दोन लाखांवर गेलें आहे. श्री. मा. पं. सोमण, कंपनीचे अध्यक्ष, श्री. तुळशीबागवाले, सेक्रेटरी व श्री. रानडे, मॅनेजिंग एजन्ट असे कंपनीचे पदाधिकारी आहेत.

" व्यापारी महाराष्ट्र " पाक्षिकाचे संपादक व पॅरमाउन्ट पब्लिसिटी सिंडिकेट लि., चे एक डायरेक्टर श्री. हरि श्रीपाद घारे यांच्या अकाली निधनानें महाराष्ट्रीय व्यापाऱ्यांना हळहळ वाटली. मराठी चेंबर ऑफ कॉमर्सच्या कार्यकारिणीचें सभेंत श्री. न. प. केळकर, श्री. ना. तु. ठाकूर, श्री. आ. रा. भट, यांचीं दुखवट्याचे ठरावावर त्यांच्या कार्याबद्दल गौरव करणारीं भाषणें झालीं. कै. घारे यांचे सहकारी " व्यापारी महाराष्ट्र " अखंडित चालू ठेवणार आहेत ही समाधानाची गोष्ट आहे.

---